# अलंकार-चंद्रिका



हें पुस्तक

**गणेश मोरेश्वर गोरे**, बी. ए.

हेड मास्तर, सरकारी हिंदु हायस्कूल, उमरावती,

'काव्यदोषदीपिके'चे कर्ते, यांनीं रचिलें.

---

आवृत्ति दुसरी.

---

किंमत १॥ रुपया.

# प्रस्तावना.

—:०:—

आज सुमारें वीस वर्षांनंतर या पुस्तकाची सुधारून वाढविलेली द्वितीय आवृत्ति काढण्याचा योग आला याचें मुख्य कारण हें पुस्तक मुंबईच्या विश्व-विद्यालयांत मराठी भाषेच्या अभ्यासक्रमांत क्रमिक पुस्तक म्हणून नेमलें गेलें हें होय; व तें नेमणारांचा मी अत्यंत आभारी आहे.

जुन्या पद्धतीनें संस्कृत भाषेचा अभ्यास करणाऱ्या शास्त्री मंडळीस अप्प-दीक्षितांचा **कुवलयानंद** आणि जगन्नाथ पंडितांचा **रसगंगाधर हे** अलंकार-ग्रंथ फार प्रिय होते. कुवलयानंदाचें मूल संस्कृत ग्रंथासह मराठींत भाषांतर शके १८०८ या वर्षी वामन एकनाथ क्षीरसागर यांनीं प्रसिद्ध केलें व हाच अलंकार-शास्त्रावरील पूर्ण असा पहिला मराठी ग्रंथ होय. तसेंच सुमारें पंधरा वर्षांपूर्वी माझे लहानपणचे गुरु कै. पांडुरंग गोविंद पारखीशास्त्री यांनीं एक ईशस्तवनपर लहानसें काव्य रचिलें; त्यांतही कुवलयानंदांतील अलंकारांच्या मांडणीप्रमाणेंच फक्त उदाहरणें रचून त्या काव्यास **अलंकारार्पण** असें अन्वर्थक नांव दिलें. या वरून अजूनही वरील दोन ग्रंथच शास्त्रीवर्गास प्रिय आहेत असें दिसतें. मुंब-ईच्या विश्वविद्यालयांत मम्मट भट्टांचा **काव्यप्रकाश** हाच ग्रंथ क्रमिक पुस्तक म्हणून नेमलेला असल्यामुळें अलीकडील सुशिक्षित मंडळीस तोच ग्रंथ मान्य झालेला आहे व म्हणून त्याच ग्रंथाच्या आधारें प्रस्तुत पुस्तक तयार केलें आहे. तथापि अप्पदीक्षित व जगन्नाथपंडित यांनीं ग्राह्य ठरविलेले परंतु मम्मटाचा-र्यांनीं अग्राह्य मानलेले बहुतेक सर्व अलंकार पहिल्या परिशिष्टांत दिलेले असून मम्मटाचार्यांच्या मतें त्यांचा कोणकोणत्या अलंकारांत समावेश होतो याचेंही त्यांत दिग्दर्शन केलें आहे. अशा रीतीनें सर्व अलंकारांचें विवेचन या ग्रंथांत झालेलें आहे.

अलंकारांचीं उदाहरणें नव्या व जुन्या कवींच्या काव्यांतून निवडून घेतलीं अस-ल्यामुळें नव्या जुन्या कवींच्या पद्यांचें यथायोग्य संमिश्रण या पुस्तकांत झालेलें वाचकांच्या दृष्टीस पडेल. सर्वच अलंकारांचीं चांगलीं उदाहरणें मराठी काव्यांतून सांपडण्यासारखीं नसल्यामुळें कित्येक वेळां जरूरीसाठीं पण बहुतेक वेळां कल्पना-वैचित्र्यासाठीं बरींच पद्यें मी स्वतः भाषांतर करून उदाहरणें म्हणून घातलीं आहेत. अलंकारशास्त्र शिकण्यास प्रारंभ करण्यापूर्वी साहित्य शास्त्राची जी त्रोटक माहिती

वाचकांस असणें आवश्यक आहे ती प्रथम 'विषयोपक्रमांत' दिलेली असून नंतर शब्दालंकार व अर्थालंकार यांचें पूर्ण विवेचन केलें आहे. अलंकाराच्या एकाद-दुसऱ्या उदाहरणानें विद्यार्थ्यांची समजूत पडत नाहीं व कित्येकवेळां, असल्या उदाहरणांनीं त्यांचा गैरसमजही होण्याचा संभव असतो; म्हणून अलंकारांचीं अनेक उदाहरणें देऊन त्यांस अलंकारांच्या लक्षणांचा सोप्या रीतीनें चांगला परिचय व्हावा अशी विवेचन पद्धति स्वीकारली आहे. अलंकारांची ओळख करून देतांना भाषा साधीच वापरली असून जेथें पारिभाषिक शब्द योजावे लागले तेथें त्यांचें स्पष्टीकरणही केलेलें आहे. कित्येक अलंकारांमध्यें बरेंच साम्य असल्यामुळें अलंकारांचीं नांवें ओळखण्यांत कित्येक वेळां विद्यार्थ्यांच्या मनांत घोटाळा उत्पन्न होतो तो नाहींसा करण्यासाठीं ठिकठिकाणीं त्यांच्यांतील भेद न सांगतां दुसऱ्या परिशिष्टांत अलंकारांतील साम्य व भेद दर्शविणाऱ्या टीपा दिल्या आहेत. ही योजना जास्त सोयीची व उपयोगाची आहे. सारांश, विद्यार्थ्यांस अलंकारांचें पूर्ण ज्ञान अगदीं सुलभ रीतीनें प्राप्त करून घेतां यावें म्हणून शक्य तितका प्रयत्न केला आहे. शेवटीं वाचकांच्या सोयीसाठीं वर्णानुसार सूचीही जोडली आहे.

ह्या पुस्तकाचा उपयोग मराठी भाषेचा अभ्यास करणाऱ्या कॉलेजांतील व ट्रेनिंग कॉलेजांतील विद्यार्थ्यांस होईलच. परंतु बी. ए. च्या वर्गांत संस्कृत भाषेंतून अलंकारशास्त्र शिकणाऱ्या कांहीं विद्यार्थ्यांसही पूर्वावलोकनाच्या वेळीं या पुस्तकापासून बराच फायदा होण्याजोगा आहे. तसेंच या पुस्तकांतील केवळ वेंचक पद्यांकडेच पाहिल्यास त्यांचा सुभाषितांप्रमाणें सामान्य वाचकांना करमणुकीसाठीं किंवा ज्ञानप्राप्तीसाठीं उपयोग होण्यासारखा आहे.

प्रकरणादिकाच्या आभावामुळें अलंकाराचा निश्चय करण्यांत कोठें एकादी चूक होण्याचा संभव असतो. या कारणामुळें ह्या पुस्तकांत कोठें कांहीं दोष राहिले असल्यास ते विद्वान व रसिक वाचकांनीं मला कळविल्यास त्यांचे मजवर फार उपकार होतील.

हें पुस्तक छापण्याचें काम कर्नाटक मुद्रणालयाच्या मालकांनीं लवकर व मनाजोगें करून दिलें याबद्दल मी त्यांचा फार आभारी आहें.

उमरावती,
२७ सप्टेंबर, १९२६.

**गणेश मोरेश्वर गोरे.**

---

# अनुक्रमणिका.

## विषयोपक्रम.



## शब्दालंकार.



## अर्थालंकार.

## परिशिष्ट पहिलें.

---

कुवलयानंदादि ग्रंथांत निरूपण केलेल्या कित्येक अनवश्यक अलंकारांची नामावली व त्यांचा प्रस्तुत पुस्तकांतील ज्या अलंकारांमध्यें अंतर्भाव होतो त्यांचीं नांवें:—

| **अनवश्यक अलंकारांचीं नांवें.** | **ज्या अलंकारांत समावेश होतो त्यांचीं नांवें.** |
|---|---|
| अवसर ... ... ... | द्वितीय उदात्त. |
| असंभव ... ... ... | विरोध. |
| अहेतु ... ... ... | विशेषोक्ति. |
| अचार ... ... ... | चमत्काराभावामुळें हे अलंकार होत नाहींत. |
| आत्मतुष्टि ... ... | चमत्काराभावामुळें हे अलंकार होत नाहींत. |
| आशाः ... ... ... | चमत्काराभावामुळें हे अलंकार होत नाहींत. |
| उदाहरण... ... ... | अर्थांतरन्यास. |
| उन्मीलित ... ... | मीलित. |

# विषयोपक्रम.

———:o:———

## ( १ ) अलंकारशास्त्राचा संक्षिप्त इतिहास.

अलंकारशास्त्राच्या उत्पत्तीचा कालनिर्णय करणें फार कठीण आहे. कित्येकांच्या मतें कालिदास व त्याचेंच अनुकरण करणारे कित्येक कवि यांच्या अतिरमणीय काव्यरचनेमुळें टीकाकार प्रथम जरी आश्चर्यचकित होत्साते स्तब्ध राहिले तरी मागाहून त्यांनीं टीकाविषयक लेख लिहिण्यास प्रारंभ केला व दंडीचा 'काव्यादर्श' या नांवाचा ग्रंथ याच दिशेनें श्रम केल्याचें फळ असून तोच ग्रंथ अलंकारशास्त्राचा मूळ पाया होय. परंतु हें मत बरोबर नाहीं. संस्कृत भाषेमध्यें अलंकारशास्त्रावर उपलब्ध असलेला सर्वात जुना ग्रंथ म्हटला म्हणजे दंडीचाच आहे व त्याचे ग्रंथाच्या पूर्वी रचलेला प्रसिद्ध असा या शास्त्रावर एकही ग्रंथ आढळून येत नाहीं हें खरें; तथापि एवढयावरूनच या शास्त्राचा उत्पादक दंडीच आहे असें कधींही म्हणतां यावयाचें नाहीं. अठरा मुख्य पुराणांपैकींच 'अग्निपुराण' हें दंडीच्या पूर्वी लिहिलेलें असून त्यांत अनेक अलंकारांचा समावेश झालेला आहे. निरुक्तामध्येंही इवादि शब्द उपमावाचक आहेत असें सांगितलें आहे; व वेदांमध्यें देखील उपमा, रूपक, अतिशयोक्ति इत्यादि अलंकार आढळून येतात. यावरून सध्यां जो अलंकारशास्त्ररूपी प्रचंड वृक्ष अस्तित्वांत आहे त्याचें बीज वेदकाळींच रुजलेलें होतें हें अगदीं उघड आहे.

कोणत्याही भाषेच्या उत्कर्षास प्रारंभ झाला म्हणजे तिजमध्यें उपमा अलंकार प्रथम येणें साहजिक आहे; आणि त्या भाषेची अभिवृद्धि होऊन ती जशी जशी प्रौढ होत जाते तसे तसे तिच्यामध्यें उपमामूलक दुसरे अनेक अलंकार शिरत जातात. संस्कृत भाषेलाही हाच नियम लागू आहे. या भाषेची एके कालीं अतिशय भरभराट झाली होती व तिजमध्यें जितके अलंकार सांपडतील तितके दुसऱ्या कोणत्याही भाषेंत सांपडणें शक्य नाहीं.

भर्तृहरीच्या

**साहित्यसंगीत–कलाविहीनः ।**
**साक्षात्पशुः पुच्छविषाणहीनः ॥**

**तृणं न खादन्नपि जीवमान-।**
**स्तद्भागधेयं परमं पशूनाम् ॥**

या श्लोकावरून साहित्यशास्त्र व संगीतकला हीं पूर्वी शिक्षणाचीं आवश्यक अंगें होतीं असें दिसतें. साहित्यशास्त्राचे मुख्य दोन भेद आहेत–( १ ) नाट्यशास्त्र, ( २ ) अलंकारशास्त्र. नाट्यशास्त्रांत दृश्य काव्यास म्हणजे नाटकास अवश्य लागणाऱ्या सामग्रीचें वर्णन केलेलें असतें. या शास्त्रावर बरेच ग्रंथ लिहिलेले आहेत; परंतु त्यांपैकीं भरतमुनिप्रणीत " नाट्यसूत्रें " व धनंजयाचा " दशरूप " हे दोन ग्रंथ सुप्रसिद्ध आहेत. अलंकारशास्त्रांत श्राव्य काव्याच्या गुणदोषांचें विवेचन केलेलें असतें. या शास्त्रावर तर पुष्कळच ग्रंथ झालेले आहेत; व ह्यामुळें प्रतिपादित विषयामध्यें साहजिकपणेंच पुष्कळ मतवैचित्र्य दिसून येतें.

अलंकारशास्त्रकारांमध्यें मुख्य दोन पक्ष आहेत. ( १ ) प्राचीन व ( २ ) नवीन. प्राचीनांच्या मतें काव्यामध्यें अलंकारच प्राधान्येंकरून असले पाहिजेत. बहुतेक जुने अलंकारशास्त्रज्ञ ह्या मताचे अभिमानी असून त्यांमध्यें दंडी, भामह, भट्टोद्भट, रुद्रट, भोज आणि वामन हे प्रमुख आहेत. अर्वाचीनांच्या मतें काव्यामध्यें व्यंग्यार्थ अथवा ध्वनि मुख्य असून गुणालंकाराची पायरी किंचित् खालीं आहे. बहुतेक सर्व आधुनिक अलंकारशास्त्रकर्ते हेंच मत प्रतिपादन करीत असून त्या पक्षांत आनंदवर्धन, रुय्यक, मम्मट, विश्वनाथ, अप्पय्यदीक्षित व जगन्नाथ हे प्रमुख आहेत.

वर निर्दिष्ट केलेल्या ग्रंथकारांविषयीं माहीत असलेला थोडासा वृत्तांत खालीं दिला आहे.

**दंडीः**—अलंकारशास्त्रावर सध्यां जे ग्रंथ उपलब्ध आहेत त्या सर्वांमध्यें दंडीचा 'काव्यादर्श' हाच ग्रंथ फार प्राचीन आहे. हा विदर्भ देशांत रहात असावा असें दिसतें. यानें रचलेला 'दशकुमारचरित' नांवाचा ग्रंथ सुप्रसिद्ध आहे. हा ख्रिस्ती शकाच्या सहाव्या शतकाचे अखेरीस होऊन गेला.

**भामहः**—हा काश्मीर देशांत ख्रिस्ती शकाच्या सातव्या शतकांत होऊन गेला. रुय्यक, ध्वनिकार, मम्मट व इतर कांहीं अलंकारशास्त्री यांनीं ह्याचे ग्रंथाविषयीं आपापल्या ग्रंथांत आदरबुद्धिपूर्वक उल्लेख केला आहे. यावरून भामह हा सुप्रसिद्ध अलंकारशास्त्रकर्ता होता ह्यांत संशय नाहीं. उद्भटानें ह्याच्या ग्रंथाचें विवरण केलें आहे. भामहाच्या ग्रंथाचा नामनिर्देश केलेला कोठें आढळून आला नाहीं.

| किरकोळ अलंकार. | ज्या अलंकारांत समावेश होतो त्यांचीं नांवें. |
|---|---|
| उभयन्यास ... ... | प्रतिवस्तूपमा. |
| निश्चय ... ... ... | भ्रांतिमान्. |
| निरुक्ति ... ... ... | श्लेष. |
| पिहित ... ... ... | सूक्ष्म. |
| पूर्वरूप ... ... ... | तद्गुण. |
| प्रत्यक्ष ... ... ... | भाविक |
| भाव ... ... ... | सूक्ष्म. |
| भावशबलता ... ... | चमत्कारजनकत्व नसल्यामुळें हे अलंकार होत नाहींत. |
| भावसंधि... ... ... | चमत्कारजनकत्व नसल्यामुळें हे अलंकार होत नाहींत. |
| मत ... ... ... | उत्प्रेक्षा. |
| मुद्रा ... ... ... | विशेष. |
| युक्ति ... ... ... | व्याजोक्ति. |
| रत्नावलि... ... ... | रूपक. |
| लव ... ... ... | व्याजोक्ति. |
| लेश ... ... ... | विशेष. |
| वर्धमान, उदार ... ... | सार. |
| वितर्क ... ... ... | ससंदेह |
| विवृतोक्ति... ... ... | अलंकार होत नाहीं. गुणीभूत–व्यंग–काव्य. |
| विशेषक ... ... ... | सामान्य. |
| समाहित ... ... ... | समाधि. |
| हेतु ... ... ... | काव्यलिंग. |

वर दिलेल्या किरकोळ अलंकारांच्या नांवांवरून व त्यांच्या पुढें दिलेल्या प्रसिद्ध अलंकारांवरून त्यांच्या लक्षणांचा बोध होत असल्यामुळें त्यांचें विवेचन केलें नाहीं.

---

# शुद्धिपत्र.

—:०:—

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध. | शुद्ध. |
| --- | --- | --- | --- |
| ८ | २१ | घालून. | घालवून. |
| ९ | १ | बोल. | बोले. |
| १० | ३ | पिउनी. | पिउनि. |
| २१ | ९ | व्यभिचारभाव. | व्यभिचारिभाव. |
| ३४ | १६ | श्लाध्य. | श्लाघ्य. |
| ४० | ७ | चद्रावरून. | चंद्रावरून. |
| ५८ | १४ | पाडुरंगशास्त्री. | पांडुरंगशास्त्री. |
| ५८ | १७ | कर्तव्य त. | कर्तव्य तें. |
| ६७ | ११ | पपयोग. | उपयोग. |
| ६८ | १३ | जो नळराजा. | जें नलयश. |
| ६८ | २५ | मयूर वद्नीं. | मयूरवद्नीं. |
| ७४ | २३ | शीण. | शाण. |
| ७६ | २१ | [ दृष्टान्तः गृहीतः | [ दृष्टः गृहीतः |
| ७७ | १३ | संबध. | संबंध. |
| ७९ | २ | संचयबहु. | संचय बहु. |
| ९२ | ८ | त्याच्याकडून. | त्यांच्याकडून. |
| ९४ | २१-२२ | मनुष्याचे. | मनुष्यांचे. |
| ९४ | २४ | ऐसीं. | ऐसें. |
| ९६ | २० | अर्थाची. | अर्थांची. |
| ९९ | १९ | तुल्योयगिता. | तुल्ययोगिता. |
| ११४ | १४ | यौवन. | यौवनें. |
| ११८ | २२ | राजसूत्र. | राज्यसूत्र. |
| ११९ | २३ | करींचें. | करिंचें. |
| १२८ | ३ | एकचचमत्कार. | एकच चमत्कार. |
| १२८ | ८ | सुचविणारें. | सुचणारें. |

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| १२८ | १९ | पाहिजे; | पाहिजे. |
| १३४ | १३ | **नेत्र मिथुनीं.** | **नेत्रमिथुनीं.** |
| १३५ | २ | **अन्येंनिमित्तें.** | **अन्यें निमित्तें.** |
| १६० | ५ | दोष दोतो. | दोष होतो. |
| १६५ | १२ | तर्क वरितो. | तर्क करितो. |
| १६९ | १९ | हेंदेखील. | हें देखील. |
| १७१ | १८ | **तुझ उणें.** | **तुझें उणें.** |
| १८४ | २३ | हेतु हेतुमद्भाव. | हेतुहेतुमद्भाव. |

वरील प्रमाणें अशुद्धं शुद्ध करून घेऊन मग पुस्तक वाचावें.

**भट्टोद्भटः**—हा उद्भट, उद्भटभट, उद्भटाचार्य या नांवांनींही प्रसिद्ध आहे. यानें भामहाच्या ग्रंथाचें स्पष्टीकरण केलें आहे हें वर सांगितलेंच आहे. याशिवाय 'अलंकारसारसंग्रह' या नांवाचा स्वतंत्र ग्रंथही यानें केलेला आहे. हा काश्मीरस्थ असून जयापीड राजाचा सभापति होता असें म्हणतात. जयापीड हा इ. स. ७७९ पासून ८१३ पर्यंत राज्य करीत होता असें राजतरंगिणीवरून निश्चित होतें. तेव्हां उद्भट हा आठव्या शतकाचे शेवटीं व नवव्या शतकाचे प्रारंभीं होता हें उघड आहे.

**रुद्रटः**—हाही काश्मीर देशांत ख्रिस्ती शकाच्या दहाव्या शतकांत होऊन गेला असें अनुमान करण्यास कांहीं हरकत नाहीं. कारण नमि नांवाच्या जैन टीकाकारानें आपल्या टीकेंत त्याचा नामनिर्देश केलेला आढळतो. नमि ११ व्या शतकांत होऊन गेला; तेव्हां रुद्रट १० व्या शतकांत होता असें म्हटल्यास फारशी चूक होणार नाहीं. यानें 'काव्यालंकार' नांवाचा ग्रंथ लिहिलेला आहे; त्यावर नमीची टीका आहे.

**भोजः**—हा माळव्यांत धारानगरींत रहात होता. यानें 'सरस्वतीकंठाभरण' नांवाचा ग्रंथ लिहिलेला आहे. यास भोजराज असेंही म्हणतात. हा ख्रिस्ती शकाच्या अकराव्या शतकांत होऊन गेला.

**वामनः**—ह्यास प्राचीनांमध्यें लेखण्याचा प्रघात आहे. तरी ह्याची विचारसरणी बहुतेकांशीं नवीनांप्रमाणेंच असल्यामुळें ह्यास आधुनिक अलंकारशास्त्रकर्त्यांच्या पंक्तींत बसविणें अधिक योग्य होईल. यानें 'काव्यालंकारसूत्रें' व त्यांवर 'वृत्ति' हा ग्रंथ लिहिला आहे. हा ख्रिस्ती शकाच्या सातव्या शतकाच्या प्रथम अर्धाच्या शेवटीं होऊन गेला असें म्हणतात.

**आनंदवर्धनाचार्यः**—यानें 'ध्वन्यालोक' नांवाचा ग्रंथ रचलेला आहे. यांत प्रथम कारिका असून नंतर वृत्तिही दिलेली आहे. यानें ध्वनि व गुणीभूत व्यंग्य हे शब्द नवीनच प्रचारांत आणिले म्हणून यास 'ध्वनिकार' असेंही म्हणतात. हा ख्रिस्ती शकाच्या आठव्या शतकांत होऊन गेला. अभिनव गुप्ताचार्य नामक एक शैव टीकाकार अकराव्या शतकांत होऊन गेला. त्यानें ध्वन्यालोकावर 'आलोचन' नांवाची टीका केली आहे.

**रुय्यकः**—यानें 'अलंकारसर्वस्व' व 'सहृदयलीला' हे दोन ग्रंथ लिहिले असून पहिल्यावर जयरथ यानें 'विमर्शिनी' नांवाची टीका केलेली आहे. रुय्यक

काश्मीर देशांत रहात होता असें दिसतें. मम्मटभट्टानें त्याच्या मताचें अनेक ठिकाणीं खंडन केलेलें आहे. यावरून तो मम्मटाच्या पूर्वी होऊन गेला हें उघड आहे.

**मम्मटः**—हा काश्मीर देशांत रहात होता असें दिसतें. यानें 'काव्यप्रकाश*' नांवाचा ग्रंथ केला असून तो बराच लोकप्रिय आहे. या ग्रंथावर जवळ जवळ पन्नास टीका असून त्या सर्वांत गोविंदठक्कुर यानें केलेली ' प्रदीप ' नांवाची टीका अत्युत्तम आहे. या प्रदीपावर वैद्यनाथाची 'प्रभा' व नागोजी भट्टाची ' उद्योत ' अशा दोन व्याख्या अथवा टीका आहेत. या दोन्हींपैकीं उद्योत नांवाची टीका फारच चांगली आहे. वामन व आनंदवर्धन यांच्या प्रमाणें मम्मटानेंही काव्यप्रकाशांत प्रथम कारिका व नंतर वृत्ति लिहिली आहे. मम्मटाच्या ग्रंथांत एका पद्यांत भोजराजाच्या दातृत्वाचें वर्णन आलेलें आहे. हा भोज इ. स. ९९६–१०५१ ह्या कालांत राज्य करीत होता. मम्मट अर्थात् याच्या मागून झाला. त्याचप्रमाणें जयंतभट्ट यानें आपल्या 'दीपिका' नांवाच्या टीकेंत मम्मटासंबंधानें उल्लेख केला आहे. हा जयन्त इ० स० १२९४ चे सुमारास होता. मम्मट अर्थातच याचे पूर्वी होऊन गेला. या प्रमाणांवरून पाहतां मम्मट ख्रिस्ती शकाच्या बाराव्या शतकांत होऊन गेला असें दिसतें.

**विश्वनाथः**—यानें मम्मटाच्या काव्यप्रकाशावर ' काव्यप्रकाशदर्पण ' नांवाची टीका केलेली आहे. परंतु याचा मुख्य ग्रंथ म्हटला म्हणजे ' साहित्यदर्पण ' हा होय. याच्या व मम्मटाच्या मतांमध्यें कित्येक ठिकाणीं विरोध दिसून येतो; तरी पण हा मम्मटाचा पूर्ण अनुयायी आहे. हा सुमारें पंधराव्या शतकाच्या शेवटीं होऊन गेला. ह्यास कविराज ही पदवी होती.

**अप्पय्य दीक्षितः**—हा द्राविड ब्राह्मण होता. यानें ' कुवलयानंद ' नांवाचा ग्रंथ लिहिला आहे व तो बराच प्रसिद्ध आहे. या ग्रंथावर वैद्यनाथानें ' प्रभे ' प्रमाणेंच ' चंद्रिका ' नांवाची टीका केलेली आहे. यानेंच चित्रमीमांसा नामक अलंकारविषयक ग्रंथ केला असून जगन्नाथ पंडितानें त्याच्या मताचें खंडन केलें आहे. अप्पय्य दीक्षित १६ व्या शतकांत होऊन गेला.

**जगन्नाथः**—हा मूळचा तैलंग ब्राह्मण असून राजाश्रयाकरितां दिल्लीस जाऊन शहाजहान बादशहाचे पदरीं राहिला. हा फार विद्वान् होता व ह्याची कवित्व-

---

* हा ग्रंथ समाप्त होण्यापूर्वींच मम्मट मरण पावला व राहिलेला भाग अल्लटसूरी यानें लिहून ग्रंथ पुरा केला अशी आख्यायिका आहे.

शक्तिहि अप्रतिम होती; म्हणून याला ‘पंडितराज’ व ‘ कविराज ’ या दोन बहुमानाच्या पदव्या मिळाल्या होत्या. यानें अलंकारशास्त्रावर ‘ रसगंगाधर ’ नामक ग्रथ लिहिला आहे; व त्यांत दिलेलीं उदाहरणें पंडिताचीं स्वतःची आहेत. अलंकारशास्त्रावरील सर्व ग्रंथांमध्यें हा उत्कृष्ट आहे व यांत प्रतिपादन केलेल्या विषयांचा गूढ व सूक्ष्म विचार करून निर्णय केलेला आहे. ‘रसगंगाधरा’वर नागेश दीक्षित ( नागोजी भट्ट ) यानें ‘ मर्मप्रकाश ’ नामक टीका केलेली आहे. परंतु ज्या ज्या ठिकाणीं जगन्नाथाचें मम्मटाच्याविरुद्ध मत आहे त्या त्या ठिकाणीं नागोजी भट्टानें जगन्नाथाच्या मतांचें खंडन करून मम्मटाच्या मताचेंच समर्थन केलें आहे. जगन्नाथ शहाजहानाचे वेळीं होता; अर्थात् हा सतराव्या शतकाच्या पहिल्या अर्धात होऊन गेला.

जगन्नाथानंतर या शास्त्रावर रचलेले स्वतंत्र असे ग्रंथ आढळून येत नाहींत. फक्त अच्युतराय वल्लभ यानें ‘ साहित्यसार ’ नामक एक ग्रंथ मुंबईंत १८५६ सालीं प्रसिद्ध केला. संस्कृत भाषेमध्यें अलंकारशास्त्रावर हा शेवटचाच ग्रंथ आहे असें म्हटलें तरी चालेल.

या शास्त्रावर गणेशशास्त्री लेले यांचा ‘ साहित्यशास्त्र ’ नांवाचा ग्रंथ बऱ्याच वर्षांपूर्वी प्रसिद्ध झाला होता. कृष्णशास्त्री चिपळूणकर यांनींहि आपल्या ‘अनेक–विद्या–मूलतत्वें’ या नांवाच्या ग्रंथांत कांहीं अलंकारांचा समावेश केलेला आहे. रा० रा० राजारामशास्त्री भागवत यांनीं ‘ अलंकार मीमांसा ’ नांवाचा ग्रंथ थोडे वर्षांपूर्वीं प्रसिद्ध केला आहे.

साधारणपणें मराठींत अलंकारांचें पूर्ण विवेचन करण्याचा प्रयत्न प्रस्तुत ग्रंथांतच प्रथम झाला. या पुस्तकाची प्रथमावृत्ति १९०५ मध्यें बाहेर पडते न पडते तोंच रा. रा. लक्ष्मण गणेशशास्त्री लेले यांचें ‘ अलंकारप्रकाश ’ नांवाचें पुस्तक प्रसिद्ध झालें. यानंतर या शास्त्रावर नांव घेण्यासारखें पुस्तक म्हटलें म्हणजे रा. रा. विद्याधर वामन भिडे यांचें १९२३ मध्यें प्रसिद्ध झालेलें पुस्तक ‘ अलंकार निरूपण ’ हें होय. हीं दोन्ही पुस्तकें कविनिर्मित असल्यामुळें यांतील अलंकारांचें विवेचन चांगलें असून प्रतिपादित विषयाची माहितीही पूर्ण आहे.

---

## ( २ ) अलंकारशास्त्र शिकण्याची आवश्यकता.

ज्याप्रमाणें भाषेच्या व्युत्पत्तीचें ज्ञान होण्यास व्याकरणशास्त्राच्या अभ्यासाची अपेक्षा आहे त्याचप्रमाणें काव्याचें मर्म पूर्णपणें समजण्यास अलंकारशास्त्राच्या अध्ययनाची अपेक्षा आहे. हें शास्त्र शिकल्यानें मनुष्यास काव्याचें स्वरूप, दोष, गुण, अलंकार इत्यादि जाणण्याची शक्ति येते, त्याची बुद्धि तीव्र होते व त्यास विशेष बारकाईनें विचार करण्याची संवय लागते. ज्यास हें शास्त्र अवगत नाहीं त्यास काव्य वाचून वास्तविक आनंद कदापिही होणार नाहीं. नवीन काव्य करून कीर्ति संपादन करण्याची ज्यास इच्छा असेल त्यानें तर या शास्त्राचें पूर्णपणें अवलोकन अवश्य केलें पाहिजे. अलंकारशास्त्रास व्याकरणशास्त्राचें '**पुच्छ**' असे जें नांव दिलेलें आहे तें अगदीं यथार्थ आहे; आणि यावरून हेंच सिद्ध होतें कीं ज्यास काव्यांचा खरा आस्वाद घ्यावयाची इच्छा आहे अथवा नवीन काव्य रचून यश जोडण्याची इच्छा आहे त्यानें व्याकरणशास्त्राचा अभ्यास पूर्ण झाल्यावर अलंकारशास्त्राचा अभ्यास जरूर केला पाहिजे.

---

## ( ३ ) काव्य म्हणजे काय ?

काव्याचें सर्वांस समाधानकारक लक्षण देणें फार कठीण आहे. प्राचीन व अर्वाचीन त्याचप्रमाणें प्राच्य व पाश्चात्य महापंडितांनीं काव्याचें यथायोग्य लक्षण देण्याचा यथामति प्रयत्न केला आहे. तरी सर्वांस सर्व प्रकारें ग्राह्य होईल अशी व्याख्या एकानेंही केलेली नाहीं.

काव्याच्या लक्षणाविषयीं कोणत्याही दोन अलंकारशास्त्रज्ञांचें एकमत असल्याचें दिसून येत नाहीं. प्राच्यांमध्यें जितका मतभेद आढळतो तितकाच पाश्चात्यांमध्येंही दृष्टोत्पत्तीस येतो. या सर्वांच्या मतांची एकवाक्यता करणें अगदीं अशक्य आहे. एकाच्या मतें इष्टार्थाची अभिव्यक्ति ज्या पद्यावलीनें होते तें काव्य; दुसरा म्हणतो रमणीय अर्थ ज्या शब्दानें अथवा शब्दांनीं प्रतिपादिलेला असतो तें काव्य; कोणी म्हणतो ध्वनि ( व्यंग्यार्थ ) हाच काव्याचा आत्मा आहे, तर कोणी म्हणतो रस हा काव्याचा आत्मा आहे. एकजण वक्रोक्तीस प्राधान्य देतो, तर दुसरा रीतीस ( भाषाशैलीस ) प्राधान्य देतो. कांहीं म्हणतात कीं ज्या वर्णनांत गुण व अलंकार आहेत त्यासच काव्य म्हणावें; व कांहीं म्हणतात कीं वर्णनांत गुण आणि अलंकार असून त्यांतील शब्द व अर्थ देखील निर्दोष पाहिजेत.

कोणाच्या मतें कवीच्या कल्पनांचा प्रवाह जेथें साहजिकपणें चाललेला दृष्टीस पडतो त्या वर्णनास काव्य म्हणावें; व कोणाच्या मतें उत्तम चित्रकार रंगाच्या आणि ( कलमाच्या ) कुंचलीच्या योगानें जें काम करितो तेंच काम एखादा बुद्धिमान् मनुष्य जेव्हां शब्दांनीं करितो तेव्हां त्या शब्दमय चित्रास काव्य म्हणावें.

वरील भिन्न भिन्न मतांपैकीं योग्य कोणतें व अयोग्य कोणतें हें साधक बाधक प्रमाणें देऊन ठरविण्यास या लहानशा ग्रंथांत जागा नाहीं. त्यास एक स्वतंत्र ग्रंथच पाहिजे. तथापि कोणत्याही विद्वानाचें काव्याचें लक्षण घ्या त्यास, अव्याप्ति व अतिव्याप्ति यांपैकीं कोणता तरी एक दोष लागू पडतोच. तेव्हां काव्याचें अगदीं बिनचूक लक्षण देण्याचें धाडस न करितां त्यामध्यें साधारणतः कोणकोणत्या गोष्टी प्राधान्येंकरून पहावयाच्या असतात याचें दिग्दर्शन करणेंच योग्य होईल; व ह्या दृष्टीनें पाहिलें असतां काव्याचें खालीं दिलेलें वर्णन विशेष दोषार्ह होईल असें नाहीं. काव्य म्हटलें म्हणजे तें कविप्रतिभानिर्मित असून त्यांत आल्हादजनकत्व हा गुण असला पाहिजे. काव्यांतील वर्णन कोणत्या तरी रसास धरून असावें आणि त्यांत प्रसाद, माधुर्यादि गुण व अलंकारही असावे; भाषा प्रौढ व सुबोध असावी; शब्ददोष, अर्थदोष इत्यादि दोष नसावेत. साधारणतः शब्दचमत्कारापेक्षां अर्थचमत्कारानेंच वर्णन विशेष रमणीय झालेलें असावें; आणि काव्य वाचतांना सहृदय वाचकाचें अंतःकरण आनंदभरित झालें पाहिजे. हें वर्णन कोणत्याही भाषेंतील काव्यास लागू पडणारें आहे म्हणून यास काव्याचें ‘ सामान्य स्वरूप ’ म्हणतां येईल.

---

## ( ४ ) काव्याचे भेद.

गद्यपद्यात्मक काव्याचे कोणी चार तर कोणी तीन भेद करितात. जगन्नाथ पंडितांनीं काव्याचे उत्तमोत्तम, उत्तम, मध्यम आणि अधम असे चार भेद केलेले आहेत. श्रीसमर्थ रामदासस्वामींनींही कवींचे प्रासादिक, धीटपाठ, पाठ आणि धीट असे चार वर्ग करून काव्य चार प्रकारचें आहे असें दर्शविलें आहे. परंतु साधारणपणें काव्याचे उत्तम, मध्यम व कनिष्ठ असे तीनच भेद करणें अधिक सोईचें आहे. यांचीं लक्षणें खालीं दिलीं आहेत.

**उत्तम काव्यः**—वाच्यार्थापेक्षां व्यंग्यार्थच जेथें अधिक चमत्कारजनक असतो तेथें उत्तम काव्य आहे असें जाणावें. यासच ‘ **ध्वनिकाव्य** ’ अशी संज्ञा आहे. जसें:—

( १ ) केश तूमचे अजून मुक्त नाहिं जाहले ।
बाइ तोंचि ही कशी करील बद्ध आपले ॥
ऐकतांच उत्तरा मनांत फार खोचली ।
वाटलें तिला जणों उरीं सुरीच टोंचली ॥

परशुरामपंत गोडबोले.

तुझी वेणी अद्यापि मोकळी कां बरें! बांधीत कां नाहींस? असा प्रश्न भानुमतीनें द्रौपदीस विचारल्यावरून द्रौपदीची दासी बुद्धिमतिका हिनें भानुमतीस दिलेलें उत्तर वरील पद्यांत आहे. भीमसेनानें दुर्योधनास मारल्यावर तुमचे केश सुटतील व कौरवशतास मारण्याची प्रतिज्ञा अशा रीतीनें पूर्ण झाल्यावर मग भीम द्रौपदीची वेणी घालील इतका विस्तृत अर्थ वरील पद्याच्या प्रथमार्धांत आहे. केवळ शब्दांतून हा अर्थ निष्पन्न होत नाहीं. वाच्यार्थापेक्षां हा अर्थ भिन्न आहे.

( २ ) तन्वंगि ! कां तरि अशी कृश जाहलीस
व्हावी कशास तुज फार विचारपूस ।
सांगेसना सखि ! मना मम हर्ष व्हाया ।
काळें करीं-कथिल सर्व तुझीच जाया ॥

भाषांतर.

एकानें एकीस प्रश्न करून असे सुचविलें आहे कीं तूं जर कृश होण्याचें कारण सांगशील तर मी त्याचा प्रतिकार करीन. तेव्हां तिनें आपल्या उत्तरांत सुचविलें कीं पतीशिवाय इतर पुरुषास कारण सांगणें योग्य नाहीं व तुझ्या हातून दुःखाचा प्रतिकार होणें शक्य नाहीं. ह्यावर त्यानें पुन्हा जो प्रश्न केला त्याचा आशय असा कीं तारुण्य कष्टांत घालून काय उपयोग ? आपलें स्वतःचें व दुसऱ्याचेंही समाधान करणें हेंच संसाराचें सार होय. यास तिनें जें उत्तर दिलें त्याचा रोंख असा कीं जशी माझी अवस्था आहे तशीच तुझ्या बायकोचीही आहे व माझ्या दुःखाचा प्रतिकार करण्याची जशी तुझी इच्छा आहे तशी तुझ्या बायकोच्या दुःखाचा प्रतिकार करण्याची कोणाची तरी तयारी असेलच! तेव्हां आपल्या घराला लागलेंली आग पहिल्यानें विझीव व मग दुसऱ्याच्या घरास लागलेली आग विझविण्याचा प्रयत्न कर. येथें वाच्यार्थ ( शब्दांनीं दर्शविलेला अर्थ ) उद्दिष्ट अर्थाचें ज्ञान करून देण्यास असमर्थ आहे.

(३) ठावा असे मज महेश्वर विप्र बोले
त्याची पुन्हाहि तुज आस असे सुशीले ।
त्याला मनीं रुचि अमंगल आचराया
पाहून हौस नुरते तुज हो म्हणाया ॥ १ ॥
तूं तुच्छ वस्तुविषयीं धर आग्रहास
लग्नांत कंकणयुता तव या करास ।
सोसेल केंवि पहिला ग्रह जो शिवानें
केला जयास वलये अहि त्या करानें ॥ २
जें गाळितें रुधिर चर्महि तें गजाचें ।
हंसादि चिन्हित सुवस्त्र असें वधूचें ॥
साजेल यास वद गांठ कधीं तरीही ।
पूरा विचार करुनी स्वयमेव पाहीं ॥

कुमारसंभव.

गौरीच्या मनाचा ठाव पहाण्याकरितां शंकरानें हें भाषण केलें आहे. हें भाषण उपरोधिक असून संदर्भावरून व बोलण्याच्या झोकावरून विपरीत अर्थाची प्रतीति होते. येथें *व्यंग्यार्थ आल्हादकारक आहे.

**मध्यम काव्य**—जेथें व्यंग्यार्थ फारसा रमणीय नसून वाच्यार्थच विशेष आल्हादकारक असतो तेथें मध्यमकाव्य आहे असें जाणावें. यासच " **गुणीभूत व्यंग्य** " काव्य असें म्हणतात. जसें:—

(१) तूं प्रथम पळालासी प्राण-क्षय-भय धरूनि मनिं मागें
जिंकोनि बद्ध केला दुर्योधन खचर-नायकें रागें ॥
बद्ध-विमुक्त सुयोधन तेव्हां त्वां कीं धनंजयें केला ॥
राधेय अन्य तूं तो अन्यचि जाणों पळोनि जो गेला ।
त्या गोग्रहप्रसंगीं भीष्म-द्रोणादि सर्व एकानें-
केले भग्न दशा ते तुमची क्षण आयको नये कानें ॥
तेव्हां त्वां तो अर्जुन राधेया कां न जिंकिला शस्त्रें ।
अस्त्रें गेलीं होतीं कोठें ? नेलीं हिरोनि जैं वस्त्रें ॥

मोरोपंत.

---

* अभिधा, लक्षणा व व्यंजना याविषयीं जरूर ती माहिती माझ्या काव्य-दोष-दीपिकेंत दिली आहे ती पहावी.

या ठिकाणीं शल्यानें केलेल्या कर्णाच्या उपहासामध्यें जो ध्वन्यर्थ आहे त्या-पेक्षां वाच्यार्थ अधिक रमणीय आहे.

( २ ) निज दयितेनें पिउनी ठेविलें प्रेमें मधु जें त्यातें ।
प्राशी भृंग फुलांतुनि; होतें तेंच पात्र दोघातें ॥
स्पर्शसुखानें मिटले जीचे डोळे त्या हरिणीला ।
कृष्णसारही खाजवि शृंगें, प्रेमा तीचा त्याला ॥
कमलरजांचा वास जया तें शोषुन जल शुंडेनें ।
करेणु देई मत्त गजाला प्राशाया प्रेमानें ॥
आपण खाउनि उरला अर्धा कमल-देंठ देऊन ।
चक्रवाकही राखी प्रेमें निज जायेचा मान ॥

कुमारसंभव.

येथें पशुपक्ष्यांच्या जोडप्यांच्या प्रेमलीलांचें आल्हादकारक वर्णन आहे.

( ३ ) तिलक गोजिरे गोंदवणाचे हिरव्या रंगाचे ।
शुभ्र मुखावर तुषार कुठल्या दिव्य तरंगाचे ॥
निळया नभीं वर शुभ्र तारका जमवितात मेळ ।
शुभ्रमुखनभीं इथें निळयाशा तारांचा खेळ ॥
इचा उद्यांचा धनी कोण हें ठरवावें म्हणुनी ।
पुण्याईचें गणित करित विधि दशांश चिन्हांनीं ॥

वाग्वैजयंती.

हें एका मुग्ध बालिकेच्या कपाळावरील गोंदण्याचें सुंदर वर्णन आहे.

**कनिष्ठकाव्यः**—जेथें व्यंग्यार्थ मुळींच दिसून येत नाहीं म्हणजे जेथें अर्थ चमत्कारापेक्षां शब्दचमत्काराकडेच विशेष लक्ष दिलेलें असतें तेथें कनिष्ठकाव्य आहे असें जाणावें. त्यालाच '**चित्रकाव्य**' असें ह्मणतात.

उदाहरणें:—

तो दशकंठ अकुंठ विसां भुजिं तें विषकंठ-धनू उचली ॥
कष्टत कोष्ठवरी द्विज-ओष्ठहि चावुनि ज्याजरिनें खचली ॥
चाप उरीं दडपे झडपे मग आनन-पंक्ति धरे रचली ॥
वासुनि दांत मुखांत दहांत पडे, मति गाढ तमीं पचली ॥

वामन.

**वंशी नादनटी तिला कटि-तटी खोंवूनि पोटीं पटीं**
**कक्षे वामपुटीं स्वश्रृंगनिकटीं वेताटिही गोमटी ।**
**जेवी नीरतटीं तरूतळवटीं श्रीशामदेहीं उटी**
**दाटी व्योमघटीं सुरां, सुखलुटी घेती जटी धूर्जटी ॥**

वामन.

येथें अर्थचमत्कारापेक्षां शब्दचमत्काराकडेच कवीनें विशेष लक्ष पुरविलें आहे असे दिसतें. वरील पद्यांत व्यंग्यार्थ मुळींच नाहीं.

---

## ( ५ ) रसनिरूपण.

काव्यास कोणी कोणी मनुष्याची उपमा देतात. ज्याप्रमाणें मनुष्यास देह, आत्मा, वृत्ति, रीति, गुण, दोष, अलंकार असतात त्याचप्रमाणें काव्यासही आहेत; शब्द व अर्थ हे दोन्ही मिळून काव्याचा देह होतो. रस काव्याचा आत्मा होय. त्याचप्रमाणें उपनागरिका, परुषा व कोमला ह्या तीन वृत्ति; वैदर्भी, गौडी व पांचाली ह्या तीन रीति; माधुर्य, ओज, प्रसाद हे गुण; कर्णकटुत्व, क्लिष्टता, अश्लीलता इत्यादि दोष; यमक, अनुप्रास, उपमा, रूपकादि अलंकार होत. एकाद्या रसास अनुकुल अशा वर्णरचनेस वृत्ति असें म्हणतात व पदरचनेस रीति असे म्हणतात. वस्तुतः वृत्ति आणि रीति ह्यांच्यामध्यें फारसा फरक नसून त्या माधुर्यादि गुणांच्या व्यंजक आहेत. प्रधान रसाच्या उत्कर्षास कारणीभूत हो-णारा जो धर्म त्यास गुण असें म्हणतात. वामनादिकांच्या मतें श्लेष, प्रसाद, समता, माधुर्य, सुकुमारता, अर्थव्यक्ति, उदारता, ओज, कांति आणि समाधि असे गुणांचे दहा भेद आहेत; परंतु मम्मटाचार्यांच्या मतें ह्या दहाही गुणांचा माधुर्य, ओज व प्रसाद या तीन गुणांमध्येंच अंतर्भाव होतो. रसाची हानि न करितां मुख्य अर्थाला ज्याच्या योगानें बाध अथवा कमीपणा येतो त्यास दोष असें म्हणतात. हे दोष बरेच आहेत. वाक्यांस शोभा आणणारा जो धर्म त्यास अलंकार असें म्हणतात. अलंकारांचे दोन भेद आहेत. ( १ ) शब्दालंकार, ( २ ) अर्थालंकार. वाक्यांतील विशिष्ट शब्दरचनेपासून जेव्हां ऐकणारांस आनंद होतो अथवा त्यांचें मनोरंजन होतें तेव्हां शब्दालंकार होतो. अर्थ न समजतां केवळ काव्य ऐकूनच अज्ञानी व रसानभिज्ञ लोकांच्या चित्तवृत्ति तल्लीन होऊन जातात व ह्यामुळेंच त्यांच्यांत ह्याची फार चहा असते. प्रधान अर्थास शोभा

आणणारा जो धर्म त्यास अर्थालंकार असें म्हणतात. हे अलंकार पुष्कळच आहेत. ह्यांचें सविस्तर विवेचन पुढील प्रकरणांत केलें आहे. काव्यांतील अलंकारांचेंच या ग्रंथांत विवेचन करावयाचें असल्यामुळें त्याच्या गुणदोषादिकांविषयीं सविस्तर विचार न करितां त्यांचा येथें उल्लेख मात्र केला आहे. अलंकारशास्त्र शिकणारांस रसांसंबंधी थोडीशी माहिती असणें इष्ट असल्याकारणानें त्यांचें संक्षेपानें खालीं निरूपण केलें आहे.

**रसः**—विभाव, अनुभाव आणि व्यभिचारिभाव या सर्वांच्या व्यापारामुळें व्यक्त झालेल्या कोणत्याही एका स्थिर चित्तवृत्तीच्या उद्रेकास रस असें म्हणतात. ह्या स्थिर व उत्कट चित्तवृत्तीस स्थायिभाव असें नांव आहे. कारण ह्या मनोवृत्तींचा कांहीं कालपर्यंत जरी लोप झाला तरी त्यांचा मनामध्यें वारंवार उदय होतो. स्थायिभावांच्या उत्पत्तीच्या कारणांस विभाव असें म्हणतात. हे वासनारूपानें अति सूक्ष्म स्थितींत असलेल्या स्थायिभावांच्याठायीं आस्वाद–योग्यता आहे अशी मनामध्यें भावना उत्पन्न करितात म्हणून यांस विभाव असें नांव दिलेलें आहे. हे विभाव दोन प्रकारचे आहेत-( १ ) आलंबनविभाव व ( २ ) उद्दीपनविभाव. ज्या कारणांचा अवलंब अथवा आश्रय करून रत्यादि स्थायिभावांची उत्पत्ति होते त्या स्त्रीपुरुषरूपजनक कारणांस आलंबनविभाव असें म्हणतात. नायकाचे ठायीं रसोत्पत्ति वर्णिली असेल तर नायिका आलंबनविभाव व नायिकेच्या ठायीं रसोत्पत्ति वर्णिली असल्यास नायक आलंबनविभाव आहे असें जाणावें. रत्यादिकांचा संचार झाल्यावर ज्या कारणांनीं त्याची पुष्टि होते त्या पुष्पालंकार, उद्यानविहार, चंद्रोदयादि परिपोषक कारणांस उद्दीपनविभाव असें म्हणतात. स्थायिभावापासून उत्पन्न झालेल्या कार्यास ( कायिक, वाचिक, मानसिक व्यापारास ) अनुभाव असें म्हणतात. हे अनुभवाचे विषय असल्यामुळें ह्यांस अनुभाव असें अन्वर्थक नांव दिलेलें आहे. ह्यांच्यामध्यें कटाक्षभुजोत्क्षेपादि शरीरचेष्टा व हावभाव आणि स्तभ, स्वेद, रोमांच, स्वरभंग, कंप, वैवर्ण्य, अश्रु व प्रलय[1] हे आठ सात्विकभाव, ह्यांचा समावेश होतो. स्थायिभावांच्या कार्यांच्या उत्पत्तीस साहाय्यभूत होणारे जे भाव त्यांस सहकारि अथवा व्यभिचारिभाव असें म्हणतात. यांच्यायोगानें रत्यादिकांचा शरीरांत संचार होतो म्हणून यांस संचारिभाव असेंही दुसरें नांव आहे. हे व्यभिचारिभाव तेहतीस आहेत. त्यांचीं नांवें:—निर्वेद[2],

---

१ शरीरचेष्टाचा निरोध होणें; बेशुद्धि. २ आपदा, चिंता, दैन्यादिकांमुळें उत्पन्न झालेली स्वतःविषयीं तुच्छत्वबुद्धि.

ग्लानि, शंका, असूया, मद, श्रम, आलस्य, दैन्य, चिंता, मोह, स्मृति, धृति, व्रीडा[1], चपलता[2], हर्ष, आवेग[3], जडता, गर्व, विषाद, औत्सुक्य, निद्रा, अपस्मार[4], सुप्त[5], प्रबोध, अमर्ष[6], अवहित्थ[7], उग्रता, मति[8], व्याधि, उन्माद, मरण[9], त्रास आणि वितर्क. स्थलसंकोचामुळें या सर्वांचीं लक्षणें येथें देतां येत नाहींत.

विभाव, अनुभाव व व्यभिचारिभाव ह्या सर्वांच्या समुदायापासून उत्पन्न झालेल्या स्थायिभावांचा अनिर्वचनीय आस्वाद घेतल्यानें रसनिष्पत्ति होते हें वर सांगितलेंच आहे. ह्या रसांच्या संख्येविषयीं बराच मतभेद दिसून येतो. कित्येक ग्रंथकार शृंगार हाच काय तो एक रस आहे असें मानतात. कित्येक शृंगार, हास्य, करुण, रौद्र, वीर, भयानक, बीभत्स आणि अद्भुत असे आठ रस आहेत असें प्रतिपादन करितात. वरील आठ रसांत शांतरसाची भर घालून बहुतेक अलंकारशास्त्रज्ञ रस नऊ आहेत असें स्थापन करितात. कित्येकांनीं वरील नवरसांत श्रद्धा (भक्ति) स्थायिभावक भक्तिरस, स्नेहस्थायिभावक प्रेयान् अथवा वत्सलरस, धैर्यस्थायिभावक दांतरस, गर्वस्थायिभावक उद्धतरस, अभिलाषस्थायिभावक लौल्यरस, स्पृहास्थायिभावक कार्पण्यरस इत्यादि नवीन रसांचा समावेश करून रसांची संख्या बरीच फुगविली आहे; व ती ह्यापेक्षांही बरीच मोठी करितां येण्याजोगी आहे. परंतु शृंगार हाच काय तो एक रस असें मानणें जितकें गैरसोईचें आहे तितकेंच नवीन नवीन रस उत्पन्न करून रसांची संख्या विनाकारण जास्त वाढविणें हेंही गैरसोईचें आहे ही गोष्ट ध्यानांत आणिली असतां भरतमुनीनें सांगितलेल्या व मम्मट जगन्नाथादि अलंकारशास्त्रज्ञांनीं सूक्ष्मरीतीनें परीक्षण करून ग्राह्य केलेल्या नवविध रसांसच प्राधान्य देणें प्रशस्त दिसतें.

आतां कित्येकांचें असें म्हणणें आहे कीं, संस्कृत सारस्वतांत भक्ति व वत्सल या दोन रसांस थारा नसल्यामुळें व ह्यांची रसांमध्यें गणना करणें जरूर असल्या-

---

१ दुराचारामुळें आलेला धीटपणाचा अभाव; मनाची संकोचवृत्ति. २ स्वच्छंदाचरण; लंडपणा. ३ अनर्थातिशयामुळें उडालेली धांदल किंवा गडबड. ४ अतिदुःखानें झालेला स्मृतिनाश. ५ निद्रावस्थेमध्यें विषयानुभव होणें; स्वप्न. ६ अपमान, शिवीगाळ इत्यादिकांमुळें आलेला व दीर्घकालपर्यंत टिकणारा क्रोध. ७ हर्षादि विकार, लज्जेमुळें अथवा विनयानें, अन्य कार्यांत निमग्न असल्याचें दाखवून, लपविणें. ८ शास्त्रोपदेशाप्रमाणें अर्थाचा निर्धार करणें. ९ रोगादिकांपासून मरणापूर्वी येणारी मूर्च्छारूप अवस्था.

मुळें मराठी वाङ्मयांत त्यांस रसांमध्यें अवश्य स्थान मिळून भक्तिरसाची तर शिरोभागीं योजना झाली पाहिजे. परंतु संस्कृत भाषेत त्यास स्थान नाहीं हें म्हणणेंच अगोदर बरोबर नाहीं. संस्कृतांत भक्ति, वात्सल्य, स्नेह, मैत्री व आबंध हे पांच रतिस्थायिभावाचेच भेद आहेत असें मानतात. अनुत्तमाची उत्तमाचे ठायीं जी रति तिला भक्ति म्हणतात; उत्तमाची अनुत्तमाचे ठायीं जी रति तिला वात्सल्य असें म्हणतात; बरोबरीच्या दोन मनुष्यांमध्यें परस्परांवर असणाऱ्या रतीस स्नेह अथवा प्रेम असें म्हणतात; हेंच प्रेम जेव्हां निष्काम व सद्हेतुप्रेरित असतें तेव्हां त्यास मैत्री असें म्हणतात; आणि सचेतनांची अचेतनाचे ठिकाणीं असलेल्या रतीस आबंध असें म्हणतात. ह्यांपैकीं पहिल्या दोहोंस जर रस असें नांव दिलें तर बाकीच्या तिहींसही रस अशी संज्ञा देणें प्राप्त होईल. त्याचप्रमाणें भक्तीचे अनेक प्रकार असल्यामुळें तिच्या प्रत्येक प्रकारास रस अशी संज्ञा देणें भाग पडेल; व अशी परंपरा लावीत गेल्यास रसांस असंख्यत्व येईल. असें होऊं नये म्हणून संस्कृत अलंकार-शास्त्रकारांनीं भक्ति, वात्सल्यादि वर निर्दिष्ट केलेल्या पांच भावांचा समानधर्मत्वामुळें एकाच स्थायिभावांत समावेश केला हें योग्यच आहे. हा स्थायिभाव ‘ रति ’ आहे हें मागें सांगितलेंच आहे. स्त्रीपुरुषांची परस्परांवर साभिलाष प्रीति असा रति या शब्दाचा मुख्यार्थ आहे. भक्ति ( देव, गुरु, नृप इत्यादिकांचे ठायीं रति ), वात्सल्य, मैत्री वगैरे भावांबद्दल केलेला रति शब्दाचा प्रयोग अप्रधान ( गौण ) होय. वरील भावांचा अथवा उत्कृष्ट चित्तवृत्तींचा अंगत्वेंकरून रतिस्थायिभावांत समावेश झाल्यामुळें शृंगाररसास ‘ मूर्धाभिषिक्त ’ ठरवून त्यास ‘ शुचि ’ ‘ उज्वल ’ इत्यादि विशेषणें कित्येकांनीं लाविलीं आहेत तें योग्यच आहे.

भक्ति हा निराळा रस न मानितां तिचा शांतरसांत अंतर्भाव होतो असें कित्येकांचें म्हणणें आहे. परंतु हें म्हणणें योग्य नाहीं. कारण भक्ति ही अनुरागापासून उत्पन्न होत असल्यामुळें वैराग्यप्रधान शांतरसांत तिचा समावेश करणें अप्रशस्त होय. कारण अनुराग व वैराग्य ह्यांच्यामध्यें स्वाभाविक विरोध आहे.

वरील विवेचनावरून वाचकांच्या लक्षांत आलेंच कीं रसाचे नवांपेक्षां जास्त भेद मानण्यास सुप्रसिद्ध संस्कृत अलंकारशास्त्रकारांची संमति नाहीं. भक्तीचा कित्येक निर्वेदस्थायिभावांत व कित्येक रतिस्थायिभावांत समावेश करितात. परंतु वैराग्य व भक्ति यांचा वर सांगितल्याप्रमाणें परस्पर विरोध असल्यामुळें व रति शब्दाचा संस्कृत अलंकारशास्त्री जितका व्यापक अर्थ समजत होते

तितका मराठींत समजला जात नसून रति म्हणजे स्त्रीपुरुषांचें परस्परांवर विषय-वासना-प्रेरित प्रेम असा संकुचित अर्थच रूढ असल्यामुळें भक्तीस निराळा रस मानण्याची अलीकडे महाराष्ट्रीयांची प्रवृत्ति झाली आहे. अशी प्रवृत्ति होण्याचें कारण महाराष्ट्रांतील साधुसंतांचे ग्रंथ होत. वामनासारख्या पूर्ण संस्कृताभिमानी पंडितावर देखील भक्तीचा इतका पगडा बसला होता कीं त्यास तिची गणना रसामध्यें करण्याची आवश्यकता भासूं लागली होती हें त्याच्या एका श्लोकावरून व्यक्त होतें. तो श्लोक असाः—

**दे मल्लां रस रौद्र, अद्भुत नरां, शृंगार नारीजनां ॥**
**गौळ्यां हास्य, नृपांस वीर, करुणा मातापित्यांच्या मना ॥**
**कंसालागिं भयानकाख्य रस दे, बीभत्स मूढां भ्रमें ॥**
**संतां शांत रस, स्वभक्तिरस तो दे यादवां या क्रमें ॥**

वरील श्लोकामध्यें भक्तीसुद्धां एकंदर दहा रसांचा उल्लेख केला आहे. तेव्हां वामनासारख्या सर्वमान्य पंडितांच्या व दुसऱ्या अनेक कवींच्या विचारसरणीस व लोकांच्या सांप्रतच्या प्रवृत्तीस अनुसरून ह्या ग्रंथांतही भक्तीची रसांमध्यें स्थापना केली आहे. ह्या दहा रसांचीं पुनः एकवार नांवें, त्यांचे स्थायिभाव व उदाहरणें खालीं दिलीं आहेत.

शृंगार, हास्य, करुण, रौद्र, वीर, भयानक, बीभत्स, अद्भुत, शांत आणि भक्ति हे दहा रस व त्यांचे रति, हास, शोक, क्रोध, उत्साह ( आवेश ), भय, जुगुप्सा ( कंटाळा, किळस ), विस्मय ( आश्चर्य), निर्वेद ( कित्येकांच्या मतें शम ), आणि श्रद्धा हे अनुक्रमें स्थायिभाव आहेत. या रसांचीं क्रमानें उदाहरणें:—

**शृंगारः**—शृंग म्हणजे कामवासनेचा उद्भव. विषयवासनेमुळें प्रकट झालेल्या स्त्रीपुरुषांच्या मनोवृत्ति जेव्हां उत्कटावस्थेप्रत जाऊन पोहोंचतात तेव्हां **शृंगार** रस होतो. ह्याचे **संभोग** व **विप्रलंभ** असे दोन भेद मानितात. संभोगशृंगारामध्यें नायक व नायिका ह्यांच्या परस्पर दर्शन, आलिंगन, चुंबनादि उपभोगांचें वर्णन केलेलें असतें. विप्रलंभ शृंगारामध्यें नायक व नायिका यांचे ठायीं रतीचा उत्कर्ष झाला असूनही अभीष्ट हेतु सिद्धीस जात नाहीं, परंतु उभयतांनाही भावी सुखप्राप्तीची आशा आहे असें वर्णन असतें.

संभोग शृंगाराचीं उदाहरणें:—

१ लें—अशी ते बुझावूनि रंभोरु हातें ॥
तिच्या धूतसे हो मुखांभोरुहातें ॥
उटी लावुनी वाटल्या केशराजी ॥
स्वहस्तांबुजीं विंचरी केशराजी ॥
२ रें—पलंगावरी रुक्मिणीच्या सु-सेजे ॥
बसे कृष्ण, ते त्यास सेवीतसे जे ॥
उभी सुंदरी ढाळिते चामरातें ॥
मनीं जे शिवे मीपणा पामरातें ॥

वामन.

३ रें—प्राणप्रिये करि सहास कटाक्षवृष्टि
या सेवकावर नको करुं वक्रदृष्टि ।
बोले मशीं मधुर मंजु उदार वाणी
सेवेसि तत्पर तुझ्या असती स्वपाणी ।

परशुराम भाऊ गोडबोले.

विप्रलंभ शृंगाराचीं उदाहरणें:—

( १ ) मी मंदभाग्य चुकल्या हरिणीप्रमाणें
रानावनांत भटके बहु दीनवाणें ।
आक्रोशहीं करितसे तुज आठवोनी
संतापशांति करि बोलुन गोड वाणी ।

ल. ग. लेले शास्त्री.

( २ ) ध्यानीं धरूनि तिजला मन हें निरीक्षी
दृष्टीपुढें दिसतसे मग ते मृगाक्षी ।
आहे जणों जवळि हे गजराजगामी
ऐसाच भाव तंव बोलतसे तिला मी ॥

रघुनाथ पंडित.

( ३ ) रात्रीं क्षणैक तिसऱ्या प्रहरांत डोळा
लागे; अशांत उठते सहसाच बाला ।
हे नीळकंठ ! पळतोस कुठें म्हणून
कंठीं धरूं बघतसे सति आवळून ॥

कुमारसंभव.

**हास्यः**—विचित्र अभिनय, भाषण, वेष ( पोषाख ) इत्यादिकांपासून हा रस उत्पन्न होतो. उदाहरणें:—

१ लें:—**फेंडा हालवितो, उरास बघतो जो वांकडें चालतो ॥**
**नेत्रें चाळवितो, डसोनि पळतो, जो हेंगडें बोलतो ॥**
**ऐसा मद्यप-वेशधारक हरी पाहूनि गोपांगना ॥**
**अन्योन्या वर्नि, हांसुनी गद्गदां, देताति आलिंगना ॥**

गंगाधरशास्त्री.

२ रें:—**येतो विष्णु गृहा असें परिसुनी सर्पास केले गुण**
**वेढोनी गजचर्म सत्वर शिवें केलें समुत्थापन ।**
**देखोनी गरुडा सकंप पडला धाकें फणी भूवरी**
**पायीं कृत्ति गळे, त्रपा हरिसवें तो त्रस्त शंभू वरी ॥**

भाषांतर.

**करुणः**—अनावर शोकापासून करुणरसाची उत्पत्ति होते. याचीं उदाहरणें:—

१ लें:—**हा ! हा ! देवी हृदय फुटतें देह माझा गळाला ॥**
**वाटे शून्य त्रिभुवन मला अंतरात्मा जळाला ॥**
**या आत्म्यानें किति तरि सदा दुःखभारा धरावें ॥**
**मोह व्यापी फिरफिरुनि म्यां काय आतां करावें ॥ १ ॥**

परशुरामतात्या गोडबोले.

( २ ) **सुधा-तुल्यें हास्यें करुनि अभिषेकास मजला**
**कटाक्षांनीं वर्षे जणु मजवरी नीलकमला**
**मृगाक्षी मांगल्य-प्रद विधि-विधात्री सुवदना**
**न सोडी चित्तातें क्षणभरिहि ती कुंदरदना ॥**

**बसोनी पर्यंकीं दयितगुण गातां निजमुखें**
**दिनें नाहीं झालीं बहु निरसुनीयां तुज सखे ।**
**न कां आजी देशी प्रतिवचनही एक मजला**
**असा कां माझ्याशीं अवचित अबोला धरियला ॥**

कृष्णशास्त्री चिपळूणकर.

२ रें:—जीवनावीण मीन जैसे। गोकुळींचे लोक तळमळती तैसे। यशोदेसी मूर्च्छा येतसे। धांवतसे रथापाठीं ॥१॥ माझे विसा-विया जगज्जीवना। तुझें मुख पाहों दे मनमोहना। येई मज प्रेमाचा पान्हा। पाजूं कोणा सांग पां ॥ २ ॥ माझे सांवळे कान्हाई। उभी राहें कृष्णाबाई। तुजवेगळ्या दिशा दाही। वोस झाल्या मज आतां ॥ ३ ॥ अवघ्या गोपी आकांत करीत। गोकुळा चालल्या समस्त। एक म्हणती आग त्वरित। लावा आतां गोकुळा ॥ ४ ॥

श्रीधर.

रौद्रः—अति क्रोधाच्या आवेशापासून रौद्ररसाची उत्पत्ति होते. उदाहरणें:—

१ लें:—अवो कैकेयी हें काय ॥ केलें तुवां हाय हाय ॥
न म्हणवे तुज माय ॥ जन्मोजन्मीं वैरिणी ॥ १ ॥
सर्व जगदभिराम ॥ वना धाडिला तो राम ॥
केलें विख्यात कु-नाम ॥ कीं हे पतिमारिणी ॥ २ ॥
तुझ्या वधें न अधर्म ॥ तुज मारावें हा धर्म ॥
परि निंदील तें कर्म ॥ राम, पापकारिणी ॥ ३ ॥
नाहीं तरी प्राण-आज्य ॥ तुझें घालुनियां प्राज्य ॥
जाळुनियां सामराज्य ॥ दाखवितों करणी ॥ ४ ॥

वामन.

२ रें:—प्रस्फुरदधर-दल प्रभु बलभद्र म्हणे खरेंचि सांगा रे ॥
कोठें तो कपट-पटु गांठितसे जो पटांत आंगारे ॥ १ ॥
कोठें रथ, मुसळ पुरे, कवच कशाला, धनुष्य राहों द्या ॥
वत्सेला निज-धर्षण-कर-खळ-दंडोत्सवासि पाहों द्या ॥२ ॥

मोरोपंत.

वीरः—उत्साहातिशयामुळें वीररसाची उत्पत्ति होते. याचे कोणी 'युद्धवीर ' दानवीर ' व ' दयावीर ' असे तीन भेद मानितात व कोणी वरील तीन भेदांत 'धर्म-वीराची' भर घालून चार भेद कल्पितात. वास्तविक पाहिलें असतां नुसत्या ' वीर ' या शब्दानें युद्ध-वीराचीच कल्पना मनांत येते. दान, दया व धर्म यांची

गणना भावांमध्यें होतेच. हे वीररसाचे भेद आहेत असे मानिल्यास त्याचे 'पलायनवीर', ' सत्यवीर', ' पांडित्यवीर ', 'बलवीर', 'क्षमावीर' इत्यादि अनेक भेद मानणें प्राप्त होईल. यास्तव ' वीर ' शब्दाचा अर्थ या ग्रंथांत युद्धवीर असाच घेतला आहे.

**वीररसाचीं** उदाहरणें—

१ लें:—ते मारितील मज कीं त्यांला मारीन मी, स्वबळ जाणें ॥
कृष्णाला कर्ण न भी, तनु टाकुनि एकदां असे जाणें ॥ १ ॥
दोघांची काय कथा जरि कृष्णार्जुन सहस्र येतील ॥
तरि माझे शर त्यांच्या प्राणधनातें हिरोनि घेतील ॥ २ ॥

मोरोपंत.

२ रें:—देवेंद्रप्रमुखामरांस अभया देऊनि सांभाळिते ॥
संग्रामी अपुल्या प्रतापशिखिनें शत्रूसहि जाळिते ॥
झाले जे रविच्या कुळांत नृपती वैवस्वतापासुनी ॥
त्यांशीं युद्ध घडेल; काय दुसरें धन्यत्व तें याहुनी ॥ १ ॥

परशुरामपंत गोडबोले.

**भयानकः**—उदाहरणें:—

१ लें:—बोले बृहन्नडे हें कुरुबळ कल्पांतसिंधुसें गमतें ॥
ने रथ पुरांत, माझें मन नयनहि पाहतां बहु भ्रमतें ॥ १ ॥
दुर्योधन, दुःशासन, कर्ण, कृप, द्रोण, भीष्म ज्या कटकीं ॥
त्यांत मरेनचि शिरतां कांट्यांवरि घालितां चिरे पट कीं ॥ २ ॥

मोरोपंत.

२ रें:—शिळा धूळि व्यालाशनि विटपि वर्षोपळ घन ॥
क्षणामध्यें वर्षे, अपरिमित जैसें जळ घन ॥
क्षय प्रासादांचा करि खळ, पडे गाढ तमही ॥
पुरी कांपे, जेंवि त्रिपुर असतां वाढत मही ॥ १ ॥

मोरोपंत.

३ रें:—कडकडकड चापीं जेधवां शब्द झाला ॥
तडतड विधि-अंड त्रास दे अब्ज-जाला ॥
तडफडि फणिराणा कंप भूमंडळाला ॥
खडबडि कनकाद्री धाक आखंडलाला ॥

वामन.

**बीभत्सः**—उदाहरणें:—

१ लें:—**कोठें अंगुलि, हस्त, पाद, रदन त्वङ्मूर्धजांत्रें शिरें ॥**
**कोठें अर्ध कलेवरें गलदसृक्पूरें महाभीकरें ॥**
**कोठें कुंडल, निष्क, हार, कटकें त्र्युस्त्यत्किरीटांगदें ॥**
**ऐसें तेथ धरातळीं निरखिलें रामानुजें सांगदें ॥ १ ॥**

मोरोपंत.

२ रें:—**गोचर्मांबर साजुक ऐसें पांघरला उफराटें ॥**
**मस्तकिं मासे भाराMध्यें मत्स्य भक्षितो वाटे ॥ १ ॥**
**लक्ष मक्षिका घोंगावति वरि पोर लागती पाठीं ॥**
**लोकामाजी हेगराज तो देखुनियां निजदृष्टीं ॥ २ ॥**

उद्धवचिद्घन.

**अद्भुतः**—उदाहरणें:—

१ लें:—**गलित तुलशिपत्रा रुक्मिणी त्यांत टाकी ॥**
**तंव घनवट बैसे पारडें भूतटाकीं ॥**
**नयनिं विधिसुताच्या पातलें प्रेमपाणी ॥**
**चकित निज मनीं तो राहिला सारपाणी ॥ १ ॥**

रामात्मज.

सत्यभामेनें नारदाला कृष्णदान केलें. त्या वेळीं त्याच्या इतर सर्व बायकांनीं हरकत घेतल्यावरून कृष्णाचे भारंभार सोनें मला दिल्यास मी त्यास सोडतों असें नारदानें सांगितलें. तेव्हां कृष्ण एका पारड्यांत बसला व दुसऱ्यांत त्याच्या सर्व बायकांनीं आपले सुवर्णालंकार टाकिले; परंतु तें खालीं येईना. नंतर रुक्मिणीनें एक तुलसीपत्र त्यांत टाकल्याबरोबर पारडें खालीं आलें व सत्यभामेचा गर्व अशा रीतीनें हरण झाला असें वरील पद्यांत वर्णन आहे.

२ रें:—**जे जळांत बुडणार तीव्र ते ॥**
**थोर पर्वत अवो पतिव्रते ॥**
**सागरीं तरति, सेतु-वाट ते ॥**
**हे अतर्क्य करणीच वाटते ॥ १ ॥**

परततां जलधीवरि पाहतें ।
तरति पर्वत विस्मित राहतें ॥
जळ तळीं, वरि हो धरणी, सये ।
करि, नसे तुलना करणीस ये ॥ २ ॥

वामन.

**शांतः**—शांतरसाचा स्थायिभाव निर्वेद आहे हें मागे सांगितलेंच आहे. निर्वेद हा व्यभिचारि भावही आहे. परंतु यांच्यामध्यें फरक एवढाच कीं, तत्त्व-ज्ञानापासून उत्पन्न झालेल्या वैराग्यास निर्वेद स्थायिभाव म्हणावें व आपदा, ईर्षादि कारणांपासून उत्पन्न झालेल्या उद्वेगास निर्वेद व्यभिचारभाव म्हणावें. कित्येकांच्या मतें या रसाचा **शम** हा स्थायिभाव आहे. शम व निर्वेद यांच्या अर्थामध्यें जरी थोडा फरक आहे तरी शम हा शब्द येथें निर्वेदपरच आहे असें जाणावें. उदाहरणें:—

१ लें:—ज्यांचें पात्र पवित्र पाणियुग हें, भिक्षान्न जे भक्षिती ॥
ज्यांचें वस्त्र दिशा, जयां मल नसे, शय्या जयांची क्षिती ॥
ज्यांला दैन्य नसे, विरक्ति-वनिता जे तीसवें नांदती ॥
ज्यांला कर्मकलाप बांधित नसे, ते धन्य येणें रिती ॥१॥

वामन.

२ रें:—एक शरीर अहं ममतास्पद तें विकलें तुजलागिं हरी ॥
आत्म-सुवर्ण चराचरमुद्रित घेतलें वित्त दिगंतभरीं ॥
त्यांत जिणें मरणें सुखदुःखहि चिंतन कां मज या उपरी ॥
आपण अश्व जसें विकलें मग एक बसो अथ दोन वरी॥१॥

वामन.

**भक्तिः**—उदाहरणें:—

१ लें:—घेंई घेंई माझे वाचे । गोड नाम विठोबाचें ॥ १ ॥
मना तेथें धांव घेंई । राहीं विठोबाचे पायीं ॥ २ ॥
डोळे तुह्मी घ्या रे सुख । पहा विठोबाचें मुख ॥ ३ ॥
तुह्मी आइका रे कान । माझे विठोबाचे गुण ॥ ४ ॥
तुका म्हणे जीवा । नको सांडूं या केशवा ॥ ५ ॥

तुकाराम.

२ रें:—छळाल कृपणासि कां अजि दयानिधे, कांपिती ॥
भटासि भट संगरीं, परि न कातरा दापिती ॥
कराल तितुकी कृपा बहु अहो शरण्या तमीं ॥
बुडोनि शरणागत श्रमतसें अरण्यांत मी ॥ १ ॥

मोरोपंत.

वात्सल्यास ज्यांची रसपदवीला पोहोंचविण्याची मनीषा आहे त्यांची जिज्ञासा तृप्त करण्याकरितां खालीं दोन उदाहरणें दिलीं आहेत.

१ लें:—देखोनि दंत-मुकुला अनिमित्तहासें ॥
ते बोबडे वच तसे परिसोनि खासे ॥
अंकावरी बसवुनी तनया पहाती ॥
त्यांच्या रजें मळति ते जगिं धन्य होती ॥ १ ॥

परशुरामतात्या गोडबोले.

२ रें:—मिठी घाली कंठीं, स्वमुखिं मुख तें चुंबित असे ॥
स्रवे आनंदाश्रू, निढळ निढळा लावित असे ॥
पुन्हा हुंगी माथा, नवल अधर-स्फुंदन घडे ॥
गळा दाटे बाष्पें, सुखमय पुन्हा मूर्च्छित पडे ॥ १ ॥

वामन शिष्य.

अलंकारशास्त्राचें अध्ययन करणारांस वरील माहिती असणें जरूर असल्यामुळें ती या प्रकरणांत थोडक्यांत दिली आहे.



# अलंकारचंद्रिका.



## (१) शब्दालंकार.

काव्यालंकाराचे मुख्य दोन भेद आहेत. पहिला शब्दालंकार व दुसरा अर्थालंकार. ह्यांपैकीं शब्दालंकारांचें विवेचन या ग्रंथांत पहिल्यानें केलें आहे.

वाक्यांतील विशेष शब्दरचनेपासून जेव्हां मनास आनंद होतो तेव्हां शब्दालंकार होतो. ह्याचे सहा प्रकार आहेत. ते येणेंप्रमाणें:—( १ ) **अनुप्रास,** ( २ ) **यमक,** ( ३ ) **श्लेष,** ( ४ ) **वक्रोक्ति,** ( ५ ) **पुनरुक्तवदाभास,** आणि ( ६ ) **चित्र.** यांचीं लक्षणें खालीं दिलीं आहेत.

### ( १ ) अनुप्रास.

एकाद्या विशिष्ट रसास अनुकूल अशा एक किंवा अनेक व्यंजनांची चमत्कृतिजनक आवृत्ति जेथें होते तेथें अनुप्रास अलंकार होतो. ह्याचे तीन प्रकार आहेतः—**वृत्त्यनुप्रास, छेकानुप्रास** आणि **लाटानुप्रास.**

( १ ) जेथें एकाच पद्यांत एक किंवा अनेक वर्णांची ( अर्थात् व्यंजनांची ) अनेकवार आवृत्ति होते तेथें **वृत्त्यनुप्रास** होतो. जसें—

**( अ ) भूषा-भुजंग भक्ता-भीतिद भव्य-प्रभाव भुज भार ॥**
**भावी भयें भवानीभर्ता भगवान् भुले भला फार ॥ १ ॥**
**सुटल्या सटा समस्ता सुरसरितासलिल सर्प सोमसुधा ॥**
**सांडिति सरणींत म्हणे सूतशुकव्यास सर्व सत्य बुधा ॥२॥**

मोरोपंत.

पहिल्या पद्यांत ‘ भ ’ ची व दुसऱ्या पद्यांत ‘ स ’ ची आवृत्ति चमत्कृतिजनक असून ज्या वर्णांचा अनुप्रास साधला आहे ते वर्ण बहुतेक सर्व शब्दांच्या प्रारंभीं आलेले आहेत. तसेंच,

**पल्यंकावरि पडला पांडुपृथापुत्र पावला पीडा**
**वैरिविजित विक्षतवपु विमुखत्वें वीरवर वरी व्रीडा ॥**
**चतुर चराचर-चेतश्चोर चतुर्बाहु चारु चारुरुचि-**
**अन्या संन्यासिजनें चिंतावें मात्र हें शरीर शुची ॥**

न दिसे अग नग मग तग गगनीं खग नीच काय काढील
चित्तीं म्हणे समय हा मज काळाच्या मुखांत वाढील ॥
यद्यपि हित करि हरि तरि अरि परि हरती भुजंग-पुच्छातें
होती मुखाकडे हो म्हणती स्पर्शेल कोण तुच्छातें ॥

वरील पद्यांत एकाच वर्णाची आल्हादकारक आवृत्ति झालेली आहे.

(ब) वाजत गाजत साजत आज तया जतन करुनि आणा हो
मजमागें मत्स्यांचा हा रिपुशशिराहुबाहु राणा हो ॥ १ ॥
ते गतगौरव कौरव रौरव-पौर वचकोनि पळतात
परि भीमशर न सोडिति, मृग पळतांही दवांत जळतात ॥ २ ॥
हासोनि म्हणे हरिसख हो गाढासन विकंप-धी धीट
न धरी बा ! दर हा दर सादर दे वाजवूं पुन्हा नीट ॥ ३ ॥

हीं अनेकाक्षरी वृत्त्यनुप्रासाचीं उदाहरणें होत.

( २ ) जेथें अनेक वर्णांची एकवारच आवृत्ति होते तेथें **छेकानुप्रास** होतो. याला **छेक** असें नांव देण्याचें कारण तो छेक म्हणजे चतुर लोकांच्या भाषणांत फार येतो. उदाहरणें:—

ज्या वेदप्रतिपाद्याप्रति पाद्या सत्यलोकपति अर्पी
ते पाप-ताप वारी वारी विश्वेश्वरास ही तर्पी ॥ १ ॥
राजा मूर्च्छित पडतां गांधारीसह तिच्या सुना रडती
उररीकृत-शोकभरा कुररीशा एकदाचि आरडती ॥
अपमान तुवां करितां स्ववधचि केला असें गमेल नृपा
मग पदनमनीं न मनीं कोप प्रभु धरिल, करिल फार कृपा ॥

मोरोपंत.

अथवा—

न रंजे कारंजें निरखुनि फणीतें फणफणी ॥
मुदेनें मोदे ना नल-गुण-गणीं जे गुणगुणी ॥
न बैसे जे सेजेवरि न परिसे जे शुक-गिरा ॥
न नाहे माना हें न धरि ललना हेतु दुसरा ॥ १ ॥

रघुनाथ पंडित.

वरील पद्यांत ‘ रंजे–रंजे, फणी–फणी, मुदे–मोदे ’ इत्यादि वर्णांची आवृत्ति एकवारच झाल्यामुळें येथें छेकानुप्रास आहे.

( ३ ) जेथें एकच शब्द विषयानुरोधानें अनेक वाक्यांत आलेला असतो व तो एकाच अर्थी योजलेला असून त्याची आवृत्ति होते तेथें **शब्दानुप्रास** होतो. ह्यालाच **लाटानुप्रास** असें म्हणतात. कारण लाट देशांतील एका कवीस ह्याची फार आवड असे.

उदाहरणें:—

**देउनि सुतरत्न करीं घेउनि पतिचित्तवित्त ती गेली ॥**
**नेत्रोदकें तिघांच्या गंगा गंगातटीं नवी केली ॥ १ ॥**

मोरोपंत.

अथवा,

**शक्राचा रुद्र जसा सात्यकिचा धर्म होय कैवारी ॥**
**विघ्नें विघ्नेश्वरसा कौरवकटकें पळांत तैं वारी ॥ २ ॥**

मोरोपंत.

**ते अल्प अल्पबळ रिपु झाले जयपात्र तेच उरफाटे ॥**
**शतसुतशोकें न तसें पांडव कुशलेंचि फार उर फाटे ॥ ३ ॥**

मोरोपंत.

येथें पहिल्या पद्यांत ‘ गंगा ’ दुसऱ्यांत ‘ विघ्नें ’ व तिसऱ्यांत ‘ अल्प ’ या शब्दांची अर्थासह आवृत्ति झाल्यामुळें हीं **शब्दानुप्रासाचीं** उदाहरणें होत.

कित्येकांच्या मतें शब्दांचा अर्थ जरी भिन्न असला तरी आवृत्त झालेल्या शब्दांचें स्वरूप ( शब्दांतील वर्ण ) सारखेंच असलें म्हणजे लाटानुप्रास होतो. त्यांच्या मतें खालील उदाहरणें लाटानुप्रासाचीं होतील.

**जयीं श्रीवत्सांक प्रभु करि निजांक-स्थित शिरा ॥**
**शिरा-नाडी-प्राण प्रगटति न लावूनि उशिरा ॥**
**शिराणी शब्दांची पुरवि तरि डोळे न उघडी ॥**
**घडी जों मानाची विघडलि असे तोंवरि घडी ॥ १ ॥**

वामन.

**मरतिल सकृष्ण पांडव धीरहि ते सोडतील आवास ॥**
**आवास अंतकाचा प्रियशोक, हरिस ह्मणेल ‘ आ ’ वास ॥ १ ॥**

मोरोपंत.

**अमळा कमळा केली भवना भवनाशना ॥**
**पावना पाव नाशीं या व्यसनास सनातना ॥ १ ॥**

मोरोपंत.

वास्तविक पाहातां वरील तिन्ही उदाहरणें शब्दानुप्रासाचीं नाहींत. शब्दानुप्रासामध्यें आवृत्त शब्दांत तात्पर्यभेद ( अन्वयभेद, विषयभेद ) जरी असला तरी अर्थभेद नसतो. जेथें अर्थभेद असतो तेथें यमक अलंकार होतो असें जाणावें.

---

## ( २ ) यमक.

श्लोकामध्यें जीं अक्षरें ज्या क्रमानें एकापुढें एक अशीं एकवार आलेलीं असतात, त्याच अक्षरांची त्याच क्रमानें पुनरावृत्ति होऊन त्यांचा अर्थ जेव्हां भिन्न असतो तेव्हां यमक नांवाचा अलंकार होतो. ह्याचे मुख्य दोन प्रकार आहेत. ( १ ) पादवृत्ति, ( २ ) पादभागवृत्ति. ह्या प्रत्येकाचे पुन्हां अनेक भेद आहेत.

**पादवृत्ति** यमकाचे अकरा पोटभेद आहेत त्यांचीं नांवें व लक्षणें खालीं लिहिल्याप्रमाणें:—

एका पद्याचा प्रथम पाद अथवा चरण व द्वितीय पाद अथवा चरण या दोहोंमध्यें एकसारखींच अक्षरें असून जेव्हां यमक साधलेलें असतें तेव्हां '**मुख**' नामक यमक होतें; प्रथम पाद व तृतीय पाद यांचें यमक साधिलें असतें तेव्हां '**संदंश**' नामक यमक होतें; व प्रथम पाद व चतुर्थ पाद यांचें यमक साधिलें असतें तेव्हां '**आवृत्ति**' यमक होतें. तसेंच द्वितीय पाद व तृतीय पाद यांचे यमकास '**गर्भ**' यमक म्हणतात; द्वितीय व चतुर्थ पादांच्या यमकास '**संदष्टक**' यमक म्हणतात. तृतीय व चतुर्थ पाद यांचे यमकास '**पुच्छ**' यमक म्हणतात. चारही पाद सारखेच असल्यास '**पंक्ति**' नामक यमक होतें. तीनच पादांचें यमक साधूं नये असा नियम आहे. प्रथम पादाचें द्वितीय पादाशीं व तृतीय पादाचें चतुर्थ पादाशीं यमक एकाच पद्यांत साधिलें असतें तेव्हां '**युग्मक**' नामक यमक होतें. वास्तविक पाहतां हें यमक 'मुख' व 'पुच्छ' यमकांचें मिश्रण होय. त्याचप्रमाणें 'आवृत्ति' व 'गर्भ' या यमकांचे मिश्रणास '**परिवृत्ति**' यमक हें नांव आहे. श्लोकाच्या पहिल्या अर्धाची आवृत्ति द्वती-

यार्धात झाली असते तेव्हां '**समुद्र**' नामक यमक होतें. वस्तुतः हें 'संदंश' व 'संदष्टक' या यमकांचें मिश्रण होय. जेव्हां सर्व श्लोकाची आवृत्ति होऊन अर्थ मात्र भिन्न असतो तेव्हां '**महायमक**' होतें.

पादवृत्ति यमकाचे जे वर अकरा पोट भेद दिलेले आहेत त्या सर्वांचीं उदाहरणें मराठी भाषेंत मिळणें कठीण आहे म्हणून कांहीं भेदांचीं मात्र उदाहरणें खालीं दिलेलीं आहेत.

**मुख** यमकाचीं उदाहरणें:—

कांताऽरवा सरस दान करी नरा जी
कांतार-वास-रसदा न करी न राजी ।
कस्तूरिका हरिणपंक्ति सुखें विहारा
या पर्वतीं करितसे धृतभृंगभारा ॥
राजी वसे वनवशा गजराज यांची
राजीव-सेवन-वशा; गजरा जयांची ।
तुंडावली करितसे पळतां भयानें
ऐकोनियां नगवरीं हरि-शब्द कानें ॥

राधारमण.

**संदंश** यमकाचीं उदाहरणें:—

हार विलास-वतीनें, केला हा लक्ष्मण-प्रसूनें कीं
हारविला सवतीनें क्षितिनें पुजिला सुरप्रसूनें कीं ॥
वाणी विश्वा साची त्या बाळांची, जशी शुका व्यासाची;
वाणी विश्वासाची घोषीं; माया चि हे रमावासाची.

मोरोपंत.

**समुद्र** यमकाचीं उदाहरणें:—

( १ ) अनल–समीहित साधी राया वारा महीवरा कामा
अनलस मीहि तसा धीरा यावा रामही वराका मा ॥
बहुमान सदा सावरि साधु निका महित सज्जन वनौका
बहु मानस दासावरि साधुनि कामहित सज्ज नव नौका ॥

मोरोपंत.

**सुरसाधरावरी ते शिवा सकुतुका गिरीशजा या हो**
**सुरसाधरा वरीते शिवास कुतुका गिरीशजाया हो ॥**

काव्यरत्नावलि—राधारमण.

**संदष्टक** यमकाचीं उदाहरणें:—

**न शिके त्याच्या बोल न बाला; मंदार सावरिल काय ।**
**पतनेच्छुचा न, न वरिल बाला मंदा; रसा वरिल काय ॥**

मोरोपंत शल्यपर्व १–११.

**पंक्ति** यमकाचें उदाहरण:—

**धरा धराया महती स-मानं[1]**
**धरा धरा या मह[2]तीसमान**
**धरा धरायाम[3]–हतीस मान**
**धराधरां[4] या महती समान**

राधारमण.

**युग्मक** यमकाचीं उदाहरणें:—

**( १ ) हरितें सन्नगमण्डन मानस**
**हरित-सन्नगमण्डन मानसें ।**
**सुरस-सारस-सार-समाकुलें[10]**
**सुरस[11]सार ससारस[12] मा-कुलें[13] ॥**

राधारमण.

---

१ स=सहित मान=गौरव, गौरवयुक्त, पूज्य. २ सामर्थ्य. ३ धरा+आयाम +हतीस=पृथ्वी+विस्तार+भार=पृथ्वीच्या विस्ताराच्या भारास मान ( माप ) शेषास पृथ्वीच्या भाराचें माप डोक्यानें तोलतां येते. ४ शेष.

५ हरिते=वेधून टाकिते. ६ सत्+नग+मण्डन=उत्तम पर्वताचें भूषण; हिमालय पर्वतास भूषणभूत असें. ७ मानस सरोवर. ८ हरित सत्+नग+मण्डन=हिरवेगार सुंदर वृक्ष ( नग ) भूषण आहेत ज्यास असे. ९ मानस सरोवर पक्षीं मन, चित्त. १० सुरस=रसानें भरलेल्या; सारस=कमलें सार उत्तम समाकुल=युक्त=रसानें थबथबलेल्या उत्तम कमलांनीं युक्त. ११ सु=मधुर, गोड, रस=पाणी, सार=संपत्ति–ज्यांत पुष्कळ मधुर पाणी आहे असें. १२ स+सारस=हंसांनींयुक्त. १३ मा-कुल=लक्ष्मीचें मंदीर, निवासस्थान.

(२) पायां नमी देइन वंश सारा
पा या न मी दे इनवंशसारा
न या वयामाजि भला जना दे
न यावया मा जिभ लाज ना दे[1]

आनंदतनय.

**पादभागवृत्ति** यमकाचे मुख्य दोन पोटभेद आहेत. (१) सजातीय पादावृत्ति यमक आणि (२) विजातीय पादावृत्ति यमक.

सजातीय पादावृत्ति यमकामध्यें पादावृत्ति यमकाप्रमाणेंच फक्त महायमक शिवाय करून बाकीचीं यमकें आहेत व त्यांचीं नांवेंहि तींच आहेत, परंतु पादांचीं जितकीं जास्त खंडें करावीं त्या मानानें यमकांची संख्या वाढत जाते. जर एका पादाचे दोनच भाग केले तर पादाच्या आद्य भागाचेंच **मुख, संदंश** इत्यादि दहा भेद होतात. त्याचप्रमाणें अंत्य भागाचेही दहा प्रकार होतात. म्हणजे एका पादाचे दोन भाग केल्यास पादभागवृत्ति यमकाचे वीस भेद होतात. तीन भाग केल्यास आदि, मध्य आणि अंत्य या प्रत्येकाचे दहा प्रमाणें तीस भेद होतात. एका पादाची चारापेक्षां जास्त खंडें केल्यास अलंकाराचें चमत्कारजनकत्व नाहींसें होतें म्हणून तसें करण्याचा प्रघात नाहीं.

विजातीयपादावृत्ति यमकाचेही अनेक प्रकार आहेत. प्रत्येक पादाचे दोन भाग केल्यास प्रथम पादांतील शेवटचें अर्ध व द्वितीय पादाचें पहिलें अर्ध यांचें यमक साधलेलें असल्यास **अंतादिक** यमक होतें. पहिल्या पादाचें पहिलें अर्ध व दुसऱ्या पादाचें शेवटचें अर्ध यांचें यमक साधलें असल्यास **आद्यंतिक** यमक होतें. प्रत्येक पादाचे तीन भाग केले असल्यास पहिल्या पादाचा अंत्य-भाग व

---

१ ही दशरथाची विश्वामित्राप्रत उक्ति आहे. अर्थः—मी पायां पडतों पाहिजे असल्यास सर्व (वंश) कुटुंब आपल्या सेवेस देतों. या-मला (पा) पावा माझेवर प्रसन्न व्हा (व रामास मागूं नका). मी सूर्यवंशास (इन=सूर्य) भूषणभूत अशा रामास देणार नाहीं. या माझ्या वृद्धापकाळीं मला प्रिय असलेला राम दुसऱ्यास देणें कठीणच वाटणार. नाहीं असा स्पष्ट नकार देण्यास माझी जीभ कांहीं लाजणार नाहीं; तुम्ही फार आग्रह केला तरी मी साफ नाहीं म्हणून सांगितल्याशिवाय राहणार नाहीं.

दुसऱ्या पादाचा मध्य भाग यांचें यमक झालें असल्यास **अंत्य-मध्य** यमक होतें. याप्रमाणें पादभागाच्या स्थानावरून यमकांस नांवें देणें सुलभ आहे. एकाच पादाचे दोन अथवा तीन विभाग केल्यास त्याच्या आदि आणि अंत्य भागांचें किंवा आदि आणि मध्य भागांचें यमक साधिलें असल्यास त्यासही **आद्यंत, आदिमध्य** इत्यादि नांवें देण्याचा प्रघात आहे. स्थानाविषयीं निर्बंध अथवा नियम नाहीं अशीं यमकें तर पुष्कळच आहेत. वर निर्दिष्ट केलेल्या शेंकडों प्रकारच्या यमकांचीं उदाहरणें दिल्यास तीं वाचून वाचकांच्या मनास आल्हाद न होतां त्यांस वीट मात्र येईल. मराठी भाषेत वरील बहुतेक सर्व प्रकारच्या यमकांचीं उदाहरणें सांपडण्यासारखीं असल्यामुळें तीं देण्याचें प्रयोजनही नाहीं. तथापि दिग्दर्शन करण्याकरितां कांहीं उदाहरणें खालीं दिलीं आहेत.

(१) **सुर समस्त इच्या वरनिश्चयें ॥**
**सुरस मस्त असें वदले स्वयें ॥**
**नळ वराशि वरोनि सुखी असे ॥**
**तुज नको जन कोण ह्मणे असे ॥ १ ॥**

रघुनाथ पंडित.

येथें पहिल्या दोन चरणांत पादभागवृत्ति ‘ **मुख** ’ नामक यमकालंकार आहे.

(२) **अमृतसिंधु तुह्मींच विभो जनीं ॥**
**जरि धरा न तुह्मीं चवि भोजनीं ॥**
**मदुदयार्थ अहो तरि जेमन ॥**
**प्रभु करूनि सुखी करिजे मन ॥ १ ॥**

मोरोपंत.

येथें पादभागवृत्ति ‘ **युग्मक** ’ नामक अलंकार झाला आहे.

(३) **अंतर्बहिःस्थित रघूत्तमसूनु धाकें**
**प्राणासि धैर्य तिळमात्र न होय जाया**
**मोहांधकार पतिता विधिच्या विपाकें**
**नेत्रें हळूच उघडी रघुवीर जाया ॥**

मोरोपंत.

हें पादभागवृत्ति **'संदंश'** यमकालंकाराचें उदाहरण आहे.

**( ४ ) अमृत ही पयही ह्मणवीतसे ॥**
**उभय होय तशी रुचि वीतसे ॥**
**मधुर सारस तें जलगा तसें ॥**
**मधुर सारस यास्तव गातसे ॥ १ ॥**

रघुनाथ पंडित.

येथें उत्तरार्धात पादभागवृत्ति ' **पुच्छ** ' नामक यमकालंकार आहे.

**( ५ ) शोक लास्य करी हृदंगणिं कंठ केवळ शोकला ॥**
**कोमलानन पूर्णचंद्र तिचा तदा बहु कोमला ॥**
**कां पती रुसला म्हणे सकळेंद्रियें बहु कांपती ॥**
**भार तीस निजांग होय वदे अशी मग भारती ॥ १ ॥**

मोरोपंत.

येथें प्रत्येक पदांत ' **आद्यंतिक** ' यमक साधिलेलें आहे.

**( ६ ) सेवुनि संतत पाला संत तपाला यदर्थ करितात ॥**
**तो पी या स्तवना कीं यास्तव नाकींहि तेंचि वरितात ॥ १ ॥**

मोरोपंत.

येथें पूर्वार्धात व उत्तरार्धात ' **अंतादिक** ' यमक जुळविलेलें आहे.

**( ७ ) माहेर म्हणे ज्यातें कीर्ति सकळ साधुराजि मानवली ॥**
**मानवलील रण करी, परि भारें भूमि तरिसमा लवली ॥ १ ॥**
**मालवली दीपाची वातें अरिची तसी प्रभा अहिता ॥**
**अहिता दे विपता घे, निज चापलता जगीं करी महिता ॥२॥**

मोरोपंत.

हें अंतादिक व आद्यंतिक यमकाचें मिश्रण होय.

**( ८ ) हस्तीतें धुतलें, जळीं बसविलें, मालिन्यही नाशिलें ॥**
**तेणें तें पहिलें स्वकर्म वहिलें तीरींच आरंभिलें ॥**
**शुंडाग्रें धरिलें धुळीस भरिलें सर्वांगही आपलें**
**प्रायश्चित्त दिलें तथापि न भलें ज्याचें मन क्षोभलें ॥**

वामन.

हें पादभागवृत्ति **पुच्छ** नामक यमक आहे. यालाच कोणी **पुष्प** यमक असें म्हणतात.

मराठी साहित्यशास्त्रांत अश्वधाटी यमक, दाम यमक, पुष्प यमक अशीं नवीन यमकालंकाराचीं नांवें प्रचारांत येत चाललीं आहेत. तीं रुचिवैचित्र्यावरून पडलीं असून अलंकारशास्त्रसंमत नाहींत.

**(अ) जलज-लसद्-रम्य-मुखी नव नवनीतापरीस मृदुला हे ।**
**शिव, शिव, मजविण भीरु न वनवसति-दुःख भोगणें लाहे ॥१॥**

**( ब ) सुसव वासव वानि असा करी ॥**
**मुनिजना निज नायक उद्धरी ॥**
**यश मला शमलापह तें रुचे ॥**
**ठकवितें कवितें न दुजें सुचे ॥ १ ॥**

**( क ) ह्मणे सत्या अत्यादृतमति मला हा वरवर ॥**
**स्वताताच्या गोष्टी प्रियसखि बऱ्या या वरवर ॥**
**पदीं कन्यारत्नार्पण न करि मध्यें करकर ॥**
**स्तुतीची, हा अंबे ! त्वरित धरु मोदाकर कर ॥१॥**

मोरोपंत.

पंतांच्या वरील तीन पद्यांपैकीं पहिल्यांत प्रत्येक पादाच्या आरंभीं, दुसऱ्यांत प्रत्येक पादाच्या मध्यें व तिसऱ्यांत प्रत्येक पादाच्या शेवटीं यमकालंकार साधला आहे. यमकाचीं एवढीं उदाहरणें पुरे आहेत.

---

## ( ३ ) श्लेष.

शब्दांतील **वर्ण** जरी अगदीं सारखे असले तरी त्यांचा अर्थ भिन्न असल्यास ते शब्दहि भिन्न आहेत असें समजावें, असा नियम आहे. अशा प्रकारचे दोन किंवा अधिक शब्द भाषणामध्यें एकदम उच्चारण्याचा प्रयत्न केल्यामुळें त्यांच्या भिन्न स्वरूपांचा लोप होऊन एकाच शब्दाचे अनेक अर्थ आहेत असें जेथें भासतें तेथें **श्लेष** नामक शब्दालंकार होतो. कोठें कोठें एकच शब्द श्लिष्ट असतो व कोठें कोठें एक किंवा अनेक पदें श्लिष्ट असतात.

क्रमानें उदाहरणें:—

**बा कर्णा ! तूं अर्जुन रामजनार्दनसमान साजाल ॥**
**हंस तसे साधूंच्या सोडुनि तुम्ही न मानसा जाल ॥ १ ॥**

मोरोपंत.

येथें ' मानस ' हा शब्द श्लिष्ट आहे. त्याचा एक अर्थ मानस सरोवर व दुसरा अर्थ मन, चित्त असा आहे.

**सत्याश्रित, गुणमय, शुचि, कापुनि घे, परि न देचि हाक, पट ॥**
**पुण्यश्लोकीं राहुनि उघडिल त्याचेंचि केंवि हा कपट ॥ १ ॥**

मोरोपंत.

येथें ' सत्याश्रित ' ( सती+आश्रित; सत्य+आश्रित ), ' गुणमय ' ( गुण=तंतु व सद्गुण ), ' शुचि ' ( स्वच्छ व निष्पाप ) यांपैकीं पहिलीं दोन पदें व शुचि हा शब्द श्लिष्ट आहे.

तसेच,

**नळराजकथा सुधाचि साजे ॥**
**दमयंती वरवर्णिनी विराजे ॥**
**मिळणी उभयांशि होय जेथें ॥**
**अधिकारी अधिकानुराग तेथें ॥ १ ॥**

रघुनाथ पंडित.

येथें ' सुधा ' ( अमृत व चुना ), ' वरवर्णिनी ' ( गौरांगी व हळद ), ' अनुराग ' ( प्रेम व लाली ) हे शब्द श्लिष्ट आहेत.

श्लेषाचे सभंग व अभंग असे दोन प्रकार आहेत; त्यांचें विवेचन अर्थालंकार या प्रकरणांत केलें आहे तें पहावें.

---

## ( ४ ) वक्रोक्ति.

वक्त्याच्या मनामध्यें एक अभिप्राय असून त्याच्या भाषणाचा श्रोता जेव्हां भलताच अर्थ बुद्धिपुरःसर करितो तेव्हां **वक्रोक्ति** नामक अलंकार होतो. याचे दोन भेद आहेत ( १ ) **श्लेष वक्रोक्ति** व ( २ ) **काकु वक्रोक्ति.**

( १ ) पद्यामध्यें श्लिष्ट शब्दांचा उपयोग केलेला असून बोलणारा व ऐकणारा हे दोघेही त्यांचा वेगवेगळा अर्थ करितात तेव्हां **श्लेषवक्रोक्ति** नामक अलंकार होतो. उदाहरणें:—

बोले श्रीहर नीळकंठ मि असें कां ओळखी सांडसी ॥
आहे ठाउक तूं मयूर मजला टाहो किती फोडसी ॥
मी तों मोर न, काळकूट-धर गे ! प्रार्थी सुबद्धांजली ॥
येथें कां तरि पातलासि भुजगा जावें तुवां भूतळीं ॥ १ ॥
नोहे पन्नग मी शशांकवदने मी एक शूळी असें ॥
जावें वैद्य-गृहासि औषधिगुणें तो शूळ नाशीतसे ॥
मी तो शूळि नसें मला बहु रसें स्थाणू असें बोलती ॥
हें तो नाम वदे तरू तरि किजे वस्ती वनीं पर्वतीं ॥ २ ॥

सदाशिव कवि.

हा शिव आणि पार्वती यांचा संवाद आहे. येथें नीळकंठ, काळकूट-धर, शूळी व स्थाणु हे शब्द श्लिष्ट असून त्यांचा शिवाच्या मनांत एक अर्थ होता परंतु पार्वतीनें त्यांचा वेगळाच अर्थ केला.

( २ ) जेथें शब्दांचा विवक्षित रीतीनें उच्चार केला असतां अर्थ बदलतो तेथें **काकु-वक्रोक्ति** अलंकार होतो. उदाहरणः—

गुरुजन-वशता ही कष्टदा जीवितेशा ॥
ह्मणुनि गमन वाटे श्लाघ्य त्याला विदेशा ॥
पिक-रव मधुमासीं तोषवी कामुकांना ॥
सदनिं परत तेव्हां नाथ येईल गे ना ॥ १ ॥

भाषांतर.

ही एका नायिकेची आपल्या सखीप्रत उक्ति आहे. परवशतेमुळें त्रस्त होऊन दूरदेशीं गेलेला माझा पति वसंतऋतूंतही परत येणार नाहीं असा नायिकेच्या मनांतील आशय आहे. परंतु ' येईल ना ' हा प्रश्न आहे असें सखी समजली; व वसंतकाळीं विरह दुःसह होत असल्यामुळें आणि पारतंत्र्यही सर्वकाळ टिकणारें नसल्यामुळें ' तुझा पति खास परत येईल ' असा तिनें आपला अभिप्राय नायिकेस कळविला. येथें दोघींच्या मनांत भिन्न भावार्थ असल्यामुळें ' वक्रोक्ति ' अलंकार झाला आहे.

संहारीन समस्त कौरवकुळा कोपे न मी संगरीं ॥
ना दुःशासनवक्ष भग्न करुनी प्राशीन रक्ता करीं ॥

**खड्गें चूर्ण करीन ऊरुयुग ना दुर्योधनाचें क्षणीं ॥**
**ग्रामें पांचचि घेउनी नृप करो संधी सुबुद्धाग्रणी ॥ १ ॥**

भाषांतर.

धर्म संधि करण्यास तयार आहे असें ऐकल्यावर क्रुद्ध झालेल्या भीमाची ही सहदेवाप्रत उक्ति आहे. येथें ' न संहारीन ' ह्या शब्दांचा सरळ अर्थ संहार करणार नाहीं असा होतो; परंतु वरील शब्द उच्चारण्याच्या धाटीवरून व क्रोधातिशयामुळें त्या शब्दांतून 'संहार करणार नाहीं काय?' मी आपली प्रतिज्ञा सत्य करण्याकरितां अर्थात् संहार करीन असा अर्थ निष्पन्न होतो.

---

## ( ५ ) पुनरुक्तवदाभास.

शब्दांचें स्वरूप ( शब्दांतील वर्ण ) व त्यांचा अर्थ अगदीं भिन्न भिन्न असून ते एकाजवळ एक असे आल्यामुळें ते एकाच अर्थी योजलेले आहेत असा जेव्हां ऐकणारास भास होतो तेव्हां **पुनरुक्तवदाभास** नामक अलंकार होतो.

उदाहरणें:—

**( १ ) तनु-वपु परि अतुलबली करि-कुंजर-रुधिर-रक्त होय जरी ॥**
**तेजस्वी शूरमणी सर्वां गमतो उदारधींद्र हरी ॥ १ ॥**

भाषांतर.

येथें तनु आणि वपु, करि आणि कुंजर, रुधिर आणि रक्त व इंद्र आणि हरी या शब्दांच्या चार जोड्यांपैकीं प्रत्येक जोडींतील दोन्ही शब्द एकाच अर्थी योजलेले आहेत असा वाचकास सकृद्दर्शनीं भास होतो. परंतु तनु म्हणजे बारीक, कुंजर म्हणजे श्रेष्ठ, रक्त म्हणजे आसक्त व हरी म्हणजे सिंह असे अर्थ घेतले असतां वरील दोष नाहींसा होतो.

**( २ ) भुजंग-कुंडल-धारी उज्वल शशिशीतरश्मिशेखर हा ॥**
**रक्षो विलयापासुनि जगतां सर्वां सदाशुभंकर हा ॥**

भाषांतर.

येथें ' शशिशीतरश्मि ' ह्या पदांतील शब्द एकाच अर्थाचे आहेत असे वाटतें; शशी म्हणजे कापूर असा अर्थ घेतल्यास कापराप्रमाणें पांढरीं स्वच्छ किरणें आहेत ज्याचीं असा चंद्र असा अर्थ घेतला म्हणजे पुनरुक्ति होत नाहीं.

---

## ( ६ ) चित्र.

विशेष आकृति कल्पून त्या आकृतीमध्येंच वर्णाची रचना केल्यामुळें जेथें वैचित्र्य आलेलें असतें तेथें **चित्रालंकार** होतो. अशा प्रकारच्या रचनेस **बंध** किंवा **प्रबंध** म्हणतात. हे प्रबंध पुष्कळ आहेत. त्यांपैकीं कांहींचीं नांवें खालीं दिलीं आहेतः—

( १ ) अनुलोमप्रतिलोम, ( २ ) गोमुत्रिका, ( ३ ) खड्ग, ( ४ ) मुसल, ( ५ ) धनुष्य, ( ६ ) शक्ति, ( ७ ) शूल, ( ८ ) हल, ( ९ ) शर, ( १० ) चक्र, ( ११ ) मुरज, ( १२ ) सर्वतोभद्र, ( १३ ) पद्म, ( १४ ) छत्र, ( १५ ) नाग, ( १६ ) शिबिका, ( १७ ) अंकुश, ( १८ ) अर्धभ्रम, ( १९ ) नरपदपाठ, ( २० ) रथपदपाठ, ( २१ ) तुरंगपदपाठ, ( २२ ) गजपदपाठ, ( २३ ) बुद्धिबळांचा पट इत्यादि. वरील प्रबंधांपैकीं थोडीशीं उदाहरणें खालीं दिलीं आहेत.

**( १ ) वीराजते मत्त उदार पाहे ॥**
**वीरा धरीं शक्तिसराव साहे ॥**
**हे सावरा सक्ति शरीं धरावी ॥**
**हे पारदां उत्तम तेज रावी ॥ १ ॥**

विठ्ठल कवि.

येथें पहिल्या अर्धात पहिल्या अक्षरापासून पुढें जीं अक्षरें अनुक्रमानें आलेलीं आहेत त्याच्या उलट क्रमानें दुसऱ्या अर्धात अक्षरें घातलेलीं आहेत म्हणून हा **अनुलोमप्रतिलोम** चित्र अलंकार होय.

( २ ) **अष्टदल कमलबंधाचें** उदाहरणः—

**मालवी गर्विमामास बाणासमा**
**माथुराधिश्रमा मानवाऽपद्भ्रमा ।**
**माप देत प्रमा मात्र कायें नमा**
**मानहीन क्षमा मा नमामः समा ॥ १ ॥**

गोविंद हरी दामले.

अर्थः-( माप ) लक्ष्मीचा पति कृष्ण ( बाणासमा ) बाणासुराप्रमाणें ( गर्विमामास ) गर्वास चढलेल्या कंसास ( मालवी ) शांत करिता झाला. मग ( माथुराधिश्रमा ) मथुरानगरीवासी जनांच्या आधी व श्रम व ( मानवापद्भ्रमा ) मानवांचीं दुःखें व भ्रम (मालवी) नाहींशीं करिता झाला. ( माप ) कृष्ण ( प्रमा देत) यथार्थ ज्ञान देत आहे. मात्र ( त्याला ) कायें नमा-नम्र व्हा. कां कीं (मान-

हीन ) अहंतारहित नम्रजन आहेत त्यांची क्षमा त्यास मिळते ( नम्रजन त्यास आवडतात ); म्हणून आम्ही ( मा समा ) लक्ष्मीसहित जो विष्णु अथवा कृष्ण त्यास ( नमामः ) नमस्कार करितों.

( ३ ) **अम्लान-पंकजमाला-बंधाचें** उदाहरणः—

**बाळा सोळा कळांची छवि नवि रविची, तेविं दावी स्ववींची ॥**
**माळा ज्वाळानळाची गुणिफणिमणिची हारि भारी मरीची ॥**
**झुंकारे कामुकाची घटि कटितटिची ख्याति गाती सतींची ॥**
**हंसाची साक्ष साची गति रतिपतिची कांतिमा तीव्र तीची ॥ १ ॥**

विठ्ठल कवि.

( ४ ) **चक्रबंधाचें** उदाहरणः—

**वीनवी लालसा हा नला माजवी ॥**
**वीजमालास्त्र हें तीव्र जें वीजवी ॥**
**वीजवी जें रमानायका नीरवी ॥**
**वीर नीकारुनि ख्याति लावी नवी ॥ १ ॥**

विठ्ठल कवि.

( ५ ) **द्वादशदल पद्मबंधाचें** उदाहरणः—

**तूं काली कमला सरस्वति कलाष्टाका जगद्वत्सला ॥**
**तूं तारा तरला गिरीश अबला ज्वालामुखी सोज्वला ॥**
**या बाला अबला मिळोनि सकळा घालीन मी गोंधळा ॥**
**श्रीकृष्णा कुशला वरीन चपला ते स्वाप लागो दळा ॥ १ ॥**

विठ्ठल कवि.

हेंच पद्य ' व्यंजन ' व ' वृक्ष ' या बंधांत रचतां येतें. चित्रालंकाराचीं एवढीं उदाहरणें पुरे आहेत. तथापि ज्यांस 'स्वस्तिक', 'वापी', ' नाग ' इत्यादि अनेक प्रबंधांचीं उदाहरणें पाहिजे असतील त्यांनीं विठ्ठल कवीचीं ' सीता स्वयंवर ' व ' रुक्मिणी स्वयंवर ' हीं काव्यें वाचावीं.

वर जीं चार प्रबंधांचीं उदाहरणें दिलीं आहेत त्यांच्या आकृति पुढें दिल्या आहेत.



# (२) अर्थालंकार.



## ( १ ) उपमा.

दोन भिन्न पदार्थांमध्यें जेव्हां सादृश्य वर्णिलें असतें तेव्हां **उपमा** अलंकार होतो. ह्या दोन पदार्थांपैकीं ज्याचें वर्णन करावयाचें असतें त्यास 'प्रस्तुत' अथवा 'उपमेय' म्हणतात. उपमेयाचें ज्या दुसऱ्या एका पदार्थाशीं साधर्म्य अथवा सादृश्य दाखवावयाचें असतें त्यास 'अप्रस्तुत' अथवा 'उपमान' म्हणतात. उपमेय हें उपमानासारिखें आहे असें दाखविणारा जो धर्म त्यास 'साधारणधर्म' असें म्हणतात; व हें सादृश्य दाखविणारे जे शब्द त्यांस 'उपमाप्रतिपादक' अथवा सादृश्यवाचक शब्द म्हणतात. उपमेंतील साधारणधर्म चमत्कारजनक असला पाहिजे, म्हणजे त्यापासून सहृदय वाचकाचे अंतःकरणास आल्हाद वाटला पाहिजे. 'दगडाप्रमाणेंच झाड हें द्रव्य आहे' ह्या उदाहरणांत द्रव्यत्व हा साधारण धर्म आहे; पण ह्यापासून श्रोत्यास अथवा वाचकास चमत्कार वाटत नाहीं; म्हणून वरील वाक्य उपमा अलंकाराचें उदाहरण होत नाहीं. परंतु 'तिचें मुख चंद्राप्रमाणें सुंदर आहे.' ह्या उदाहरणांत सुंदरपणा हा साधारणधर्म आहे; व ह्यामुळें 'चंद्र' व 'मुख' यांतील सादृश्य ओळखण्यास सहृदय वाचकास बिलकुल अडचण पडत नाहीं.

उपमेचे मुख्य दोन भेद आहेत—**पूर्णा** व **लुप्ता.** जेव्हां उपमेय, उपमान, साधारण धर्म व सादृश्यदर्शक शब्द निर्दिष्ट केलेले असतात तेव्हां पूर्णोपमा होते.

जसें—

उदाहरणें:—

**( १ ) गरुड जसा गगनांतुनि वेगें उतरोनि पन्नगा झडपी ॥**
**तैसा भीम बळानें दुःशासनकंठ अंघ्रिनें दडपी ॥**

मोरोपंत.

येथें ज्याचें वर्णन करावयाचें तो भीम आहे म्हणून भीम यास उपमेय किंवा प्रस्तुत असें म्हणतात. भीमाची ज्याच्याशीं तुलना करावयाची आहे तो गरुड आहे. ह्यास उपमान किंवा अप्रस्तुत म्हणतात. जैसा, तैसा हे उपमाप्रतिपादक अथवा सादृश्यवाचक शब्द आहेत. दोघांमध्यें असलेल्या ज्या सामान्य गुणांमुळें त्यांची तुलना केली आहे तो सामान्य धर्मही दडपी व झडपी या शब्दांनीं उक्त आहे म्हणून ही **पूर्णोपमा** होय.

**( २ ) पांडव कटकीं शिरले क्रोधी गुरु, कर्ण करिकुळीं हरिसे ।**
**जाले दुःसह सर्वां ते काळ प्रलयपावका सरिसे ॥ १ ॥**
**दुःशासनें हि केला धृष्टद्युम्न क्षतार्त हतदर्प ।**
**जैसा सिंहें गजपति किंवा गरुडेंचि दृष्टिविष सर्प ॥ २ ॥**
**मेलीच असें मानुनि शर्मिष्ठा आपुलया घरा गेली ।**
**कूपीं कविजा होती, जैसी नागी मनांत रागेली ॥ ३ ॥**

मोरोपंत.

वरील तिन्ही पद्यांत पूर्णोपमा अलंकार आहे.

पूर्णोपमेस लागणाऱ्या वरील चार अंगांपैकीं जेव्हां एक किंवा अधिक अंगे गाळलेलीं असतात तेव्हां लुप्तोपमा होते. जसेंः—

**व्यूहीं गमे सुभद्रासुत गजयूथांत जेविं बालहरी ॥**
**त्यावरि पडल्या सेना त्या मंथाद्रिवरि जेविं बा लहरी ॥ १ ॥**

मोरोपंत.

या पद्यांत 'सुभद्रासुत' हें उपमेय, 'बालहरी,' हें उपमान 'जेविं' हा सादृश्यवाचक शब्द होय. परंतु यांत साधारणधर्म स्पष्टपणें दिला नाहीं; म्हणून हें धर्मलुप्ता उपमेचें उदाहरण होय.

**( १ ) भीम म्हणे कुंतीला ब्राह्मणसमुदाय रडति कां पूस ॥**
**त्यांचें दुःख हराया अग्नीला भार काय कापूस ॥ १ ॥**

मोरोपंत.

ज्याप्रमाणें अग्नीला कापसाचा भार होत नाहीं, त्याप्रमाणें मला ब्राह्मणाचें दुःख हरण करण्याचें कांहींच वाटत नाहीं, असा वरील पद्यांतून अर्थ निष्पन्न होतो म्हणून हें गर्भितोपमेचें उदाहरण होय.

उदाहरण दुसरेंः—

**( २ ) भगिनीमुखेंचि विनवा तन्मातिला उत्तराचि वळवील ॥**
**अतिसहवासिवच्च मना, कतक कलुषिता, वना निवळवील ॥**

मोरोपंत.

येथें दुसऱ्या अर्धांत ज्याप्रमाणें कतक ( निवळीचें बीं ) गढूळ ( वना ) पाण्याला निवळवितें त्याप्रमाणें अतिसहवासामुळें उत्तरेचे शब्द उत्तराच्या खळबळलेल्या मनास निवळवितील असा अर्थ असून सादृश्यवाचक शब्द दिला नाहीं म्हणून गर्भितोपमा अलंकार आहे.

उपमानाचे ठिकाणीं सृष्टींतील कोणताही पदार्थ नसून उपमान केवळ कवि-कल्पनानिर्मित असतें तेव्हां **कल्पितोपमा** होते.

जसें:—

**निटिलापासुनि सुटला कुटिलालक-पाश हा स्तनाभोगीं ॥**
**चंद्रावरोनि लोंबे, मेरुनगीं जेंवि वासुकी भोगी ॥ १ ॥**

भाषांतर.

येथें चंद्रावरून पृथ्वीवरील मेरुपर्वतावर लोंबणारा नाग हें उपमान केवळ कविकल्पित आहे. हिलाच कोणी **अभूतोपमा** असेंही म्हणतात.

जेव्हां एका वाक्यांतील उपमेय आणि उपमान दुसऱ्या वाक्यांत अनुक्रमें उपमान आणि उपमेय होतात म्हणजे मागील वाक्यांतील उपमेय पुढील वाक्यांत उपमान होतें व जें उपमान असेल तें उपमेय होतें. असा क्रम ज्या ठिकाणीं असतो तेथें उपमेयोपमा अलंकार होतो. जसें:—

**कौमुदीसमा तनु तुझी खरी । कौमुदी तरी तव तनूपरी ॥**
**नेत्र अंबुजा समचि भासती । अंबुजेंहि तीं नयन शोभती ॥ १ ॥**

भाषांतर.

वरील पद्यांत पहिल्या चरणांत 'तनु' हें उपमेय व 'कौमुदी' हें उपमान हीं दोन्ही दुसऱ्या चरणांत अनुक्रमें उपमान व उपमेय झालीं आहेत. शेवटच्या दोन चरणांतही त्यांचा तसाच क्रम आहे.

ह्या अलंकारांत उपमेय उपमानासारखें असतें व उपमान उपमेयासारखें असतें आणि ह्या दोहोंशीं तुलना करितां येण्यासारखा तिसरा पदार्थच नसतो असें वर्णन केलेलें असतें.

जेव्हां उपमेयास उपमेयाशिवाय दुसरें उपमानच नाहीं असें वर्णन असतें तेव्हां **अनन्वय** अलंकार होतो. जसें:—

**( १ ) झाले बहु, होतिल बहु, आहेतहि बहु, परंतु यासम हा ॥**
**यास महादेवा दे जय, पाहिन कधिं धनंजयास महा ॥ १ ॥**

मोरोपंत.

**( २ ) विदुर म्हणे, बाइ पृथे ! यांसम विश्वांत हे महाखळ गे ॥**
**गुरु अंध अंध कूपचि, याचे दुर्योधनादि सुत खळगे ॥**

मोरोपंत.

प्रथम पद्यांत धनंजयासारखा वीर धनंजयच व दुसऱ्या पद्यांत कौरवासारखे महामूर्ख कौरवच आहेत; त्यांस दुसऱ्या कोणाची उपमा देतां येत नाहीं असें वर्णिलें आहे.

(३) घडे दैवें किंचित् कलुष परि संतापति मनीं ॥
अशांतें ताराया असतिं बहु तीर्थें त्रिभुवनीं ॥
जया प्रायश्चित्तें नसतिं, कुनरा दे गति असी ॥
समर्था ! या लोकीं तुजसम अये ! तूंचि असती ॥ १ ॥

वामन.

येथेंही हे गंगे! तुझ्यासारखी तूंच आहेस, दुसरी कोणी नाहीं, असें वर्णन आहे; म्हणून हा **अनन्वय** अलंकार होय.

जेव्हां उपमेयास उपमान असणें शक्य नाहीं असें वर्णन असतें तेव्हांही अनन्वय अलंकारच होतो. जसें:—

(४) पुण्यश्लोकांमाजी पहिला ॥ सत्वशील सत्वार्थिला ॥
उपमे बोलावया बोला ॥ दुजा नाहीं ब्रह्मांडीं ॥ १ ॥

अथवा,

मुक्तेश्वर.

(५) अर्जुन सम वीर नसे मागें, आतां, पुढें न व्हायाचा ॥
हा वीर-रसौघ, नगहि न उरेल, उरेल जो लवायाचा ॥ १ ॥

मोरोपंत.

अनन्वयाच्या ह्या प्रकारास कोणी असमालंकार असे म्हणतात.

जेव्हां एकाच उपमेयास अनेक उपमानें असतात तेव्हां **मालोपमा** अलंकार होतो. जसें:—

(१) जो धैर्यें धरसा, सहस्रकरसा तेजें तमा दूरसा ॥
जो रत्नाकरसा गभीर सुरसा भूपा यशोहारसा ॥
ज्ञाता जो सरसावला नवरसा-माझारि शृंगारसा ॥
शोभे तामरसाक्ष तो नळ रसानाथ स्तवूं फारसा ॥ १ ॥

रघुनाथ पंडित.

येथें नळ हें एकच उपमेय असून त्यास अनेक उपमानें आहेत. उपमान उपमेयांमध्यें असलेल्या साधारण-धर्मांचा उल्लेख केलेला असून उपमाप्रतिपादक 'सा' शब्दही प्रत्येक उपमेंत आहे म्हणून हें **मालोपमेचें** उदाहरण आहे.

**( २ ) अनयें जशि राज्यश्री दैन्यानें जेविं होय पंडितता ॥**
**नलिनी जेविं हिमजलें म्लान विषादें तशीच ती वनिता ॥१॥**

भाषांतर.

या ठिकाणीं ‘ वनिता ’ उपमेय असून ‘राज्यश्री’, ‘नलिनी’ आणि ‘पंडितता’ हीं उपमानें आहेत.

अथवा,

**( ३ ) तो शर-गर-धर-वरसा, पविसा, रविसा, स्मरारिसायकसा ॥**
**पार्थ भुजांतरिं शिरला वल्मीकामाजि नाग-नायकसा ॥ १ ॥**

मोरोपंत.

येथें ‘शर’ हें उपमेय असून, ‘गर-धर-वर’, ‘पवि’, ‘रवि’, ‘स्मरारिसायक’ हीं उपमानें होत; म्हणून वरील पद्यांत मालोपमा अलंकार साधला आहे.

जेव्हां पहिल्या वाक्यांतील उपमेय दुसऱ्या वाक्यांत उपमान होतें व ह्या दुसऱ्या वाक्यांतील उपमेय तिसऱ्या वाक्यांत उपमान होतें आणि या क्रमानें जेथें अनेक उपमेयें व अनेक उपमानें येतात तेथें **रशनोपमा** होते. जसें:-

**वाचेपरी दिसतसे मधुराहि मूर्ति ॥**
**मूर्ती जशी तशिच हे विमला सुकीर्ति ॥**
**कीर्तीसमान दिसते मन भूपतीचें ॥**
**हा भूप धन्य, नच अन्य दिसावयाचे ॥**

भाषांतर.

वरील पद्यांत पहिल्या ओळीमध्यें ‘ मूर्ति ’ हें उपमेय आहे व तें दुसऱ्या ओळींत उपमान झालेलें आहे. तसेंच दुसऱ्या ओळींतील ‘ कीर्ति ’ हें उपमेय तिसऱ्या ओळींत उपमान केलें आहे, म्हणून ही रशनोपमा होय.

---

## ( २ ) ससंदेह.

दोन किंवा अधिक पदार्थांमध्यें सादृश्य असून त्यापैकीं हा आहे किंवा तो आहे असा कविप्रतिभानिर्मित संशय जेथें उत्पन्न होतो तेथें **ससंदेह** नामा अलंकार होतो. ह्या ससंदेह अलंकाराचे दोन भेद आहेत (अ) **भेदोक्त**, (आ) **भेदानुक्त.** भेद म्हणजे प्रकृत (उपमेय) आणि सम (उपमान, अप्रकृत) ह्यांमध्यें अस-

लेलें वैधर्म्य. ज्या ठिकाणीं हें वैधर्म्य उक्त असतें त्या ठिकाणीं **भेदोक्त ससंदेह** अलंकार होतो व ज्या ठिकाणीं तें उक्त नसतें तेथें **भेदानुक्त ससंदेह** अलंकार होतो.

## ( अ ) भेदोक्त ससंदेह.

भेदोक्त ससंदेहाचे दोन प्रकार आहेतः—१ **निश्चयगर्भ** व २ **निश्चयांत.** निश्चय या शब्दाचा अर्थ संशयनिवृत्ति असा घ्यावयाचा.

( १ ) ला—**निश्चयगर्भ ससंदेह.** संशय उत्पन्न झालेला असून त्याचें निराकरण केलेलें असतें व पुन्हा नवीन संशय उत्पन्न होऊन शेवटीं वाचक संशयांतच राहतो असें जेथें वर्णन असतें तेथें **निश्चयगर्भससंदेह** अलंकार होतो. जसें:—

**( १ ) म्हणों रवि जरी, तया तुरग सप्त कीं ओढिती ॥**
**कृशानु ? तरि ना दिशा सकल सत्वरीं पेटली ॥**
**कृतांत ? तरि तो बसे महिषवाहनीं; यापरी ॥**
**रणीं तुज विलोकुनी मनिं विकल्प घेती अरी ॥ १ ॥**

भाषांतर.

या ठिकाणीं कोणी एक राजा हें उपमेय असून रवि, कृशानु व कृतांत हीं उपमानें आहेत; आणि उपमेय व उपमानें ह्यांच्यामध्यें अनुक्रमें ‘ दुर्निरीक्ष्यत्व, ’ ‘दुराधर्षत्व’ व ‘सकल-हंतृत्व’ हे साधारण धर्म आहेत. त्याचप्रमाणें ‘सप्ततुरगता,’ ‘सर्वत्र-प्रसरण’ व ‘महिष-वाहन’ हे अनुक्रमें उपमाननिष्ठ भेद आहेत. या भेदा ( वैधर्म्या ) मुळेंच तो राजा ‘रवि’ नाहीं ‘कृशानु’ नाहीं व ‘कृतांत’ नाहीं असा निश्चय झालेला आहे. तथापि शेवटीं तो राजा कोणाप्रमाणें आहे हें स्पष्ट न सांगतां संशयात्मकच ठेविलेलें आहे म्हणून हा निश्चयगर्भ ससंदेह अलंकार आहे.

**( २ ) निर्माणीं हिचिया प्रयत्न करि कीं तो चंद्र कांतिप्रद**
**शृंगारैकरसज्ञ काम, मधु वा पुष्पोद्भवें सौख्यद ।**
**वेदाभ्यासजडत्व ज्यास, विषयीं नाहीं कधीं कौतुक**
**ऐसा वृद्ध मुनि स्वरूप घडतो कैसें असें नाजुक ॥ १ ॥**

भाषांतर.

ही ऊर्वशीसंबंधीं विक्रमाची उक्ति आहे. ऊर्वशीला कोणीं उत्पन्न केलें याविषयीं तर्क करीत असतां चंद्र, मदन, वसंत व प्रजापति यांचीं नांवें सुचलीं. वेदाभ्यासामुळें बुद्धिमंद व विषयवासनेपासून अलिप्त असा ब्रह्मदेव असलें रूप निर्माण करूं शकणार नाहीं असा निश्चय करूनही शेवटीं तिला कोणीं उत्पन्न केली ही शंका राहतेच. म्हणून येथेंही **निश्चयगर्भ ससंदेह** अलंकार आहे.

(२) रा.-**निश्चयांतससंदेह**-ज्या ठिकाणीं प्रथम संशय उत्पन्न होऊन नंतर कोणत्यातरी प्रसिद्ध चिन्हावरून संशय-निवृत्ति होते असें वर्णन असतें तेथें निश्चयांतससंदेह अलंकार होतो. जसें:—

**(१) संताप दे यास्तव चंद्र नोहे**
**रवी म्हणावा तरि रात्र आहे ।**
**हा सागरांतूनि निघोनि गेला**
**आकाशमार्गी वडवाग्नि ठेला ॥१॥**

जुनें मराठी ४ थें पुस्तक.

येथे संतापदायक पदार्थ चंद्रही नाहीं व सूर्यही नाहीं असे संशयांचें निराकरण करून तो सागरस्थ वडवाग्नि आकाशांत वास करीत आहे असे वर्णिलें आहे.

**(२) प्रथम म्हणे हें काय द्युतिमंडल ? काय उतरला भानु ? ॥**
**सानूरुहि वरि दिसतो जाणो चालत असेल मणिसानु ॥ १ ॥**
**मग नगरी हें कळतां ठाकोनि करी विचार उज्वलधी ॥**
**श्रीद्वारका नव्हे हे आलिंगुनि कां हिला नसे जलधी ॥ २ ॥**

मोरोपंत.

या ठिकाणीं अनेक विकल्प मनांत येऊन नंतर प्रत्यक्ष दिसणारी वस्तु नगरी असावी असा सुदाम यास संशय आला. परंतु त्या नगरीभोंवतीं समुद्र हें प्रसिद्ध चिन्ह नसल्यामुळें ती नगरी द्वारका नसून दुसरीच एक आहे असा त्याचा निश्चय झाला, असें वर्णन आहे.

निश्चयगर्भससंदेहामध्यें उपमाननिष्ठ भेदामुळें निश्चय झालेला असतो; निश्चयांतससंदेहामध्यें उपमेयनिष्ठ भेदामुळें निश्चय झालेला असतो. निश्चयगर्भात मध्यें निश्चय असून शेवटीं संशयच कायम रहातो. निश्चयांतांत शेवटीं निश्चय असतो.

## ( आ ) भेदानुक्तससंदेह.

ज्या ठिकाणीं दोन अथवा अधिक पदार्थांमध्यें सादृश्य असतें परंतु त्यांमधील भेद ( भिन्नता दाखविणारा धर्म, वैधर्म्य ) स्पष्ट दिलेला नसतो तेथें **भेदानुक्त-ससंदेहालंकार** होतो. जसें:—

**( १ ) शरधिशर-जलधि फुटले कीं दैवें पाश एकदां तुटले ॥**
**कीं कालव्याल करटि-घोटक-भट-भेक खावया सुटले ॥ १ ॥**

मोरोपंत.

भीष्म व अर्जुन यांनीं एकमेकांवर सोडलेले बाण पाहून देवादिकांच्या मनांत वरील प्रकारचे अनेक संशय उत्पन्न झाले असें कवीनें वर्णन केलें आहे.

अथवा,

**( २ ) बोलति परस्परें ते येतो यशासि कोण हा रविसा ॥**
**कीं वन्हि कीं सनक हा भा सर्वांच्याहि येथ हारविसा ॥१॥**

विठ्ठल कवि.

भिक्षुरूप धारण करून बलीकडे याचना करण्यास गेलेल्या वामनास पाहून मुनिजनांच्या मनांत हे विकल्प आले असें वर्णन वरील पद्यांत आहे.

---

## ( ३ ) उत्प्रेक्षा.

जेथें उपमेयावर जणुं काय हें उपमानच आहे अशी संभावना केलेली असते तेथें **उत्प्रेक्षा** नामक अलंकार होतो.

उत्प्रेक्षेचे मुख्य दोन भेद आहेत. पहिला वाच्य अथवा स्पष्टोत्प्रेक्षा; दुसरा व्यंग्योत्प्रेक्षा. ज्या ठिकाणीं जाणो, वाटे, गमे कीं, हे अथवा अशा अर्थाचे दुसरे शब्द योजून उत्प्रेक्षा साधलेली असते तेथें वाच्योत्प्रेक्षा होते. जसें:—

**चांपेकळी-परिसही सरलत्व नाकीं ॥**
**जीचा धरी अधर विद्रुम-भावना कीं ॥**
**भासे मनांत मज बिंबफल-भ्रमानें ॥**
**कीं सत्य चंचु-पुट वोढविलें शुकानें ॥ १ ॥**

रघुनाथ पंडित.

या ठिकाणीं दमयंतीचें नाक अगदीं सरळ व अधरोष्ठ पोंवळ्यांप्रमाणें लाल असल्यामुळें तिचा अधर पिकलेलें तोंडलेंच आहे अशी भ्रांति होऊन तें धरण्या-

करितां तिची नासिका हेंच चंचु-पुट शुकानें जणुं काय पुढें केलें आहे अशी संभावना केलेली आहे. वरील पद्यांत ' भ्रमानें ' हा शब्द जरी आला आहे तरी तो भ्रम संभावनेचाच भाग असल्यामुळें हा भ्रांतिमान् अलंकार होत नाहीं. येथें ' भासे ' व ' कीं ' हे शब्द उत्प्रेक्षादर्शक आहेत.

ज्या ठिकाणीं उत्प्रेक्षादर्शक शब्द स्पष्ट नसतात तेथें **व्यंग्योत्प्रेक्षा** होते. जसें:—

**होऊनि शैल-शिखरावरि लंबमान ॥**
**हे गर्जतात घन दुंदुभिच्या समान ॥**
**ऐकोनि शब्द उडती शिखि पक्षपातें ॥**
**ते वीजती मणिमय-व्यजनें नभातें ॥ १ ॥**

परशुरामशास्त्री गोडबोले.

ह्या ठिकाणीं मेघध्वनि ऐकून मोर आनंदानें पंख हालवूं लागले; यावर ते जणूं काय रत्नखचित पंख्यानें मेघास वाराच घालतात अशी कवीनें संभावना केली आहे. येथें उत्प्रेक्षादर्शक शब्द दिलेला नाहीं.

याशिवाय उत्प्रेक्षेचे दुसरे तीन प्रकार आहेत. ( १ ) **स्वरूपोत्प्रेक्षा,** ( २ ) **हेतूत्प्रेक्षा** आणि ( ३ ) **फलोत्प्रेक्षा.**

( १ ) **स्वरूपोत्प्रेक्षा**—एका पदार्थाची अथवा क्रियादिकांची दुसऱ्या पदार्थाशीं अथवा क्रियादिकांशीं जेथें एकरूपता वर्णिलेली असते तेथें **स्वरूपोत्प्रेक्षा** नामक अलंकार होतो. जसें:—

**( १ ) कौसल्या मलिना कृशा स्व-तनयाश्लेषें तदा हर्षिली ॥**
**आनंदाश्रु-करूनि राघवशिरीं हुंगूनियां वर्षिली ॥**
**पूर्वीच्यापरि विघ्न होइल असें मानूनियां क्षिप्र ती ॥**
**कोणातेंहि न पूसतां करि जणो राज्याभिषेकाप्रती ॥ १ ॥**

मोरोपंत.

येथें रामास भेटल्यावर कौसल्येच्या डोळ्यांतून आनंदाश्रू पडले ह्या क्रियेवर तिनें जणू काय त्यास गुप्तपणें राज्याभिषेकच केला अशी कवीनें उत्प्रेक्षा केली आहे; या दोन्ही क्रियेमध्यें तादात्म्य ( एकरूपता ) दाखविलें आहे म्हणून हें स्वरूपोत्प्रेक्षा अलंकाराचें उदाहरण आहे.

**( २ ) कुंडल-मंडित पांड्य-क्षितिपतीचें शिर धरातळीं पडलें ।**
**भासे पतन विशाखा-मध्यग-पूर्णेंदु-मंडला घडलें ॥**

या ठिकाणीं कर्णातील दैदीप्यमान कुंडलांचें विशाखा नक्षत्राच्या दोन तेजस्वी ताऱ्यांशीं व पांड्यनृपतीच्या मुखाचें पूर्णिमेच्या चंद्राशीं अभेद ( तादात्म्य ) कल्पून संभावना केली आहे म्हणून येथें **स्वरूपोत्प्रेक्षा** अलंकार झाला आहे.

**( ३ ) जातें भरून जिकडे तिकडे धुकें तें**
**प्राण्या दिसे न जरि वस्तु समीपही ते ।**
**कीं शत्रुचा उगवण्या जणु सूड शीतें**
**हा कोंडला ज्वलनधूम्र गमेच मातें ॥**

पां. गो. पारखीशास्त्री

वास्तविक पाहतां धुकें पसरलेलें होतें ह्यावर शत्रूचा सूड घेण्याकरितां थंडीनें सूर्यावर धूम्रास्त्रच टाकलें आहे असें येथें वर्णिलें आहे. वस्तुस्थितीस धरूनच ही संभावना असल्यामुळें हें **स्वरूपोत्प्रेक्षे**चें उदाहरण होय.

**( ४ ) हे नाचती रुचिर मोर समोर फार**
**ज्या बर्ह रम्य फुटले नव चित्र थोर ।**
**जाणो बघून शिखिनृत्यकला वसंतें**
**हा अर्पिलाच नवरत्नकलाप यांतें ॥ १ ॥**

पांडुरंगशास्त्री पारखी.

मोर नाचतांना आपला पिसारा आनंदानें उभारतात हें प्रसिद्धच आहे; यावर वसंतराजानें त्याच्या नृत्यकौशल्यावर संतुष्ट होऊन त्यास तो नवरत्नकलाप पारितोषक म्हणून दिला अशी संभावना केली आहे. हंही स्वरूपोत्प्रेक्षेचं सुंदर उदाहरण आहे.

( २ ) **हेतूत्प्रेक्षाः**—वस्तुस्थितीचें वर्णन असूनही ती स्थिति कोणच्या तरी कविप्रतिभानिर्मित कारणामुळें घडून आली असे जेथें दाखविलें असतें तेथें **हेतूत्प्रेक्षा**नामक अलंकार होतो. जसेंः—

**( १ ) परस्पराश्लेष–सुखें सखीचे ॥**
**उरोज पुष्टी वरितात साचे ॥**
**उत्कर्ष यांचा न सहे म्हणोनी ॥**
**हा मध्य घेई तनुता रुसोनी ॥ १ ॥**

**भाषांतर.**

ह्या ठिकाणीं स्त्रीच्या सौंदर्याचें स्वाभाविक वर्णन असून तिच्या स्तनांस पुष्टि येण्याचें कारण परस्परालिंगनसुख व तिची कंबर बारीक असण्याचें कारण तिच्या स्तनांचें पीनत्व सहन न होऊन मत्सरानें तिचा कटि-भाग झुरणीस लागला आहे हें होय असें वर्णिलें आहे.

अथवा,

( २ ) ही आम्रपंक्ति पवनें बहु डोलताहे ॥
शाखाग्रपल्लवकरें कुसुमांसि वाहे ॥
जाणो स्वपोषक वसंत गृहासि आला ॥
तत्पूजनार्थ बहु हर्षचि तीस झाला ॥ १ ॥

के. स. रिसबूड.

वरील पद्यांत आम्र वृक्षांस मोहोर आल्याचें वर्णन आहे. परंतु यावर आपला पोषक वसंत घरीं आल्यामुळें हर्षभरित होऊन त्यास ते वृक्ष फुलें वहात आहेत अशी संभावना केली आहे. दोन्ही पद्यांत ज्या गोष्टी घडल्या आहेत असें वर्णन आहे त्यांस कविप्रतिभानिर्मित कारणें दिलेलीं आहेत म्हणून हीं हेतूत्प्रेक्षेचीं उदाहरणें होत.

( १ ) एकांतिची सहचरी तव मेखला ही
तीही अतां मधुर शब्द करीत नाहीं ॥
याचेवरोनि मज हे करभोरु ! भासे
कीं ती तुझ्याचि विरहें मृत जाहलीसे ॥

गणेशशास्त्री लेले.

इंदुमती मृत झाल्यावर अजानें पुष्कळ विलाप केला त्या वेळीं तिच्या मेखले-(घागऱ्या युक्त कंबरपट्ट्या) संबंधीं वरील वर्णन आहे. चलनवलन झाल्याशिवाय मेखलांतून आवाज निघत नाहीं. परंतु येथें आवाज न निघण्याचें कारण विरह-दुःखामुळें मरण हें कल्पिलें आहे म्हणून येथें हेतूत्प्रेक्षा आहे.

( २ ) उपवर जरि झाल्या, हीन दैवें न झाला
अभिमत पतिलाभ, प्राप्त तो या लतांला ॥
म्हणुनि पडति खिन्ना भूवरी चारुगात्री
धरुनि हृदिं बुझावी माय त्या भूतधात्री ।

केशव नारायण वैद्य.

कित्येक तरुणी वेलींमध्यें पाय अडकून पडल्या. यावर त्या आपणांस वेलींच्या प्रमाणें अद्यापि वरप्राप्ति झाली नाहीं म्हणून त्या भूमीवर खिन्न होऊन पडल्या व धरित्री माता त्यांचें सांत्वन करिती झाली असें येथें वर्णन आहे. येथें पडण्याच्या क्रियेस कविकल्पित हेतु आहे म्हणून हा **हेतूत्प्रेक्षा** अलंकार आहे.

३. **फलोत्प्रेक्षाः**—वस्तुस्थितीपासून कोणतें तरी कविप्रतिभानिर्मित फल प्राप्त झालें आहे असें जेथें वर्णन असतें तेथें फलोत्प्रेक्षा होते. जसें:—

**( १ ) जलांत आकंठ सदा उभी जी ॥**
**दिवाकरा सेवित पद्मराजी ॥**
**उरोज-प्राप्त्यर्थ सुलोचनेचे ॥**
**करीतसे कीं तप घोर साचें ॥ १ ॥**

भाषांतर.

वरील पद्यांत कमलिनी पाण्यांत उभ्या आहेत ही वस्तुस्थिति आहे. परंतु या गोष्टीवर कवीनें अशी उत्प्रेक्षा केली आहे कीं, कोणी एका रूपवती स्त्रीच्या स्तनाच्या ठायीं वास घडणें हें जें फळ तें प्राप्त करून घेण्याकरितां ह्या पाण्यांत उभ्या राहून घोर तप करीत आहेत.

**( २ ) प्रभातीं फुल्लांभोरुह–समुदयालागिं भजतो ॥**
**तसा वृक्षांच्याही शिथिल कुसुमांलागिं हरितो ॥**
**तुझ्या श्वासामध्यें परिमल निसर्गेंच वसतो ॥**
**जणूं तत्प्राप्त्यर्थ स्फुट पवन हा यत्न करितो ॥ १ ॥**

गणेशशास्त्री लेले.

येथें अज राजपुत्राच्या वदनाचा सुवास आपणासही प्राप्त व्हावा म्हणून कमलांचा व वृक्षांवरील फुलांचा वास वायु हरण करितो असें वर्णन आहे.

अथवा,

**(३) विरहाग्निकुंड केवळ हृदय, वियोगिनि! तुझें मला गमतें ॥**
**प्रिय–भेटी व्हाया कीं, हार कठोरा करी तपा स्वमतें ॥ १ ॥**

भाषांतर.

येथें कोणे एका विरहिणीच्या गळ्यांतील हार तिच्या हृदयरूपी अग्निकुंडांत उभा राहून तिच्या पतीची भेट हें जें फळ त्या फळाची प्राप्ति करून देण्यासाठीं भयंकर तपश्चर्या करितो आहे अशी कवीनें उत्प्रेक्षा केली आहे.

पंडित.

जेथें एकाच उपमेयावर अनेक उपमानांची संभावना केले· रे तेथें **मालोत्प्रेक्षा** अलंकार होतो. जसें:—

**(१) समरीं मत्त मतंगज कीं दोघे व्याघ्र कीं मृगाधिपतं.**
**कीं वृष, कीं घन, कीं ग्रह, कीं नग, कीं अंधक स्मरा·**

म.

येथें इंद्रजित व लक्ष्मण हे दोघे उपमेयाचे ठायीं असून त्यांवर अनेक नांची संभावना केलेली आहे.

अथवा,

**( २ ) रूपें तीं स्मरकल्पवृक्ष हरिचीं, गोपांगना त्या लता ॥**
**कीं ते मेघसमूह, त्या चमकती त्यांमाजि विद्युल्लता ॥**
**कीं तारा युवती अनंत गगनीं मूर्तीं, मधें नीलता ॥**
**जेंव्हां एकचि तेधवां उडुगणीं भूचंद्रमा खालता ॥ १ ॥**

वामन.

येथें कृष्ण व गोपी हीं दोन उपमेयें असून त्यांच्यावर अनेक उपमानांची संभावना केली आहे.

---

## ( ४ ) भ्रांतिमान्.

एक पदार्थासारखा दुसरा पदार्थ पाहिल्यानंतर हाच तो पहिला पदार्थ असा जेंव्हां पाहाणाराचा निश्चय होतो तेंव्हां **भ्रांतिमान्** अलंकार होतो. जसें:—

**( १ ) जटा नोहे वेणी नच गरल हें कस्तुरि असे ॥**
**न रेखा चंद्राची शिरिं, कुसुम हें शुभ्र विलसे ॥**
**न हें अंगीं भस्म प्रिय विरहयोगें धवलता ॥**
**शिवभ्रांतीनें कां मजसि मदना होसि छळता ॥ १ ॥**

भाषांतर.

येथें ‘ जटा नाहीं ’ असा निषेध करून नंतर ‘ वेणी आहे ’ असें स्थापित केल्यासारखें दिसत असल्यामुळें हें अपन्हुती अलंकाराचें उदाहरण आहे असें वाटण्याचा संभव आहे. परंतु वास्तविक तसें नाहीं. कोणी एक स्त्री मदनास उद्देशून म्हणते कीं, मला पाहून हा शिवच आहे असा भ्रम होऊन तूं मला छळीत आहेस, असें पद्यांत वर्णन आहे. स्त्रीला पाहून मदनास शिवाची भ्रांति होऊन तो

तिला खरोखरच छळूं लागला यामुळेंच हा भ्रांतिमान् अलंकार झाला आहे. मदनास झालेला भ्रम दूर करण्याकरितां म्हणजे मी शिव नव्हे, स्त्री आहें हें त्यास कळविण्याकरितां 'जटा नोहे' 'गरल न' वगैरे निषेधात्मक वाक्यें घालून आपला छल न करण्याविषयीं तिनें त्याची विनवणी केली आहे.

( २ ) हृदयिं विलसे माला माझ्या न पन्नग हा असे ॥
सखि-विरहि मी लावी शीता उटी, विभुती नसे ॥
कुवलय-दल-श्रेणी कंठीं, न ही गरल-द्युती ॥
स्मर ! मज हर-भ्रांतीनें कां व्यथा करिशी अती ॥ १ ॥

भाषांतर.

येथेंही हर-भ्रांतीनें मला छळूं नको असें एका विरही तरुणाचें मदनास उद्देशून भाषण आहे. हाही भ्रांतिमान् अलंकार आहे.

( ३ ) हें होय पंकज, न आनन सुंदरीचें ॥
इंदीवरें असतिं हीं नच नेत्र तीचे ॥
मुग्धाक्षिसंनिध अजून मधुव्रता रे ॥
हें गुंज हें भ्रमण होय वृथाचि सारें ॥ १ ॥

भाषांतर.

येथेंही वरील प्रमाणेंच वर्णन असून भ्रांतिमान् अलंकार झाला आहे.

( ४ ) पुष्पें पलाश तरुचीं समजून भृंग ॥
जाती तदा शुक-मुखावरि हे सवेग ॥
हीं जांभळेंच अलि आलि अशा भ्रमें कीं ॥
राघू तयास धरण्या बघती विलोकीं ॥ १ ॥

पा. गो. शास्त्री पारखी.

ह्या ठिकाणीं भ्रमरांस राघूंच्या लाल चोंची पाहून तीं पलाशपुष्पेंच आहेत असा भ्रम झाला व भ्रमर तोंडाजवळ आलेले पाहून राघूंस जांभळांचा भ्रम झाला असें वर्णन आहे.

( ५ ) हंसा विलोकुनि सुधाकर अष्टमीचा ॥
त्यां मानिला निटिल देश तिचाच साचा ॥
शंख-द्वयीं धरुनि कौंकुम कीरवाणी ॥
लावावया तिलक लांबविला स्वपाणी ॥ १ ॥

रघुनाथ पंडित.

चंद्राला पाहून नळाला हा दमयंतीचा निटिल-देश आहे असें वाटून तिच्या कपाळीं कुंकु लावण्याकरितां त्यानें हात लांब केला असें येथें वर्णन आहे.

असा भ्रम जेथें खरोखरच उत्पन्न झाल्याचें वर्णन असतें तेथेंच भ्रांतिमान् अलंकार होतो—एरव्हीं होत नाहीं.

---

## ( ५ ) अपह्नुति.

( अपह्नव किंवा अपह्नुति=अपलाप किंवा निषेध ).

प्रकृताच्या ( उपमेयाच्या ) वास्तविक स्वरूपाचा अपलाप किवा निषेध करून त्यावर लागलींच अप्रकृताचा ( उपमानाचा ) आरोप जेथें केलेला असतो तेथें अपह्नुति अलंकार होतो. जसेः—

**( १ ) न हे नयन, पाकळ्या उमलल्या सरोजांतिल ॥**
**न हें वदन, चंद्रमा शरदिंचा गमे केवळ ॥**
**न हा अधर तोंडलें, न्हत दांत हे कीं हिरे ॥**
**स्वरूप तव तें मनीं अचल बा बसो गोजिरें ॥ १ ॥**

दत्तात्रय तुकाराम पणशीकर.

या पद्यांत नयन, वदन, अधर इत्यादि पदार्थ प्रस्तुत असून त्यांचा स्पष्ट निषेध केला आहे व त्यांवर पाकळ्या, चंद्रमा, तोंडलें या अप्रस्तुतांचा ( उपमानांचा ) आरोप केला आहे.

अपह्नुतीचे दोन प्रकार आहेत ( १ ) शाब्दी ( २ ) आर्थी.

जेथें निषेध स्पष्ट केलेला असतो तेथें **शाब्दी** अपह्नुति होते. जसेंः—

**(१) तृण न अंथरिला नव गालिचा। हरित चित्रित कीं हरि-गेहिंचा ॥**
**न जलयंत्र अहा सुरबालिका। बसुनिया फिरवी मणि-मालिका ॥ १ ॥**
**न कमलें कुणि या कमलानना। जलविहार जसा रुचला मना ॥**
**मिळवुनी सखिया जळिं खेळती। हसुनियां नयनीं गुज बोलती ॥ २ ॥**

वसंत-विहार.

कित्येक वेळां उपमेयाचा निषेध मागाहून करितात जसेंः—

**( २ ) अनेक रत्नावलिबद्ध सेतु ॥**
**मंदाकिनी-मंडण मुख्य हेतु ॥**
**असे, दिसे भव्य कमान त्याची ॥**
**न मूर्ति ही इंद्रशरासनाची ॥ १ ॥** राधारमण.

येथें हें इंद्रधनुष्य नव्हे तर सुरनदीवरील रत्नखचित सेतूची भव्य कमान आहे असा त्यावर आरोप केलेला आहे.

अथवा,

**(३) शंकर-भयें उमेच्या लपला होता तनूंत पंचशर ॥**
**त्याचा प्रथमांकुर तो धरिला देवें जणों, न गौरिकर ॥१॥**

कुमारसंभव.

येथें गौरीचा कर हें प्रस्तुत असून त्याचा निषेध करून तिच्या हृदयांत उदित झालेल्या स्मरकामनेचा अंकुरच हरानें आपल्या हातीं धरला असें वर्णन आहे.

जेथें निषेध म्हणजे प्रस्तुताची असत्यता स्पष्ट दर्शविलेली नसून ती मिष व्याज, छल, खोटें, लटिकें, छेः इत्यादि शब्दांनीं सूचित केलेली असते तेथें **आर्थी** किंवा **मिषापह्नुति** म्हणतात. जसें:—

साकी.

**(१) मत्स्य उसळतां उदरें त्यांचीं चमकति वारंवार ॥**
**त्याच मिषें ती नदी तुजवरी फेंकिल कटाक्ष फार ॥१॥**

कृष्णशास्त्री चिपळूणकर.

या ठिकाणीं मत्स्य हें प्रकृत आहे व ' मिष ' या शब्दानें त्याचा प्रतिनिषेध केलेला आहे म्हणजे तें असत्य आहे असें दाखविलें आहे आणि लागलींच त्यांचे-वर कटाक्षाचा आरोप केलेला आहे. अर्थात् ते मत्स्य नव्हत तर नेत्रकटाक्ष आहेत असा निषेधपूर्वक निश्चय येथें केलेला आहे म्हणून हें मिषापह्नुतीचें उदाहरण होय.

**(२) कर्णफुलांनीं भूषित वदन सुतेचें करोनिया वरती ॥**
**मंगलकार्यनिमित्तक तिलक करी कन्यकेस निज हातीं ॥ १ ॥**
**वाटे तिलक-मिषानें स्पष्ट करी निजसुता मनोरथ ती ॥**
**पूर्वी निपजुनि जो कुच-युगलासह वाढला असेच अती ॥२॥**

कुमारसंभव.

येथें मेनेनें गौरीस तिलक लाविला तो तिलक नसून तद्रूपानें आपल्या मुलीचा पतिदर्शन घेण्याचा दीर्घमनोरथच स्पष्ट केला असें वर्णिलें आहे.

( ३ ) क्रोधें पुष्पशराच्या देहा जाळी महेश हें खोटें ॥
बघतां स्मरें स्वयें हा लज्जेनें देह ठेविला वाटे ॥ १ ॥

कुमारसंभव.

येथें शिवानें मदनास जाळलें या गोष्टीचा अपलाप करून शिवाच्या सौंदर्यानें लज्जित होऊन मदनानें आपण होऊनच जीव दिला असें वर्णन आहे.

अपह्नुति मालारूपानेंही संभवते. जसें:—

( ४ ) तुहिनकर नव्हे, हें बीज चिंतालतेचें ।
विकसित अथवा हें पुष्प उद्वेगतेचें ॥
अभिनव मदनाचें छत्र किंवा उभारे ।
युवतिजन जयाच्या दर्शनें मात्र भारे ॥१॥

सामराज.

येथें तुहिनकराचा म्हणजे चंद्राचा एकवार निषेध असून त्यावर तीन निरनिराळे आरोप केले आहेत म्हणून येथें मालाऽपह्नुति अलंकार आहे.

कोठें कोठें निषेध गर्भित असतो. जसें:—

( १ ) ती ब्रह्मनिष्ठितातें स्पर्शून करें बळेंच हालविते ।
आनंदनिर्भराच्या वृत्त्यमृतिं कालकूट कालविते ॥१॥

विठ्ठलाचार्य दुपाटी.

येथें रंभेनें शुकाचार्यास हातानें हालविलें हें प्रस्तुत होय. पण याचा निषेध करून तिनें शुकास हालविलें नाहीं तर त्याच्या आनंदवृत्तीच्या अमृतांत विष कालविलें असा आरोप केला आहे.

( २ ) कोणी अंक शशीचा, कोणि म्हणे पंक हा समुद्राचा ॥
कोणी छाया भूची, कोणी सारंग मानितो साचा ॥ १ ॥
परि, चंद्रावरि दिसतो नीलमणिसमान भाग जो काळा ॥
भक्षित गाढ तमाचा बनला कुक्षींत तो पहा गोळा ॥ २ ॥

भाषांतर.

चंद्रावर जो काळा भाग आहे त्यास कोणी अंक, कोणी पंक इत्यादि म्हणतात; परंतु हें सर्व असत्य आहे, असा गर्भित निषेध करून तो काळा भाग चंद्रानें रात्रीं भक्षण केलेल्या तमाचा गोळा आहे असा आक्षेप केलेला आहे. या ठिकाणीं

निषेध ‘ न ’ वगैरे शब्दांनीं स्पष्ट दाखविलेला नाहीं. अथवा छल, छद्म, कपट इत्यादि शब्दांनींही व्यक्त केलेला नाहीं. तो येथें गर्भित आहे. हें गर्भित अपह्नुतीचें उदाहरण होय.

अपह्नुतीचा आणखी एक प्रकार आहे त्यास **छेकापन्हुति** असें म्हणतात. या अलंकारांत केलेलें वर्णन बहुतकरून दोन पदार्थास लागू पडणारें असतें; व हें वर्णन अमुकाविषयीं आहे काय असा प्रश्न विचारल्यावर ‘ नव्हे ’ असा निषेध करून तें दुसऱ्याच पदार्थांचें वर्णन आहे असें दाखविलेलें असतें. छेक म्हणजे चतुर. चतुर पुरुषांच्या भाषणांत याचा मोठ्या खुबीनें उपयोग केला जातो. जसें:—

**अंबरगत परि पयोधरातें रगडुनि पळतो दुरी ॥**
**काय हा धीट म्हणावा तरी ॥ १ ॥**
**तो नंदाचा मूल काय गे सांग कन्हया हरी ॥**
**नव्हे गे मारुत मेघोदरीं ॥ २ ॥**
**सासु सासरा पति या देखत अधरामृत माधुरी ॥**
**घेतसे काय वदावी परी ॥ ३ ॥**
**तो नंदाचा मूल काय गे सांग कन्हया हरी ॥**
**नव्हे गे मधुपव्रज हा करी ॥ ४ ॥**

रामजोशी.

---

## ( ६ ) रूपक.

जेव्हां उपमेयावर उपमानाचा आरोप केलेला असतो म्हणजे उपमेय हें उपमानच आहे-दोघांचीही एकरूपता आहे-त्यांच्यांत भेद किंवा भिन्नपणा नाहीं असें जेथें वर्णन असतें तेथें **रूपक** अलंकार होतो. जसें:—

**( १ ) माझा मनोमधुप लुब्ध बहूत झाला ॥**
**तूझे पदांबुजयुगीं रहिवास केला ॥**
**काकूळती बहुत याच निमित्त येतें ॥**
**कृष्णा ! तुझें चरण-पल्लव हे धरीतें ॥ १ ॥**

सामराज.

येथें मनावर मधुपाचा, पदावर अंबुजाचा आणि चरणावर पल्लवाचा आरोप केला आहे. म्हणजे उपमेयें व उपमानें यांची एकरूपता आहे-त्यांच्यांत भेद

नाहीं–असें वर्णन आहे म्हणून येथें **रूपक** अलंकार झाला आहे. या अलंकारांत उपमानाचा रंग उपमेयावर चढविल्यासारखें दिसतें.

**( २ ) आकाशाच्या लग्नमंडपीं लता करवल्या या,**
**वृक्षबालकां लाजुनि पल्लव सांवरितां दमल्या !**
**कळया कोंवळया, हलती कानीं डूल मजेदार;**
**उषा-वधूवरि सुमाक्षतांहीं करितीं भडिमार ॥ १ ॥**

वाग्वैजयन्ती.

येथें आकाश व मण्डप, लता व करवल्या, वृक्ष व बालक, कळया व डूल, सुम व अक्षता आणि उषा व वधू यांच्या मध्यें अभेद दर्शविला आहे. हेंही रूपकाचें सुंदर उदाहरण आहे.

रूपकाचे मुख्य तीन प्रकार आहेतः–( १ ) **सांग** ( २ ) **निरंग** व ( ३ ) **परंपरित.**

(१) जेथें एकादी वस्तु व तिचीं अंगें (अवयव किंवा भाग) यांच्यावर पृथक् पृथक् आरोप केलेले असून मुख्य वस्तूवरील आरोप प्रधान असतो तेथें **सांग** रूपक होतें. सांग रूपकाचे दोन भेद आहेतः–( अ ) सांग समस्तवस्तुविषय रूपक व ( आ ) सांग एकदेशविवर्ति रूपक.

( अ ) **सांग समस्तवस्तुविषय रूपकः—**

**( १ ) शाखा सद्गुण, पालवी विनयही, विश्रंभ मूलें, दया**
**छाया; स्वाचरण प्रकांड फुलली चारित्र्यपुष्पें जया ॥**
**सत्कारोपकृती फळें रस सुधातुल्या गिरा वाहती**
**ऐशा सज्जनपादपावरि सुहृत्पक्षी सुखें राहती ॥ १ ॥**

परशुराम भाऊ गोडबोले.

येथें सज्जनावर पादपाचा आरोप मुख्य असून त्या सत्पुरुषाच्या अंगीं असलेल्या सद्गुण, विनय, विश्रंभ ( विश्वासपात्रता ), दया इत्यादि गुणांवर शाखा, पालवी, मूलें, छाया, फुलें, फळें ह्या वृक्षाच्या अवयवांचा आरोप केला आहे; पण हा आरोप गौण आहे.

( २ ) येतो फार सुगंध जीस मधुचा, जो वेधितो कीं मन
आरक्ताधररूप रम्य दिसतो पाला जिला शोभन ॥
पुष्पें हींच जिचें मनोज्ञ हसणें ज्याची प्रभा पांढरी
येणें ती नवमल्लिकाख्य युवती चित्ता प्रमोदा करी ॥ १ ॥

गणेशशास्त्री लेले.

येथें नवमल्लिका नांवाच्या लतेवर युवतीचा आरोप मुख्य असून सुगंध, पाला, पुष्पें यांच्यावर मधुगंध, आरक्ताधर व मनोज्ञ हास्य ह्यांचा ( अंग, क्रिया व गुण यांचा) आरोप केल्यामुळें हें सांग समस्तवस्तुविषय रूपक झालें आहे.

( ३ ) लावण्यकल्पलतिकाच असे शुभांगी ॥
शाखा सुबाहु, मृदु गल्ल फुलें सुरंगी ॥
लोलाक्षिभृंग हलती कुच सत्फलें कीं ॥
देते सकाम पुरुषा फल इष्ट लोकीं ॥ १ ॥

पांडुरंग गोविंदशास्त्री पारखी.

या पद्यांत स्त्री-लतिका हें मुख्य रूपक असून बाहु-शाखा, गल्ल-फुलें, अक्षि-भृंग कुच-फलें ही स्त्रीच्या व लतेच्या अवयवांनीं साधलेलीं रूपकें गौण होत.

( आ ) **सांग एकदेशविवर्ति रूपकाचें** उदाहरणः—

भवग्रीष्मीं तापें तनु बहु असे तप्तहि जडा ॥
म्हणोनी तोडोनी द्विरद अविवेकाख्य निगडा ॥
विशुद्धीं त्या आत्मामृतसरसिं नैराश्यशिशिरीं ॥
निवारोनि जालां अनुभवि, कृती सौख्य-लहरी ॥ १ ॥

भाषांतर.

वरील पद्यांत भवावर ग्रीष्माचा, अविवेकावर निगडाचा ( साखळदंडाचा ) ब्रह्मपदावर सरोवराचा केलेला आरोप व्यक्त आहे. वरील रूपकावरून व पद्याच्या अर्थावरून कृती ( ब्रह्मपदीं लीन झालेल्या ) वर ( द्विरदाचा ) गजाचा आरोप केलेला आहे हें स्पष्ट दिसून येतें. पण हा आरोप स्पष्ट नसून ध्वनित आहे.

ज्या वस्तूवर आरोप केलेला असतो त्या वस्तूस ‘ आरोपविषय ’ अथवा ‘ उपमेय ’ असें म्हणतात व ज्या वस्तूचा आरोप केलेला असतो त्या वस्तूस

'आरोप्यमाण' अथवा 'उपमान' म्हणतात. सांग-समस्त-वस्तुविषय-रूपकामध्यें उपमेयां ( आरोपविषयां ) प्रमाणेंच उपमानें ( आरोप्यमाणें ) स्पष्ट दिलेलीं असतात म्हणजे वाच्य असतात; परंतु सांग-एकदेश-विवर्ति-रूपकामध्यें कांहीं उपमानें वाच्य असतात व कांहीं अर्थावरून ध्यानांत येण्यासारखीं असतात. हा या दोन प्रकारांत फरक आहे.

( २ ) **निरंगरूपक**—जेथें अवयवांचीं रूपकें साधलेलीं नसून एक किंवा अधिक रूपकें प्रधान असतात तेथें **निरंगरूपक** होतें. याचे दोन भेद आहेत. ( १ ) शुद्ध रूपक व ( २ ) मालारूपक.

( १ ) निरंग शुद्ध रूपकामध्यें अवयवांचीं रूपकें न साधतां एकच शुद्ध सरळ रूपक साधलें असतें किंवा अनेक शुद्ध साधीं प्रधान रूपकें साधलेलीं असतात. जसें:—

**(१) नदी-तडागादिजला हरूनी । शुष्का धरा वृक्ष लता करूनी ।**
**उष्णांशु कोठें लपला पहाती । विजा-दिवे घेउनि मेघ हातीं ॥१॥**

पाण्डुरंगशास्त्री पारखी.

येथें विजा व दिवे यांच्यामध्यें अभेद दर्शविला आहे. येथें दुसरें रूपक नाहीं म्हणून हें शुद्धरूपक आहे.

**( २ ) मानधन प्रभु मीं जें वद्लों कर्तव्य त करीन खरें ।**
**ऐसा कोण प्राणी ज्यातें न करील वश हरी नखरें ॥ १ ॥**

मोरोपंत.

येथेंही 'मानधन' हें एकच रूपक आहे.

**( ३ ) रम्य देखावे नभोमंडलाचे**
**प्रेम किंवा तूझिया प्रियजनाचें ।**
**अपरिचय कीं संसार-विपत्तीचा**
**उगम आहे हा काव्य-निर्झरीचा ? ॥ १ ॥**

चं. शि. गोन्हे.

येथें नभोमंडल, संसारविपत्ति व काव्यनिर्झरी हीं तीन स्वतंत्र निरंगरूपकें आहेत.

( ४ ) पिता जरि विटे, विटो, न जननी कुपुत्रीं विटे
दयामृतरसार्द्रधी न कुलकज्जलें त्या किटे; ॥
प्रसादपट झांकिती परि परा गुरूचे थिटे
म्हणून म्हणती भले 'न ऋण जन्मदेचें फिटे' ॥ १ ॥

मोरोपंत.

येथें दयामृत, प्रसादपट हीं दोन स्वतंत्र रूपकें आहेत.

( २ ) जेथें एकच आरोपविषय ( उपमेय ) असून आरोप्यमाणें ( उपमानें ) अनेक असतात तेथें **माला–रूपक** अलंकार होतो. जसें:—

( १ ) निशा-सस्मित-मुख रम्य दिसे साचा
इंदु मौक्तिक–कंदुक प्रियसखीचा ॥
लाविला कीं त्रैलोक्य-मोह-नाशी
नभःश्रीनें तो तिलक निटिल देशीं ॥ १ ॥

गगन-रत्नाकर-रत्न शुभ्र किंवा
शुक्ति मौक्तिक-भाचीच शोभते वा ॥
अभ्रवापींतिल पुंडरीक ताजे
रतीचा कीं आदर्श इंदु साजे ॥ २ ॥

पांडुरंगशास्त्री पारखी.

येथें किंवा, कीं, वा हीं आक्षेपवाचक संदेहबोधक अव्ययें होत; संभावनादर्शक नाहींत. हा मालारूपक अलंकार होय.

( २ ) अगार श्रेयांचें सकल जन संतोष अवनी ।
अशेषा तीर्थांची गुरु, रुचिर, माला त्रिभुवनीं ॥
मतीशीं सौख्या दे मलिन मतिला दुर्लभ रुची ।
असे धाम श्रीचें तव वपु हरू आग अमुची ॥ १ ॥

वामन पंडित.

येथें श्रीगंगेची वपु वर्णनीय वस्तु असून तिला श्रेयांचें अगार, तीर्थांची माला इत्यादि अनेक उपमानें आहेत. येथें अनेक प्रधान रूपकें झालेलीं आहेत, म्हणून येथें मालारूपक अलंकार झाला आहे.

**(३) राम धनंजय, तूंही कापूर, तृण, तूल, काष्ठ, घृत, तैल ॥**
**शैलहि पिचविल, हें तुज नुमजे, तूं मातला जसा बैल ॥ १ ॥**

मोरोपंत.

या ठिकाणीं 'राम' व 'अग्नि' 'रावण' व 'कापूर' 'तृण' इत्यादिकांमध्यें अभेद कल्पिला असून आरोपविषय जो रावण त्यास अनेक आरोप्यमाणें आहेत.

अथवा,

**(४) हर्ष-मृगाचा वणवा, विनय-तरूचा प्रमत्त हस्ती हो ॥**
**विज्ञान-दीपकाचा चंड समीरण असत्समागम हो ॥ १ ॥**

गंगाधरशास्त्री.

येथें खलसमागम व वणवा, हस्ती आणि वायु यांच्यामध्यें अभेद वर्णिला आहे.

**(५) शव-मांस-मत्त जंबुक तूं, गजमुक्ताश सिंह तो जिष्णु ॥**
**तूं शशक, पार्थ मृगपति, कीं दानव तूं सिताश्व तो विष्णु ॥१॥**

( ३ ) **परंपरितरूपकः**—जेथें एक आरोप दुसऱ्या आरोपाचें कारण असतें म्हणजे जेथें एक रूपक साधल्यामुळें दुसरें रूपक सिद्ध होतें व अशा रीतीनें दोन किंवा अधिक रूपकांची क्रमप्राप्त परंपराच जेथें तयार होते तेथें परंपरितरूपक अलंकार होतो. जसें:—

**( १ ) विज्ञापना परिस यादववंशवीरा**
**योगींद्रहृत्कमलपंजरगर्भ कीरा ॥**
**हातास ये त्वरित आजि उडोनि माझ्या**
**वार्ता मला श्रवणगोचर होति तूझ्या ॥ १ ॥**

सामराज.

ही रुक्मिणीची श्रीकृष्णास पत्रद्वारें विनंति आहे. येथें श्रीकृष्णावर कीराचा (पोपटाचा) आरोप केल्यामुळें योगींद्राच्या हृदयकमलावर पंजराचा (पिंजऱ्याचा) आरोप केला आहे. तेथून निघून तूं माझ्या हातीं लाग, म्हणजे मला प्राप्त हो असें तिनें पत्रांत सूचित केलें आहे.

**( २ ) विषयविषधरीं ही डंखिली आजि भारी**
**कवण पुरुष येथें निश्चयें यास मारी ॥**

**झडकरि तरि आणी गारुडी द्वारकेचा**
**त्वरित बहुत राखीं प्राण ये दारिकेचा ॥ १ ॥**

सामराज.

ही रुक्मिणीच्या दासीची सुदेव विप्राप्रत उक्ति आहे. रुक्मिणीच्या विरहावस्थेचें वर्णन करीत असतां ती म्हणते ' हिला विषयवासनारूपी नागीणीनें दंश केला आहे. हें विष उतरण्यास येथें तरी कोणी नाहीं. म्हणून द्वारकेचा गारुडी कृष्ण यास आणून हिचे प्राण रक्षण करा.' येथें विषयकामनेवर नागिणीचा आरोप केल्यामुळें श्रीकृष्णावर गारुड्याचा आरोप केला आहे.

**( ३ ) यांच्या कीर्तिसुधासरिदुदरीं स्वानंदमत्त मासा हो ॥**
**त्वद्विरहातें क्षणहि न सिद्धहृदय साधुसत्तमा ! साहो ॥१॥**

मोरोपंत.

हें सीतेचें हनुमानाशीं भाषण आहे.

येथें रामचंद्रप्रभूच्या कीर्तीवर सुधानदीचा आरोप केल्यामुळें अंगदावर माश्याचा आरोप केला आहे. येथेंही परंपरित रूपक आहे.

**( ४ ) गुरु कर्णधार त्याची सुदृढा तत्त्वोपदेशवाक् सु-तरी ॥**
**धरुनि भवांबुधि तरले बहु बुध तत्कीर्तिही जना उतरी ॥१॥**

मोरोपंत.

या ठिकाणीं " तत्त्वोपदेशवाक् " यावर ' तरी ' चा आरोप केल्यामुळें 'गुरु' वर ' कर्णधारा ' चा आरोप केलेला आहे. म्हणजे पहिला आरोप दुसऱ्या आरोपाचें कारण आहे.

अथवा,

**( ५ ) होऊनि वज्रपंजर रक्षितसे वासुदेव कीरा या ॥**
**सत्संगतिहुनि त्याला बहु न यशोदा न देवकी राया ॥ १ ॥**

मोरोपंत.

या पद्यांत 'अर्जुना'वर 'कीरा'चा आरोप केल्यामुळें 'वासुदेवा'वर 'वज्रपंजरा' चा आरोप केलेला आहे.

परंपरित रूपकांत दोन्ही रूपकें परस्पर सापेक्ष असून आरोप्यमाण व आरोपविषय यांच्यामधील साधर्म्याकडे कवीचें विशेष लक्ष नसतें.

**परंपरितमाला-रूपकः—**

( १ ) लोहस्तंभचि बांधण्या जय-गजा, नौका विपत्सागरीं ।
राज्यश्रीस सुमञ्च कीं मृदु उशी लक्ष्मीविलासा बरी ॥
संग्रामामृत-वारिधि-प्रमथन-क्रीडेंत जो मंदर ।
राजा ! शोभतसे तुझा अरिवधूवैधव्यदायी कर ॥ १ ॥

भाषांतर.

येथें ' जय ', ' विपद् ', ' राज्य ' इत्यादिकांवर ' गज ' ' सागर ', ' श्री ' इत्यादिकांचा आरोप केला आहे; म्हणून ' करा ' वर 'स्तंभ', ' नौका,' 'मंचक' इत्यादिकांचा आरोप केला आहे; व एक आरोप दुसऱ्या आरोपाचें कारण असल्यामुळें व एकाच ' कर ' या उपमेयावर ' स्तंभादि ' अनेक उपमानांचा आरोप केलेला असल्यामुळें हें परंपरित मालारूपकाचें उदाहरण होय.

**शुद्ध परंपरित श्लिष्ट रूपकः—**

( १ ) तुझा करपंजर होय मला थारा ।
तुझ्या वचनाचा ओघ दुग्ध-धारा ॥
तुझें मानस बहु थोर गा उदारा ।
सत्यलोकाधिप तूंचि गुणागारा ॥ १ ॥

रघुनाथ पंडित.

येथें तुझें ( नळाचें ) मानस ( मन ) मला ( हंसाला ) क्रीडा करण्यासाठीं मानस सरोवरच आहे असें वर्णिलें आहे. येथें रूपकांची परंपरा असून ' मानस ' शब्द श्लिष्ट आहे. येथें एकच शब्द श्लिष्ट असल्यामुळें हें शुद्ध श्लिष्ट परंपरित रूपक आहे.

( २ ) हेमंत-रात्री हिमशुभ्रदंता ॥
हे तारका-चंचल-दृष्टि कांता ॥

---

( १ ) हिमशुभ्रदंता—हिमासारखे शुभ्र दांत आहेत जिला अशी; हिम हेच आहेत शुभ्र दंत जिला अशी ( रात्री ).

( २ ) तारका=डोळयांतील बाहुल्या; तारा, नक्षत्रें.

**गाढांधकेशा द्विगुणाहि राहे ॥**
**मत्तांगनेच्या-परि मंद-गा हे ॥ १ ॥**

पांडुरंगशास्त्री पारखी.

येथें हेमंतरात्रीवर मत्तांगनेचा आरोप केलेला आहे; व रात्रीवर स्त्रीत्वाचा आरोप केल्यामुळें दन्त, दृष्टि, केश ह्यांच्यावर दुसरे आरोप केलेले आहेत. पण ते श्लिष्ट पदांनीं केलेले असल्यामुळें येथें श्लिष्ट रूपकांची माला आहे.

## ( ७ ) व्यतिरेक.

[ व्यतिरेक वि+अतिरेक=आधिक्य, अत्युत्कर्ष. ]

उपमानापेक्षां उपमेयाचेंच आधिक्य जेथें वर्णिलें असतें तेथें **व्यतिरेक** अलंकार होतो. हें आधिक्य दोन प्रकारांनीं दाखवितां येतें. ( १ ) उपमेयाच्या उत्कर्षानें व ( २ ) उपमानाच्या अपकर्षानें.

उपमेयाच्या उत्कर्षाचीं उदाहरणें:—

**(१) नेत्र इचे अति चंचल देखुनि घालति मत्स्य जळीं शरिरासी ॥**
**वर्तुळ आणि विशाळ विलोकुनि नित्य कुरंग फिरे वनवासी ॥**
**अंजनयुक्त सुसुंदर पाहुनि लज्जित खंजन लंघि दिशांसी ॥**
**सूर्य-विकासिनि पद्मिनि नेत्रदळां पहातां करि म्लान मुखासी॥१॥**

अनंत कवि

ह्या ठिकाणीं मत्स्य, कुरंग वगैरे उपमानांपेक्षां उपमेय जे ‘ नेत्र ’ ते अधिक सुंदर आहेत असें वर्णन असून त्यामुळें उपमेयांचा उत्कर्ष व्यक्त केला आहे. व्यतिरेक अलंकारांत उपमेय व उपमान यांच्यामध्ये साधर्म्यच दाखविण्याचा कवीचा उद्देश असतो; वैधर्म्य दाखावण्याचा नसतो.

---

( ३ ) गाढांधकेशा—गाढ अंधःकाराप्रमाणें आहेत काळे केश जिचे; गाढ अंधःकार हेच जिचे केश.

( ४ ) द्विगुणा—दुप्पट कालमर्यादा आहे जिची अशी रात्री. दोन गुण (रज व तम ) आहेत जिच्या ठायीं अशी मत्तांगना.

( ५ ) मंद-गा—लवकर न संपणारी ( रात्री ); गजगती ( अंगना ).

( २ ) त्या मुनिवराश्रमाच्या नंदन-वन-गर्व-तस्करोपवनीं ।
अवनीशवाह शिरला स्वजवें लज्जोसि निर्मिता पवनीं ॥

मोरोपंत.

येथें मुनीच्या आश्रमानें नंदनवनाचा गर्व हरण केला व घोड्याच्या वेगानें पवनासही लाज वाटली असें वर्णिलें आहे. येथें नंदनवन व पवन हीं उपमानें असून त्यांना उपमेयांपेक्षां कमी लेखिलें आहे.

( ३ ) निघे जिंकण्या जग तोऱ्यानें कटाक्ष-पातानें ।
ध्वजपल्लव तो फडफड करितो विजयोन्मादानें ।
विशाल चंचल निळ्या लोचनीं लाजविल्या हरिणी ।
कुंदकळ्या मनिं झुरूं लागल्या रदना देखोनी ।
गुलाब झाले अति हिरमुसले बघुनि कपोलांस ।
मिटल्या ओष्ठां बघुनि कोप ये गुलाब-कलिकेस ।
सौंदर्याचें क्रीडाप्रांगण रम्य निटिल-भाग ।
स्नेहहीन केशांत अडविले युव-जन-अनुराग ।
चाफेकळिला रडत बसविलें सरळ नासिकेनें ।
चंद्रकोर दडि देउनि बसली त्या भ्रूभंगानें ॥ १ ॥

मनोरमाबाई रानडे.

येथें उपमेयगत उत्कर्षांमुळें उपमानांच्या खेद, लज्जादि विकारांचें वर्णन फार बहारीचें आहे.

( ४ ) रंभा निघे झडकरीं गगन-स्थलासी ॥
सौंदर्य पूर्ण विलसे जशि तेज-राशी ॥
वक्त्रीं मृगांक न तुळे, लघु अर्क बिंबीं ॥
नेत्रांसि मीन न पवे हरिही नितंबीं ॥ १ ॥

गंडस्थळीं करि कपोल कधीं न साजे ॥
नासाग्र देखुनि मनीं शुक फार लाजे ॥
जंघा सुवर्ण कदलीसम वोप देती ॥
तेजें समान न दिसे वनिता दिगंतीं ॥ २ ॥

काव्यसंग्रह–शुकरंभासंवाद.

येथें रंभेचीं अंगें ( उपमेयें ) मृगांक-मीनादि उपमानांपेक्षांही फार सुंदर होतीं असें वर्णन आहे.

**पीतां मरंद उदरंभर बंभरांचें ॥**
**जें होय मंदिरहि सुंदर इंदिरेचें ॥**
**तें पद्म तेथिल सहस्त्र-दळां धरीतें ॥**
**प्रत्यक्ष सूर्य किरणांस विसाववीतें ॥ १ ॥**

रघुनाथ पंडित.

वरील पद्यांत उपमान जो सूर्य त्यापेक्षां उपमेय जें सहस्त्रदल–कमल त्याचें गुणाधिक्य वर्णिलें आहे. उपमेयगत उत्कर्षामुळें **मालाव्यतिरेक** अलंकारही होतो. जसें:—

**तूं मंजुल स्वर दिला सखये पिकास**
**हंसीस मंदगति, दृष्टि चला मृगांस ।**
**वातें वनांत डुलती लतिका सुरेख**
**त्यां हावभाव दिधले रमणीय देख ॥**

गणेशशास्त्री लेले.

वास्तविक पाहतां कोकिळा, हंसी, मृगी व लता हीं उपमानें असून ह्यांच्यापासूनच इंदुमती ते ते गुण शिकली असे वर्णन असावयास पाहिजे होतें; पण इंदुमतीनेंच त्यांस शिक्षण दिलें असें वर्णन करून तिचा ( उपमेयाचा ) गुणोत्कर्ष येथें प्रस्थापित केला आहे. येथें अनेक उपमानांपेक्षां इंदुमती श्रेष्ठ आहे असें दर्शविलें आहे.

( २ ) उपमानगत अपकर्षाचें उदाहरण:—

**चौगुणीनें जरि पूर्ण शीत-भानु ॥**
**नळा ऐसा तरि कलानिधी वानूं ॥**
**प्रतापाचा जो न मावळे भानू ॥**
**तयासारीखा कोण दुजा मानूं ॥ १ ॥**

रघुनाथ पंडित.

येथें नळ हें उपमेयच श्रेष्ठ असून चंद्रास कळा असल्यामुळें व सूर्याचा दररोज अस्त होत असल्यामुळें ते दोघेहि नळापेक्षां कमी प्रतीचे आहेत असें वर्णन आहे.

उपमानांच्या वैगुण्यामुळेंही माला व्यतिरेक अलंकार होतो. जसें:—

**चंद्रासि लागति कळा उपराग येतो ॥**
**गंगेसि भंग बहु पाण-उतार होतो ॥**
**जें चूर्ण होय तरि मौक्तिक तें कशाला ॥**
**नाहीं समान नलराज महायशाला ॥ १ ॥**

रघुनाथ पंडित.

येथें नलराजाच्या यशाचा पांढरेपणा व चंद्र, गंगा व मौक्तिक या उपमानांचा शुभ्रपणा यांची तुलना केली असून उपमाननिष्ठ वैगुण्यामुळें उपमेय ( यश ) हें श्रेष्ठ आहे असें वर्णिलें आहे.

---

## ( ८ ) प्रतीप.

[ प्रतीप=अनादर, तिरस्कार, अधिक्षेप, निंदा किंवा निषेध. ]

जेव्हां उपमानाचा अनादर किंवा तिरस्कार केला आहे असें वर्णन असतें तेव्हां **प्रतीप** अलंकार होतो. जसें:—

**( १ ) कां सखि मूर्खपणें तूं वदसी ' मम तनु सुवर्णवर्ण असे ॥**
**तें जरि दहनिं पडे तरि, तवांग–सादृश्य पूर्ण घेत असे ' ॥१॥**

गंगाधरशास्त्री.

ही एका दूतीची नायिकेप्रत उक्ति आहे. येथें ' मम तनु सुवर्णवर्ण असे ' हें नायिकेचें भाषण मूर्खपणाचें आहे असें बोलून दूतीनें सुवर्णाची निंदा केली आहे व उत्तरार्धांत उपमेय जी ' नायिकेची तनु ' ती उपमान जें ' सुवर्ण ' ह्याच्यापेक्षां अधिक सुंदर आहे असें सांगितलें आहे.

उपमेयगत गुणप्रकर्षाचा अनादर करण्याकरितां जेव्हां त्यासारखीच दुसरी वस्तु दाखविली असते तेथेंही **प्रतीप** अलंकार होतो. जसें:—

**( २ ) जगीं तुला या तुलना न राहे ॥**
**म्हणोनि गौरांगि ! न गर्व वाहे ॥**
**भरें फलांच्या नत ह्या लता कीं ॥**
**असंख्य आहेत वनीं विलोकीं ॥ १ ॥**

भाषांतर.

येथें रूपातिशयामुळें नायिकेस झालेल्या गर्वाचा परिहार करण्याकरितां तुझ्या वर्णासारख्या लता वनांत अनेक आहेत असें तिला सांगितलें आहे.

**( ३ ) हालाहला ! गुरुचि मी अति दारुणांचा ॥**
**ऐसा न बा धरिं मनीं अभिमान साचा ॥**
**आहेत त्वत्सम जगांत अनंत साचीं ॥**
**अत्यंत तीक्ष्ण वचनें अतिदुर्जनांचीं ॥ १ ॥**

भाषांतर.

येथें हालाहल विष हें उपमान आहे त्याच्या मारक-धर्मापेक्षां खलांच्या वचनांतील मारक-धर्म अत्यंत तीव्र आहे. अशा असंभाव्य कारणाची कल्पना करून उपमानाचा तिरस्कार केल्यामुळें हा प्रतीप अलंकार झाला आहे.

कधीं कधीं उपमेयनिष्ठ गुणच श्रेष्ठ असतांना उपमानाची गरज किंवा पपयोग काय अशा भावनेनें उपमानाची विफलता व्यक्त केलेली असते. जसेंः—

**( ४ ) नेत्रें सुंदर हीं असोनि, कमलें धाता कशाला करी ॥**
**अंगें तीं सुकुमार, पल्लव-फुलें उत्पादितो कां तरी ॥**
**लावण्याश्रय हें कपोल-युग, कां इंदूस निर्मी विधी ॥**
**कालक्षेप वृथाचि कीं करि असा तो, बालसा, मंदधी ॥१॥**

भाषांतर.

येथें कमलें, पल्लव-फुलें व इंदु या प्रसिद्ध उपमानांच्या गुणांचा गौरव न करितां उपमेयनिष्ठ गुणांमुळें त्या उपमानांचीच निरर्थकता व्यक्त केल्यामुळें प्रतीप अलंकार झाला आहे.

कधीं कधीं उपमानाचा कारणांसह अधिक्षेप करून उपमेयाचें श्रेष्ठत्व स्थापित केलेलें असतें. जसेंः—

**(५) लोकबंधू जो होय रवी-ऐसा। कुवलयाला जो सुखद चंद्र तैसा॥**
**सांग नोहे तो कुसुम-चाप तैसा। निषधरायाशीं तुल्यरूप कैसा॥१॥**
**नाडीज्ञान जयाचें सरोगबंधू चतुष्पद गणावे ॥**
**सुत तेजी-तुरगींचे नळसम सुंदर कदापि न म्हणावे ॥ २ ॥**

रघुनाथ पंडित.

येथें कुसुमचापाला अंग नाहीं, सरोग ( क्षयी ) असा चंद्र त्याचे बंधु जे धन्वंतरी ( समुद्रापासूनच चंद्राची व धन्वंतरींची उत्पत्ति झाली म्हणून ) व

अश्व-रूपधारी सूर्य आणि अश्विनी-रूपधारी संज्ञा यांच्यापासून झालेले सौंदर्ययुक्त अश्विनीकुमार हे केवळ पशु म्हणून त्यांची व नळाची तुलना होणें शक्य नाहीं असें वर्णन असल्यामुळें **प्रतीप** अलंकार झाला आहे.

हाच प्रकार मालारूपानेंही संभवतो. जसें:—

**( ६ ) हे वामनैकपद भूमि, नसोनि जंघी ॥**
**एके दिनींच दिनराज नभास लंघी ॥**
**वाराशि वानर विलंघित होय तो कीं ॥**
**लोकीं नसे नलयशस्तुलना विलोकीं ॥ १ ॥**

रघुनाथ पंडित.

येथें भूमि तर वामनाच्या एकाच पावलाबरोबर आहे ! नभ एवढें विस्तीर्ण पण सूर्य त्यास एकाच दिवसांत लंघून जातो ! समुद्रावरून तर यःकश्चित एक माकड उडी मारून गेलें. अशा रीतीनें अनेक उपमानांचें क्षुद्रत्व व्यक्त करून उपमेय जो नळराजा त्याचा उत्कर्ष वर्णिला आहे म्हणून हा **मालाप्रतीप** अलंकार आहे.

---

## ( ९ ) श्लेष.

[ श्लिष्यंति—शब्दानां पदानां वा भिन्नं स्वरूपं अपह्नुवते इति=शब्दांचें भिन्न स्वरूप लपविणें. शब्दालंकार, पान ३२, **श्लेष**, पहा. ]

एकाच वाक्यामध्यें जेथें शब्दाचे अनेक विवक्षित अर्थ असतात तेथे **श्लेष** नामक अलंकार होतो. **श्लेषाचे** दोन प्रकार आहेतः(१)**अभंगश्लेष** आणि (२) **सभंगश्लेष. अभंगश्लेषांत** एकाच शब्दाचे अनेक अर्थ होतात. **सभंगश्लेषांत** एकाद्या पद्याचीं जी पदें एका अर्थाच्या वेळीं पाडलेलीं असतात तींच दुसऱ्या अर्थाच्या वेळीं न घेतां इकडचीं अक्षरें तिकडे करून नवीनच पदें पाडतात.

**अभंगश्लेषाचें** उदाहरणः—

**(१) वाणी मयूर वदनीं जी न शुकातें द्विजोत्तमा यावी ॥**
**पक्ष श्रीहरि धरि, मग काय न करितो अनंत मायावी ॥ १ ॥**

मोरोपंत.

या ठिकाणीं मयूर, शुक, द्विजोत्तम व पक्ष हे शब्द श्लिष्ट असल्यामुळें त्यांचे दोन अर्थ होतात.

उदाहरण दुसरें:—

**(२) मलिन, कुटिल, नीरस, जड, अजड पुनर्भवपणेंचि कचसाच; ॥**
**धरिला शिरींहि न स्वप्रकृतिगुण त्यजिसि; नाम कच साच. ॥१॥**

मोरोपंत.

येथें मलिन, कुटिल, नीरस, जड, अजड, पुनर्भवपण, कच आणि शिरीं धरणें हे शब्द श्लिष्ट आहेत.

**सभंगश्लेषाचें** उदाहरणः—

**(१) ते शीतलोपचारीं जागी झाली हळूच मग बोले ॥**
**औषध नलगे मजला, परिसुनि जननी बरे ह्मणुनि डोले ॥१॥**

रघुनाथ पंडित.

या ठिकाणीं 'औषध नलगे मजला' ह्याचीं दोन प्रकारानें पदें पाडतां येतात. ( १ ) 'औषध नलगे मजला' असें अथवा ( २ ) 'औषध **नल** गे मजला' असें.

उदाहरण दुसरें:—

**मी जाण देवनळही स्वकरीं धराया ॥**
**सांगेन काय चतुरा मज लाज जाया ॥**
**काळेंकरूनि सुख जोंवरि होय लेखीं ॥**
**हें बोलणें खग मनीं उभयार्थ लेखी ॥ १ ॥**

रघुनाथ पंडित.

या ठिकाणीं ' जाण ' व ' जाया ' ह्या शब्दांवर अभंगश्लेष आहे व ' देवनळ ' आणि ' धराया ' ह्या पदांवर सभंगश्लेष असून त्याचीं 'देवनळ,' ' देव ,' ' नळ ' आणि ' धराया,' ' धरा,' ' या ' अशीं पदें पडतात.

ह्या अलंकारांत अनेकार्थक शब्दांची योजना मुद्दाम केलेली असल्यामुळें साधारण वाचकाचे मनांत ते अनेक अर्थ लवकर येत नाहींत.

---

## ( १० ) समासोक्ति.

[ समास=संक्षेप; उक्ति=कथन; संक्षेपेंकरून कथन ].

प्रकृताचें वर्णन चाललें असतां प्रकृत व अप्रकृत या दोन्ही पदार्थांस लागू पडणाऱ्या श्लिष्ट विशेषणांनीं अप्रकृताचाही बोध जेथें होतो, तेथें **समासोक्ति** अलंकार होतो. जसें:—

**( १ ) तरंगिणी गे ! जड-संगतीनें ॥**
**चराचरा नाशुनि तूं मदानें ॥**
**स्वकूलही भ्रष्ट करून जाशी ॥**
**म्हणून पंकाविल सत्य होशी ॥ १ ॥**

पांडुरंगशास्त्री पारखी.

येथें तरंगिणी ( लहरींनीं किंवा लाटांनीं युक्त; लहरीप्रमाणें वागणारी, चंचल स्वभावाची ), जड ( जल व मूर्ख ), मद ( यौवन दर्प; पाण्याचा जोर ), कूल ( वंश; कांठ ), भ्रष्ट ( कलंकित; पाडून ), पंकाविल ( पापयुक्त; गढूळ ), हीं विशेषणें श्लिष्ट असून प्रस्तुत वस्तु जी 'नदी' तिच्या क्रियेच्या वर्णनावरून अप्रस्तुत वस्तु जी 'व्यभिचारिणी' तिचा बोध होतो.

**( २ ) मलिन असतां तूं प्रेम करी थोर ॥**
**बहु जल्पसि तरि हास्य करी फार ॥**
**असुनि चंचल तूं, रक्त तीच राहे ॥**
**कथीं रोलंबा ! त्यजसि नलिनि कां हे ॥ १ ॥**

भाषांतर.

येथें कमलिनीचा वृत्तांत प्रस्तुत असून भेदक विशेषणात्मक शब्दांमुळें अप्रस्तुत जी नायिका तिचाही बोध होतो.

**( ३ ) उष्णरश्मि तो समय[1] लंघुनी त्यागा[2] प्रवृत्त होतां ।**
**कुबेर राखी जी दिक्[3] तीशीं संगत व्हाया जातां ॥**
**दक्षिण दिक् निज वदनांतुनि बहु दुःखें सोडी श्वास ।**
**मलयानिल हे तेच भासती उत्तम ज्यांना वास ॥ १ ॥**

कुमारसंभव.

---

१ संकेत; योग्यकाल. २ टाकण्यास; सोडून जाण्यास. ३ कुबेर दिक्=उत्तरदिशा.

येथें दक्षिणायन संपून उत्तरायणास प्रारंभ होण्याच्या सुमारास सूर्य दक्षिणेकडून उत्तर दिशेकडे गेलासा दिसतो, या प्रकृत किंवा स्वाभाविक वर्णनावरून पति परस्त्रीकडे जाऊं लागल्यास त्याची स्त्री दुःखाचे सुस्कारे टाकिते या अप्रस्तुत अर्थाची परिस्फूर्ति होते.

(४) **अलंकारी कर्णा तंव बहुत दुःखा अनुभवी**
**मृगाक्षी सीत्कारा करित वदनाब्जास वळवी ।**
**कराब्जस्पर्शाचें अतुल सुख हें प्राप्त तुजला**
**स्तवीं उत्तंसा! मी म्हणुनि तव धन्याहि जनुला ॥ १ ॥**

भाषांतर.

येथें 'उत्तंस' नांवाचें कर्णभूषण प्रकृत असून तें धारण करणाऱ्या नायिकेच्या कृतीच्या वर्णनावरून नायककृत शृंगारचेष्टिताचाही बोध होतो.

---

## (११). परिकर.

[ परिकरः—उपस्करणं, भूषणं, उपकारहेतुः ]

जेव्हां प्रकृत अर्थास परिपोषक अशा अनेक साभिप्राय किंवा सहेतुक विशेषणांनीं विशेष्याचें वर्णन केलेलें असतें तेव्हां **परिकर** अलंकार होतो. जसें:—

**वैदेहीच्या रमणें वीरें करुणाकरें जगद्गीतें ।**
**पाठविलें मज, त्याच्या ऐकें कल्याणहेतु सद्गीते ॥ १ ॥**
**चतुरानन जगदीश्वर त्याचा तूं पौत्र भूतपतिदास ।**
**श्रुतसंपन्न नयज्ञ ब्राह्मणसुत पावलास सुपदास ॥ २ ॥**

मोरोपंत.

येथें पहिल्या पद्यांतील रामाचीं व दुसऱ्यांतील रावणाचीं विशेषणें साभिप्राय आहेत.

**विज्ञापना परिस यादववंशवीरा,**
**योगींद्रहृत्कमलपंजरगर्भकीरा, ।**
**हातास ये त्वरित आजि उडोन माझ्या,**
**वार्ता मला श्रवणगोचर होति तूझ्या ॥१॥**

**सर्वां गुणीं तुजसमान महा वदान्या,**
**ते कोण तूज नवरी न वरील धन्या, ।**
**विद्यावयद्रविणरूपगुणौघधामा,**
**कृष्णा, नृसिंह नरलोकमनोभिरामा ॥ २ ॥**

सामराज.

या दोन्ही पद्यांतील विशेषणें सहेतुक व अर्थास पुष्टि आणणारीं आहेत म्हणून येथें **परिकर** अलंकार आहे.

**ज्यांचीं पदें धरिति देव शिरो-ललामीं ॥**
**स्वाराज्य जो मिरवितो गजराज-गामी ॥**
**जो वज्रबाहु बहुलोचन कांति भारी ॥**
**हा पाहिजे तरि वरीं नळ-रूप-धारी ॥१॥**

रघुनाथ पंडित.

ह्या पद्यांत सर्व हेतुगर्भ विशेषणें आहेत व ज्याचें वर्णन चाललें आहे तो इंद्र आहे असें दमयंतीस सुचविण्याकरितांच शारदेनें त्यांची योजना केली आहे. ‘ नळ-रूप-धारी ’ या पदानें तो खरोखर नळ नव्हे असें सुचविलें आहे व ‘बहुलोचन’ या पदानें तो कुरूप व वरण्यास अयोग्य आहे असे ध्वनित केलें आहे. रघुनाथ पंडितांच्या पंचनली प्रकरणांत या अलंकाराचीं व श्लेषाचीं उदाहरणें आहेत.

---

## ( १२ ) प्रतिवस्तूपमा.

उपमेय वाक्य व उपमान वाक्य ह्या दोन वाक्यांमध्यें एकच सामान्यधर्म असून तो जेव्हां शब्दभेदानें दाखविलेला असतो तेव्हां **प्रतिवस्तूपमा** अलंकार होतो. जेव्हां एकच धर्म दोन किंवा अधिक वाक्यांत भिन्न शब्दांनीं सांगितलेला असतो तेव्हां अशा निर्देशास वस्तुप्रतिवस्तुभाव असें म्हणतात. वस्तु म्हणजे वाक्य. उपमा हा शब्द येथें साधारणधर्म-वाचक आहे. प्रतिवस्तूपमा म्हणजे प्रत्येक वाक्यांत भिन्नार्थक एकच साधारण-धर्म असणें. ह्या अलंकाराचे दोन प्रकार आहेत ( १ ) **साधर्म्यें**करून ( २ ) **वैधर्म्यें**करून.

वाक्यें दोन प्रकारचीं असतात—विधिरूप व निषेधरूप. ह्यांनाच व्याकरणांत करणरूप व अकरणरूप अशीं अनुक्रमें नांवें आहेत. जेव्हां दोन्ही वाक्यें सजा-

तीय असतात म्हणजे दोन्हीं वाक्यें विधिवाचक अथवा दोन्ही निषेधवाचक असतात व ह्या दोन वाक्यांमध्यें जेव्हां एकच साधारणधर्म असतो तेव्हां साधर्म्यैंकरून प्रतिवस्तूपमा अलंकार होतो.

परंतु एक वाक्य विधिवाचक व दुसरें निषेधवाचक असून त्यांच्यामध्यें एकच साधारण धर्म दाखविलेला असतो तेव्हां वैधर्म्यैंकरून ( दोन वाक्यांमध्यें असलेल्या बाह्य भेदामुळें ) प्रतिवस्तूपमा अलंकार होतो.

उदाहरणें:—

**कर्ण म्हणे गुणवद् गुण जाणे गुणवंत अगुण नेणेची ॥**
**प्रसवे तीच अभिज्ञा शल्या तैशी न वांझ वेणेची ॥ १ ॥**

मोरोपंत.

येथें पहिलें अर्ध उपमेय वाक्य असून त्यांत ‘ गुणज्ञता ’ हा साधारणधर्म आहे. दुसरें अर्ध उपमान वाक्य असून त्यांत ‘ अभिज्ञता ’ हा साधारण धर्म आहे. हे दोन्ही धर्म ‘ तज्ज्ञता ’ या एकाच अर्थाचे वाचक असून भिन्न शब्दांनीं सांगितलेले आहेत म्हणून हा प्रतिवस्तूपमा अलंकार आहे. वस्तु म्हणजे येथें वाक्य असा अर्थ समजावयाचा. जेव्हां पहिल्या संबंध वाक्यांतील किंवा विधानांतील साधारणधर्म आणि दुसऱ्या सबंध वाक्यांतील किंवा विधानांतील साधारणधर्म एकच असून भिन्न शब्दांनीं मात्र व्यक्त केलेले असतात तेव्हां हा अलंकार होतो. याला **वाक्योपमा** म्हटल्यास हरकत नाहीं.

**भक्तिविना वश नोहे वीण्यानें वा मृदंग-नादानें ॥**
**कन्यादान-फलातें पावे कैसा मृदंगनां-दानें ॥ १ ॥**

मोरोपंत.

येथें ‘ इष्टफलप्राप्ति ’ हा साधारण धर्म ‘ वश नोहे ’ व ‘ फलातें कैसा पावे ’ या भिन्नार्थक शब्दांनीं सांगितला आहे; म्हणून येथें प्रतिवस्तूपमा अलंकार झाला आहे.

**दुर्धर सर्पिणि-देहा स्पर्शिल हस्तांनिं कोण तो भलता ॥**
**रक्षक असतां विपिनीं, रंका लाभेल केंवि पुष्पलता ॥ १ ॥**

मोरेश्वर.

---

१ मातीची केलेली स्त्री; बाहुली.

या ठिकाणीं " दुर्धर सर्पिणि-देहा...भलता" हें उपमेय वाक्य आहे. व " रक्षक असतां...पुष्पलता " हें उपमान वाक्य आहे. या दोन वाक्यांमध्यें 'दुर्लभत्व ' हा साधारण धर्म आहे व हा एकच धर्म वरील दोन्ही वाक्यांमध्यें निरनिराळ्या शब्दांनीं व्यक्त केलेला आहे.

अथवा

**राजसुतेचें यश जें तुज येइल काय गे दरिद्रे तें ॥**
**पाहसि विकावया तूं केशर मौल्यें कसें हरिद्रेतें ॥ १ ॥**

मोरोपंत.

येथें ' सर येणें ' किंवा ' बरोबरी होणें ' हा साधारण धर्म दोन निरनिराळ्या वाक्यांत भिन्न शब्दांनीं सांगितला आहे.

**पुत्र असोनि असें कां ? हां ! म्यां वरिली वनांत विट-लीला ॥**
**नाम न रुचेल मग सुत मानेल कसा मनांत विटलीला ॥ १ ॥**
**विटली न वामनातें श्री अन्याही सती न दीनातें ।**
**सुकतां सिंधु सरासी लावील कसें महानदी नातें ॥ २ ॥**

मोरोपंत.

वरील पद्यांत दमयंती विपन्न स्थितींत असलेल्या नळावरच अनुरक्त राहील असें सूचित केलें आहे. येथें ' अनुरक्तता ' हा साधारण धर्म दोन भिन्न वाक्यां-मध्यें ' न विटली ' व 'नातें लावील कसें ' या वाक्यांशांनीं व्यक्त केला आहे.

वरील सर्व उदाहरणें साधर्म्यॆंकरून होणाऱ्या प्रतिवस्तूपमा अलंकाराचीं आहेत.

( २ ) वैधर्म्यानें—जसें:—

**पित्रादिकांच्या परुषोक्ति-योगें ॥**
**जो गांजला तोचि महत्व भोगे ॥**
**न लागला शाण जया मणींतें ॥**
**न राहती कीं नृप मस्तकीं ते ॥ १ ॥**

गंगाधरशास्त्री.

या ठिकाणीं उपमेय वाक्यांत "जो झीज सोशितो तो महत्व पावतो " असें विधान केलेलें आहे व तेंच विधान उपमान वाक्यांत " जो झीज सोशीत नाहीं तो महत्व पावत नाहीं " अशा अन्य शब्दांनीं केलेलें आहे. वरील दोन्ही वाक्यांत वैधर्म्य आहे.

**मरणीं विवाह-काळीं ज्ञातिवधीं मर्मभेदनावसरीं**
**ज्ञात्या मृषोक्ति तारी; बुडवि न वरुणासि भग्न-नाव सरीं ॥१॥**

मोरोपंत.

येथें 'तारी' व 'न बुडवी' हे साधारण धर्म एकाच अर्थाचे असून ते भिन्न शब्दांनीं निरनिराळ्या म्हणजे विधि-निषेधरूप वाक्यांत घातले आहेत. येथें वैधर्म्यैंकरून प्रतिवस्तूपमा अलंकार झाला आहे.

**त्वां ही स्वगुण समस्त प्रकटावे जरि गमेल सार्थकसें ॥**
**न पाहतां पात्रगुण प्रथमचि पूजन करील पार्थ कसें ॥ १ ॥**

मोरोपंत.

येथें तूं आपले गुण प्रकट कर; मात्र पात्रापात्र विचार केल्याशिवाय पार्थ गुणाची पूजा करणार नाहीं असें कृष्णानें अश्वत्थाम्यास म्हटलें आहे. येथेंही दोन्ही वाक्यांचे प्रकार भिन्न असून 'गुणप्रकाशन' हा दोहोंमध्यें एकच असणारा साधारणधर्म 'स्वगुण प्रकटावें' व 'न पाहतां पात्रगुणपूजन' या निरनिराळ्या पदांनीं दाखविला आहे.

**जातां कर्णाप्रति कुरुभटगण रोधी पथांत धवलाश्वा।**
**पावे नाश न कां, जो झोंबे हरिच्या समुक्तकवळा श्वा ॥ १ ॥**

पहिल्या अर्धांत (वाक्यांत) अर्जुनास अडवून कुरुभटांनीं आपला नाश करून घेतला असें ध्वनित करुन द्वितीयार्धात कुत्रा सिंहासी झगडतांना कसा नाश पावणार नाहीं ? अर्थात् पावेल असें वर्णिलें आहे. 'सामर्थ्य-हीनत्व' हा साधारणधर्म दोन्ही वाक्यांत निरनिराळा दाखविला असून दोन्ही वाक्यें भिन्न रूपी ( एक विधिवाचक व दुसरें निषेधवाचक ) आहेत म्हणून येथें वैधर्म्यैंकरून प्रतिवस्तूपमा अलंकार झाला आहे.

दोंहोंपेक्षां जास्त वाक्यांमध्यें जेव्हां एकच साधारण धर्म आहे असें वर्णिलें असतें तेव्हां **मालाप्रतिवस्तूपमा** अलंकार होतो. जसें:—

**आधार चंदन सदा भुजगास देई ॥**
**शीर्षीं प्रदीप घनकज्जलभार घेई ॥**
**शीतांशुही तनुवरी धरि अंक पाही ॥**
**राखी नृपाल जन मूढ सभेत कांहीं ॥ १ ॥**

भाषांतर.

येथें आधार देणें, भार घेणें, धारण करणें व राखणें ह्या क्रिया वास्तविक एक-रूप म्हणजे समानार्थक असल्यामुळें त्या सर्वांमध्यें एकच साधारण-धर्म आहे म्हणून हें **मालाप्रतिवस्तूपमा** अलंकाराचें उदाहरण होय.

**घोडे कधीं न खळती रविच्या रथाचे**
**उल्लंघितो पवन भाग सदा नभाचे ।**
**भूभार शेष धरि संतत मस्तकांहीं**
**राजास विश्रम तसा क्षणमात्र नाहीं ॥**

शाकुंतल—प. गोडबोले.

येथें राजा प्रस्तुत व घोडे, पवन व शेष हीं अप्रस्तुत होत. या सर्वांमध्यें असणारा 'स्वकर्तव्यदक्षता' हा एकच साधारण धर्म अनेक वाक्यांमध्यें अनेक शब्दांनीं व्यक्त केला आहे. म्हणून येथें मालाप्रतिवस्तूपमा अलंकार आहे.

**प्राप्त सर्व विभवें तरि काय ?॥**
**तोषले स्वजन हीं तरि काय ? ॥**
**कल्प आयुहि घडे तरि काय ? ॥**
**भोगिलें सुख बहू तरि काय ? ॥ १ ॥**

येथें प्रत्येक चरणांतील प्रथमार्धांत 'सौख्यलाभ' हा साधारण धर्म अनेक शब्दांनीं सांगितला असून 'तरि काय' या शब्दांनीं विषयाची 'व्यर्थता' किंवा 'नश्वरत्व' दर्शविलें आहे. हेंही माला–प्रतिवस्तूपमा अलंकाराचें उदाहरण होय.

---

## ( १३ ) दृष्टांत.

[ दृष्टांतः गृहीतप्रामाण्यकः अंतः निश्चयः यत्र. ]

एका वाक्यांतील उपमेय, उपमान व साधारणधर्म हीं सर्व जेव्हां दुसऱ्या वाक्यांत प्रतिबिंबित असतात तेव्हां, अथवा एकादा विशेष प्रकृत अर्थ मनांत बिंबावा म्हणून दुसऱ्या विशेष अप्रकृतार्थाचें, किंवा एकादा सामान्य प्रकृत अर्थ मनांत भरावा म्हणून सामान्य अप्रकृतार्थाचें उदाहरण जेव्हां दिलेलें असतें तेव्हां **दृष्टांत** अलंकार होतो.

दृष्टांत म्हणजे दिलेल्या अर्थाच्या किंवा विधानाच्या प्रामाण्याविषयीं निःसंदेह प्रतीति होणें. उपमेय वाक्यास दार्ष्टांतिक वाक्य असेही म्हणतात. या वाक्यांत जें विधान केलें असेल तें यथातथ्य आहे असें दृष्टान्तवाक्यानें किंवा उपमान वाक्यानें सिद्ध केलेलें असतें. जसेः—

(१) हें पांखरूं मजशि येइल काय कामा
ऐसें नृपा न वद पूरित-लोक-कामा ।
मोलें उणें व्यजन, तें धरितां पुढारीं
छाया करी, तपनदीप्तिसही निवारी ॥ १ ॥

रघुनाथ पंडित.

येथें पहिलें अर्ध उपमेय किंवा दार्ष्टांतिक वाक्य होय. यांतील विधानाचें प्रामाण्य द्वितीयार्धानें सिद्ध केलेलें आहे. दृष्टांत अलंकारांत उपमेयवाक्य व उपमानवाक्य यांच्यामध्यें बिंबप्रतिबिंबभाव असतो. सूर्याचें बिंब पाण्यांत किंवा आरशांत हुबेहुब दिसतें त्यास प्रतिबिंब म्हणतात. अशाच प्रकारचा संबंध उपमेय-वाक्यांतील साधारण धर्म व उपमानवाक्यांतील साधारणधर्म यांच्यामध्यें असतो. व्यवहारांत यास उदाहरण असें म्हणतात. वरील पद्यांत ( क्षुद्र ) पांखरूं व ' मोलें उणें व्यजन ' यांची तुलना केली असून पंखा जसा मनुष्यास अनेक प्रकारांनीं उपयोगी पडतो तसा मी ( हंस ) ही तुझ्या ( नळाच्या ) अनेक प्रकारें उपयोगी पडेन असें वर्णिलें आहे.

पांखरूं व पंखा यांचे धर्म अर्थातच भिन्न आहेत म्हणजे उपमेयवाक्य व उपमानवाक्य यांतील साधारणधर्म वेगळे आहेत. या उदाहरणानें आपल्या कर्तृत्वाविषयीं नळाच्या मनांत असलेली शंका दूर करण्याचा हंसानें प्रयत्न केला व तो पुढें सफळही झाला.

(२) आकाश-अंत न कळूनहि अंतरिक्षीं ॥
आकाश आक्रमिति शक्त्यनुसार पक्षी ॥
नाम-प्रतापहि यथामति याच रीती ॥
सीमा न पावति तथापि मुनींद्र गाती ॥ २ ॥

वामन.

या ठिकाणीं पहिल्या अर्धांतील ' पक्षी ' ' शक्त्यनुसार ' ' आक्रमिति ' ' आकाश ' इत्यादि शब्द दुसऱ्या अर्धांतील ' मुनींद्र ' ' यथामति ' ' गाती '

'नामप्रताप' वगैरे शब्दांचे ठायीं प्रतिबिंबित झालेले आहेत. हीं साधर्म्यैंकरून दृष्टांताचीं उदाहरणें होत.

वैधर्म्यैंकरून **दृष्टांत** अलंकाराचीं उदाहरणें:—

**झणीं विसंबाल महीपतीला ।**
**स्वकीय कोणीच नसे तयाला ॥**
**अध्वर्यु हो कीं यजमान त्यातें ।**
**हुताश जाळी धरितांच हातें ॥ १ ॥**

वामन.

येथें राजा आणि अग्नि यांची तुलना केली आहे व पहिल्या अर्धातील निषेध वाक्यांतील विशेष अर्थाचें प्रतिबिंब दुसऱ्या अर्धातील विधिवाक्यांत उतरलें आहे म्हणून येथें वैधर्म्यानें दृष्टांत अलंकार झाला आहे.

**खल न खलत्व त्यागी जरि सामें गौरवूनि बोळविला ॥**
**लकुच कटुचि अमृतकराकरवींही शर्करेंत घोळविला ॥**

मोरोपंत.

येथें पहिल्या अर्धातील 'खल' 'खलत्व' इत्यादि शब्द व दुसऱ्या अर्धातील 'लकुच' 'कटुचि' इत्यादि शब्द यांच्यामध्यें बिंबप्रतिबिंबभाव आहे; व पहिलें वाक्य निषेधरूप व दुसरें विधिरूप असल्यामुळें हा वैधर्म्यानें **दृष्टांत** अलंकार झाला आहे. तसेच,

**विद्यासमन्वितहि दुष्ट परित्यजावा ॥**
**त्याशीं बुधें न सहवास कधीं करावा ॥**
**ज्याच्या असे विमलही मणि उत्तमांगीं ॥**
**तो सर्प काय न डसे ? खल अंतरंगीं ॥ १ ॥**

वामन.

येथें एक विशिष्ट प्रकृत अर्थ मनांत बिंबावा म्हणून दुसऱ्या एका विशिष्ट अप्रकृतार्थाचें उदाहरण दिलें आहे.

**वाचालता दे लघुता नराला । नेतें तसें मौन समुन्नतीला ।**
**पायीं पडे नूपुर मंजु शब्दें । कंठीं रुळे मौक्तिकहार मौनें ॥१॥**

**दानें जगांत महती सकळास येई ।**
**संपत्ति-संचयबहू करितां न होई ॥**
**अंभोद वास करितो नित उच्च ठायीं ।**
**अंभोनिधी वसत भूतळिं सर्वदाही ॥ २ ॥**

काव्यरत्नावली-बुध.

येथें पहिल्या उदाहरणांत विशेष प्रकृत अर्थाचें विशेष अप्रकृत अर्थानें व दुसऱ्या उदाहरणांत एका सामान्य प्रकृत अर्थाचें दुसऱ्या सामान्य अप्रकृत अर्थानें समर्थन केलेलें आहे; म्हणून हीं दोन्ही दृष्टांताचीं उदाहरणें होत.

---

## ( १४ ) निदर्शना

( निश्चित्य दर्शनं=निश्चय झाल्यावर सादृश्य प्रकट करणें अथवा निदर्शनं=दृष्टांतकरणम् । )

दोन वाक्यार्थामध्यें किंवा पदांच्या अर्थांमध्यें जो संबंध असतो तो असंभाव्य आहे असें दर्शवून अखेरीस अशा प्रकारच्या संबंधाचें गर्भित उपमेमध्यें पर्यवसान ( शेवट ) झालें आहे असें जेथें वर्णन असतें तेथें **निदर्शनानामक** अलंकार होतो. जसें:—

**कोठें क्षुद्र अयोध्या ! कोठें लंका ! कळे न हो मजला ।**
**करणार काय राघव, वामन शशितें धरावया सजला ॥**

काशिनाथ हरी मोडक.

कोठें—कोठें—हे शब्द दोन वस्तूंमध्यें महदंतर आहे असें सुचवितात. रामाची अयोध्या कोणीकडे व रावणाची लंका कोणीकडे ! यांची बरोबरी होणें असंभाव्य असें दर्शविलें असून शेवटीं रामानें रावणाची बरोबरी करणें म्हणजे एकाद्या ठेंगण्या मनुष्यानें शशिमंडळ हातीं धरूं पाहण्यासारखें आहे असें या दोन वाक्यार्थांचें उपमेमध्यें पर्यवसान झालें आहे. म्हणून येथें **वाक्यार्थनिदर्शना** अलंकार झाला आहे.

**जे कां ज्ञानें लाधले सद्विचारा**
**संपत्तीचा त्यांपुढें काय तोरा ।**

पद्माचा जो तंतु तो वारणाला
वारायाला पैं म्हणे सिद्ध झाला ॥

वामन.

या ठिकाणीं श्रीमान् मनुष्यांनीं ज्ञानी लोकांपुढें तोरा मिरविणें आणि पद्माच्या तंतूनें गजाला बांधणें या दोन वाक्यांमध्यें अशक्य-संबंध आहे; तरी ज्याप्रमाणें पद्माच्या तंतूनें वारणास बांधणें अशक्य आहे त्याप्रमाणें श्रीमान् मनुष्यांचा ज्ञानी मनुष्यांपुढें तोरा चालणें अशक्य आहे, असा वरील दोन वाक्यांतील असंभवनीय संबंधाचा उपमेमध्यें शेवट झाला आहे. ही **वाक्यार्थनिदर्शना** होय.

जेथें एकाच उपमेयरूप वाक्यार्थास अनेक उपमानरूप वाक्यें असून व त्यांमध्यें संबंध असंभाव्य असूनही त्यांचें अनेक उपमांमध्यें पर्यवसान झालेलें असतें तेथें **माला-निदर्शना**नामक अलंकार होतो. जसें:—

सर्पातें बिस-तंतुनें सुदृढ तो बांधावया इच्छितो ॥
किंवा वज्रमणी शिरीष-कुसुमें भेदावया धावतो ॥
किंवा तो मधु-बिंदुनें मधुरता क्षाराब्धिला आणितो ॥
जो मूर्खास सुभाषितें वश करूं ऐसें झणीं बोलतो ॥

वामन.

येथें मूर्खास सुभाषितानें वश करणें ह्या प्रकृत वाक्यार्थास सर्पास बिसतंतूनें बांधणे, वज्रमणी शिरीष कुसुमानें फोडणें आणि सागराला मधाच्या थेंबानें माधुर्य आणणें हीं तीन उपमानवाक्यें दिलेलीं असून त्यांचा संबंध संभाव्य नसूनही त्या संबंधाचें पर्यवसान तीन उपमांमध्यें झालें आहे. म्हणून येथें **मालानिदर्शना** अलंकार झाला आहे.

कुठें वाणी ही मूढ सेवकाची । कुठें कीर्ती ती विश्वपालकाची ।
कुठें चंचू ती अल्प पाखराची । कुठें थोरी ती अतुल सागराची ॥१॥

काय वर्णूं मी स्वामिच्या यशाला । काय सूर्याला उजळती मशाला ।
काय तूलानें जोखिजे नगाला । काय वस्त्रानें झांकिजे जगाला ॥२॥

भास्कर दामोदर पाळंदे.

येथें जो मी अल्पमति विश्वपालकाच्या कीर्तीचें वर्णन करूं पाहतों तो सागराचें पाणी चोचीनें आटवितो किंवा सूर्याला मशालीनें उजळतो किंवा कापसानें पर्व-

ताची तुळा करितो किंवा वस्त्रानें पृथ्वीला झांकतो असें वर्णन असून या अशक्य वस्तूचें उपमेमध्यें पर्यवसान झालें आहे. ही देखील **मालानिदर्शना** आहे.

एकाची शोभा अथवा लीला दुसरा धारण करितो असें वर्णन जेथें असतें तेथेंही **निदर्शना** होते. जसें:—

**स्वेद-प्रकंप-युत जो कर भू-सुतेचा ।**
**हस्तीं स्वयंवरिं धरी रघुवीर साचा ॥**
**मंदानिलें हिमजलें हत जें मृणाल ।**
**त्याची प्रभात-सुषमा वरि बाहुनाल ॥**

भाषांतर.

हाताला कमळाची शोभा कशी येईल ? येणार नाहीं, येणें असंभवनीय आहे. असे असूनही शेवटीं कमळासारखी शोभा हाताला आलेली आहे असें वरील असंभवनीय संबंधाचें उपमेमध्यें पर्यवसान झालें आहे.

**पाणिग्रहणानंतर पुलकान्वित जाहली उमा-काया ।**
**अग्नि-प्रदक्षिणा करि हर तैं हस्तीं धरूनिया जाया ॥१॥**

**फिरतां वन्हि सभोंवतिं शोभा जी ये तिला तुला नाहीं ।**
**मेरू सभोंवतीं तैं भ्रमतें वासर-निशा-मिथुन पाहीं ॥ २ ॥**

रूपांतर कु. सं.

या ठिकाणीं ( वासर—निशा—मिथुन ) दिवस—रात्रीचा जोडा मेरू पर्वताभोंवतीं फिरतांना जी शोभा दिसते ती शोभा गौरी—हराला बोहल्यावर अग्नि—प्रदक्षिणा करतांना आली अशा असंभवनीय संबंधाचें उपमेमध्यें पर्यवसान झालें आहे. वास्तविक पाहतां एकाची शोभा दुसऱ्यास येणें शक्य नाहीं. म्हणून येथें **पदार्थनिदर्शना** अलंकार झाला आहे.

दोन वस्तूंमध्यें कार्यकारणभाव नसून त्या दोन वस्तूंपैकीं एकाच वस्तूच्या क्रियेनें जेव्हां त्या दोन वस्तूंमध्यें कार्यकारणभावरूप संबध जुळविला असतो तेव्हां **क्रिया-निदर्शना** अलंकार होतो. हिचे दोन पोटभेद आहेत. १ **सदर्थ-बोधननिदर्शना** व ( २ ) **असदर्थबोधननिदर्शना** जसें:—

**( १ ) आम्रतरुवर पिक मधुर काय गाती ॥**
**असा तरुवर जगिं नान्य हे सुकीर्ती ॥**

**बोध लोका करितीच कीं अहो ते ॥**
**मधुर वचनें प्रियताच जनीं होते ॥**

पां० गो० शा० पारखी.

या ठिकाणीं कोकिल पक्षी आपल्या स्वतःचे उदाहरणानें लोकांस असें दाखवितो कीं, प्रिय भाषणानें मनुष्य सर्वांस आवडतो.

ही सदर्था निदर्शना होय.

**( २ ) येतांचि उदया सूर्य देतो श्री कमला नवी ।**
**संपत्तीचें हेंचि फळ आप्तपोषण सूचवी ॥ १ ॥**

जुनें मराठी ४ थें पुस्तक.

येथेंही सदर्था निदर्शना आहे.

**( ३ ) करी द्विरेफ पद्मिनीवरी विहार हो जरी**
**वरीहि पुष्पवाटिका तशा रसालमंजरी ।**
**करीर-पुष्प शुष्कही रसार्थ चाखितो तरी**
**खरी रसज्ञलोक-वृत्ति सूचवी जनांतरी ॥ १ ॥**

केशवसुत दामले.

ही देखील सदर्थबोधन निदर्शना होय.

**( ४ ) शिखरावरोनि होई, प्रस्तरकणपतन मंदवातानें ॥**
**थोर पदीं गेल्यावरि नीच पडे, सुचवि हें स्वपातानें ॥**

भाषांतर.

वरील पद्यांत ‘ पडणें ’ हें कार्य व ‘ उच्चपदप्राप्ति ’ हें कारण होय. या कार्यकारणांचा संबंध ‘ पात ’ शब्दानें दाखविला आहे. निदर्शनेच्या पहिल्या प्रकारांत हा संबंध अशक्य असतो असें दाखविलें असतें; तसें येथें नाहीं. बोधन-निदर्शनेंत कार्य व कारण यांचा संबध शक्य अशा क्रियेनेंच दाखविला गेल्यामुळें संबंध शक्य असूनही येथें निदर्शना अलंकार होतो. दगडाच्या कणाप्रमाणेंच नीच मनुष्य उच्च स्थलावरून पडतो असा दोन वस्तूंमध्यें संबंध आहे. येथें असदर्थबोधन निदर्शना आहे.

बोधन निदर्शनेच्या वरील चार उदाहरणांवरून वाचकांच्या ध्यानांत येईल कीं, साधारणपणें सृष्टीमध्यें नित्य घडून येणारे चमत्कार आपणांस कांहीं बोध करितात असें जेथें वर्णन असतें तेथें क्रिया किंवा बोधननिदर्शना अलंकार होतो.

## ( १५ ) अर्थांतरन्यास.

[ अर्थांतर=दुसरा अर्थ, सामान्य-विशेष विधानांपैकीं एक; न्यास=ठेवणें; समर्थन करणें; प्रतीति होणें ].

जेव्हां प्रकृत सामान्य अर्थाचें समर्थन अप्रकृत विशेष अर्थानें केलेलें असतें अथवा जेव्हां प्रकृत विशेष अर्थाचें समर्थन अप्रकृत सामान्य अर्थानें केलेलें असतें तेव्हां **अर्थांतरन्यास** अलंकार होतो. उदाहरणें:—

( १ ) ज्यांचीं मनें असति लिप्त सदा स्वदोषें ॥
त्यां वस्तु सुंदर तरी विपरीत भासे ।
जो पित्तदोषयुत मानव त्यास लोकीं ॥
शीतांशुशुभ्रदर पीतचि भासतो कीं ॥

भाषांतर.

येथें स्वदोषांनीं ज्यांचीं मनें कलुषित झालेलीं असतात त्यांना सुंदर वस्तु देखील उलट्या भासतात या सामान्य विधानाचें समर्थन कावीळ झालेल्या माणसाच्या स्थितीसंबंधीं विशेष विधानानें केलें आहे.

( २ ) आली जरी कष्टदशा अपार ॥
ना टाकिती धैर्य तथापि थोर ॥
केला जरी पोत बळेंचि खालें ॥
ज्वाला तरी ते वरती उफाळे ॥

वामन.

येथें कष्टदशेंतही थोर मनुष्यें आपलें धैर्य सोडीत नाहींत या सामान्य अर्थाचें समर्थन उत्तरार्धात विशेष अर्थानें केलेलें आहे.

अथवा,

( ३ ) तादितर खग भेणें वेगळाले पळाले ॥
उपवन-जल-केली जे कराया मिळाले ॥
स्वजन गवसला जो त्याजपाशीं नसे तो ॥
कठिण समय येतां कोण कामास येतो ॥

रघुनाथ पंडित.

वरील पद्यांत पहिल्या तीन ओळींत जो विशेष अर्थ आहे त्याचें पुष्टीकरण चवथ्या ओळींतील सामान्य अर्थानें केलेलें आहे.

अथवा,

( ४ ) नक्षत्रें परिवार ज्यास, पतिही जो औषधींचा असे ॥
ज्यातें पाहुनि हर्षती जन, सुधा ज्याच्या शरीरीं वसे ॥
होई तेज कमी तथाहि विधुचें येतां रवीच्या गृहीं ॥
ज्या येई लघुता न अन्य सदनीं, ऐसा न कोणीचही ॥

कृ० शा० चिपळुणकर.

येथेंही एका विशेष अर्थाचें समर्थन शेवटीं सामान्य अर्थानें केलेलें आहे. वरील सर्व उदाहरणें साधर्म्यानें झालेल्या अर्थांतरन्यासाचीं आहेत.

( ५ ) सिंहाचा जो बाल, तोही चपेटा
मारी त्याला जो करी मत्त मोठा ।
तेजस्वी जे वृत्ति ऐसीच त्यांची
तेथें कांहीं चाड नाहीं वयाची ॥ १ ॥

वामन पंडित.

येथें पहिल्या अर्धांतील सिंहासंबंधी विशेष विधानाचें समर्थन तेजस्वी लोकांच्या वृत्ती संबंधी सामान्य विधानानें केलें आहे.

( ६ ) न तेजस्वी साहे प्रकट पर-तेजोबल मदा ।
जयाचा जो आहे प्रकृति गुण लोपे नच कदा ॥
मयूखांनीं जेव्हां प्रखरतर चंडांशु तपतो ।
रविग्रावा तेव्हां अनलसम तेजास वमतो ॥ १ ॥

येथें प्रथमार्धांतील विधान नेहमीं प्रत्ययास येणारें असल्यामुळें सामान्य आहे व द्वितीय अर्धांतील विधानानें त्यास पुष्टि दिली आहे.

( ७ ) आस्फालितांहि स्वकरें न राहे
चेंडू, जसा तो उसळेच पाहे ।
विपत्तियोगें पडले जरी कां
तें स्थैर्य नोहे तरि साधुलोकां ॥ १ ॥

येथेंही विशेष विधानावरून सामान्य विधान प्रस्थापित केलें आहे.

अर्थांतरन्यास वैधर्म्यानेंही होतो. जसें:—

(१) सखि ! दासी सैरंध्री ती स्ववशा शिल्पकारिका होती
प्रभुला रुचली चिमणी, बहु बरवी होय सारिका हो ? ती ॥१॥
टाणें टोणें शिकतों तरि सखि देतोंचि तीस उडवून ।
सखि कोणाला हि किमपि सुख चिर न मिळेचि सुकृत बुडवून २

मोरोपंत.

येथें दुसऱ्या कवितेंत पहिल्या अर्धांत मंत्रादिकानें कुब्जेस नाहींशी करून सुखप्राप्ति करून घेतली असती; पण असें सुख खरें सुख नव्हे अशा विपरीत अर्थाचें कथन असल्यामुळें येथें वैधर्म्यैंकरून अर्थांतरन्यास अलंकार झाला आहे.

( २ ) अंगीं बरेच गुण, या अपराधयोगें ॥
स्कंधीं भरा वृषभ वाहुनि दुःख भोगे ॥
मानेवरी नच धुरा स्थिर होइ ज्याचे ॥
तो दुष्ट मत्त वृष खात बसे फुकाचें ॥१॥

भाषांतर

येथें मानेवर जूं घेऊन काम करणारा बैल दुःख भोगतो हें सामान्य विधान आहे व जो मानेवर जूं ठेवूं देखील देत नाहीं तो दुःख भोगीत नाहीं हें विशेष विधान आहे. पण हें विशेष विधान–'खाष्ट बैल फुकट खात बसतो' असें साधर्म्यानें न करितां वैधर्म्यानें केलेलें आहे.

---

## १६ अप्रस्तुतप्रशंसा—अन्योक्ति.

जेथें प्रकृताचें म्हणजे वर्णनीय विषयाचें वर्णन न करितां अप्रकृत पदार्थांचेंच वर्णन केलेलें असतें व अप्रकृत किंवा अप्रस्तुत पदार्थांचें वर्णनावरून प्रस्तुत किंवा वर्णनीय विषयाचें ज्ञान होतें तेथें **अप्रस्तुतप्रशंसा** नामक अलंकार होतो. यालाच **अन्योक्ति** ( अप्रस्तुत=अन्य व प्रशंसा=उक्ति) असेंही म्हणतात. जसें:—

( १ ) फळें मधुर खावया असति नित्य मेवे तसे ॥
हिरे-जडित सुंदरीं कनक–पंजरींही वसे ॥
अहर्निश तथापि तो शुक मनांत दुःखें झुरे ॥
स्वतंत्र वनवृत्तिच्या घडिघडी सुखातें स्मरे ॥ १ ॥

कृ. शा. चिपळूणकर.

येथें अप्रस्तुत जो शुक त्याच्या वर्णनानें प्रस्तुत जो परतंत्र मनुष्य त्याच्या स्थितीचा बोध होतो म्हणून ही अन्योक्ति किंवा अप्रस्तुतप्रशंसा होय.

**( २ ) येथें समस्त बहिरे बसतात लोक**
**कां भाषणें मधुर तूं करिशी अनेक ।**
**हे मूर्ख यांस किमपीहि नसे विवेक**
**रंगावरून तुजला गणतील काक ॥ १ ॥**

कृष्णशास्त्री चिपळूणकर.

वरील कविता बाह्यतः कोकिल पक्ष्यास उद्देशून लिहिली आहे; पण ती वस्तुतः ज्यास गुणी व मूढ यांमधील फरक कळून येत नाहीं अशा अरसिकास लागूं पडते.

या अलंकाराचे पांच प्रकार आहेत; ते असेः—

( १ ) कार्य प्रस्तुत असतां कारणाचें वर्णन; ( २ ) कारण प्रस्तुत असतां कार्याचें वर्णन; ( ३ ) सामान्य प्रस्तुत असतां विशेषाचें वर्णन; ( ४ ) विशेष प्रस्तुत असतां सामान्याचें वर्णन व ( ५ ) एक वस्तु वर्णनीय असतां तत्तुल्य अन्य वस्तूचें वर्णन. क्रमानें उदाहरणेंः—

( १ ) कार्य प्रस्तुत असून कारणाचें वर्णनः—

**जाती देशांतरीं जे पुनरपि सखये काय ते भेटती ना**
**सांडी चिंता, कृशा तूं ! जल मम नयनीं ये असें बोलतांना ।**
**तों लज्जामंथराक्षी निरखुनि मजला वारुनी स्वाश्रुवारि**
**मित्रा ! वामा सुहास्यें निज मरणिं पहा दावि उत्साह भारी ॥**

भाषांतर.

येथें प्रवासास जाण्याचा विचार सोडून कां दिला असा मित्राचा प्रश्न असून तुमचा व माझा वियोग झाल्यास मला मरण येईल व तें मी सुखानें भोगीन असें माझ्या पत्नीनें मंदस्मितानें दर्शविलें; या कारणामुळें प्रवासास निघालों नाहीं असें वर्णन आहे. या ठिकाणीं कारण अप्रस्तुत असून त्याच्या कथनानें कार्याचा बोध झाला आहे.

( २ ) कारण प्रस्तुत असतां कार्याचें वर्णनः—

**राजा ! राजसुता मला पढविना राणी न बोले मशीं ।**
**कुब्जे भोजन दे त्वरें, स्मृति तुला माझी असेना कशी ॥**

**चित्रें भित्तिवरील पाहुनि तुझ्या शून्यीं रिपूंच्या गृहीं।**
**राया अध्वगमुक्त सौधगत तो वाणी वदे कीर ही॥**

भाषांतर.

येथें शत्रूवर चालून जाण्याची तुझी सर्व सिद्धता झाली हें ऐकूनच तुझे वैरी पळाले हें कारण प्रस्तुत असून पलायनाच्या कार्याचें शुकभाषणरूपानें कथन केलें आहे.

( ३ ) सामान्य प्रस्तुत असून अप्रस्तुत विशेषाचें कथनः—

**हें हो काय ? असें म्हणूनि नलिनीपत्रस्थिता बिंदुला**
**मानी मौक्तिक, मूढ तो मग तया हस्तीं धरूं लागला॥**
**स्पर्शें पावुनि भंग तो चिकटला त्याच्या कराग्रावरी**
**गेलें तें उडुनी कुठें मम ? अशी चिंता सदा तो करी॥**

भाषांतर.

मूर्खांना कांहीं गोष्टींचें विनाकारण महत्व वाटतें हा सामान्य अर्थ प्रस्तुत असून एका मूर्खाचा अप्रस्तुत विशेष वृत्तांत येथें सांगितला आहे.

अथवा,

**महा लाटांनीं तूं प्रचलित करोनी गुरु शिला।**
**नको चूर्णूं रत्नां वसति तव जीं गाढ कुशिला॥**
**अपेक्षा ही त्यांची क्षणभरिहि सिंधो ! नच बरी।**
**न मागे कां पूर्वीं कर पसरुनी कौस्तुभ हरी॥ १॥**

भाषांतर

श्रीमान् लोकांनीं आपल्या संपत्तीचा मूर्खपणानें नाश करूं नये; कारण त्यांस क्षुद्र वाटणाऱ्या वस्तूंना दुसऱ्यास फार उपयोग होतो हा सामान्य अर्थ प्रस्तुत असून समुद्र व विष्णु या अप्रस्तुत विषयाचें येथें वर्णन केलें आहे.

( ४ ) विशेष प्रस्तुत असून अप्रस्तुत सामान्याचें कथनः—

**आहेच साहजिक धूर्तपण स्त्रियांचें।**
**स्वार्थार्थ कैतवजनीं किति हो तयांचें॥**
**ही युक्ति कोण शिकवी वद कोकिलांतें।**
**अन्य द्विजांकडुनि पोषविती पिलांतें॥ १॥**

परशुरामतात्या गोडबोले.

येथें ‘ तूं कपटी आहेस ’ हा विशेष अर्थ प्रस्तुत असून तसें शकुंतलेस न सांगतां कोकिलांच्या उदाहरणानें स्त्रिया साधारणपणें कपटी असतात असें सामान्य विधान केलें आहे. पण हें विधान अप्रस्तुत आहे.

( ५ ) तुल्य प्रस्तुत असून तुल्य अप्रस्तुताचें कथनः—

**मेघा ! वर्षुनि तूं चराचर–जगा आनंदवीशीं खरें ।**
**विद्युत्स्त्री तव चंचलाचि, पडतां होई चुराडा अरे ! ॥**
**पाहोनि भुलतोसि गोमटि वधू बैसे तुझ्या ती शिरीं ।**
**नाचे त्यापरि नाचुं देशि तिजला ही रीत नोहे बरी ॥१॥**

पाडुरंगशास्त्री पारखी.

सुंदर स्त्री असली तरी स्त्रीवश होऊन पुरुषानें तिला वाटेल तसें वागूं देणें चांगलें नाहीं हा प्रस्तुत अर्थ असून चंचल चपलेच्या लीलेचें म्हणजे तुल्य अप्रस्तुताचें येथें वर्णन आहे.

कधीं कधीं अन्योक्तीमध्यें अध्यारोपही असतो म्हणजे तिजमध्यें एक प्रकारचें रूपक असतें. जसें:—

( १ ) **तैसा तो रसनाविपर्ययविधी चापल्य कर्णीं तसें ।**
**आप्तानाप्तविवेकशून्य दिठि ती, हे बोल रे कायसे ॥**
**तूं तें सर्वच जाणसी परि गमे अत्याग्रहा दाविसी ।**
**अन्तःशून्य करा गजा ! मधुकरा अद्यापि कीं सेविसी ॥ १ ॥**

भाषांतर.

येथें गजावर स्वामीचा व मधुकरावर चाकराचा आरोप केलेला आहे. ‘ बडा घर पोकळ वासा ’ अशी स्थिति झाली असतांना देखील पुष्कळ रिक्तहस्त लोक ऐष–आरामांत गढलेले असतात व नोकरचाकरांचा लवाजमा बाळगतात अशी वरील अन्योक्तीची योजना आहे. येथें अध्यारोप अंशतः आहे.

( २ ) **तूं रे कोण इथें ? कपालकरटा मी जाण शाखोट हा**
**वैराग्यें वदसी ? खरें उमगसी; तें प्राप्त कां ? हें पहा ।**
**सारे अध्वग हे वटासि दुरिंच्या सर्वोपरी सेविती**
**मार्गीं मी, न परोपकार करण्या छाया ! असें दूषिती ॥**

येथें कोण्या एका सधन पुरुषानें आपल्या जवळचें धन देऊं केलें असतांही तें घेतलें नाहीं अशा एका अधम पुरुषाचा आरोप शाखोटक वृक्षावर, एका सत्पुरुषाचा आरोप वटावर व धनाचा आरोप छायेवर केला आहे.

( ३ ) अगा हंसा चंचूमधि विकसलें पद्म धरुनी ।
प्रमोदें डौलानें उडसिहि तसा नाचसि वनीं ।
परी हास्यें कैसें विकल जन केले बघ सख्या ।
अली चैनीनें त्वद्धृतकमल सेवी म्हणुनिया ॥ १ ॥

केशवसुत.

येथें हंसावर सात्विक पतीचा, विकसित पद्मावर उपभोग्यवस्तूचा म्हणजे स्त्रीचा व भ्रमरावर उपपतीचा आरोप केलेला आहे.

वरील दोन्ही कवितांत अध्यारोप पूर्ण नाहीं.

---

## ( १७ ) अतिशयोक्ति.

वस्तुस्थिति जशी असेल तिजपेक्षां एकाद्या पदार्थाचें वर्णन जेथें फार फुगवून केलेलें असतें तेथें अतिशयोक्ति नामक अलंकार होतो. जसें:—

(१) ज्याच्या मागेंहि फिरे हरि मस्तकिं धरुनि निज करेंचि फणी ।
तद्गुण किति मी वर्णूं दशशतमुख वर्णितां थकेल फणी ॥

नारायण कवि.

(२) पडतांचि गाठि झाले समरचमत्कार फार न वद्वती
लिहितां सरस्वतीच्या सरतिल शतकलशसदृश नव द्वती ॥

मोरोपंत.

अतिशयोक्तीचे मुख्य चार प्रकार आहेत:—( १ ) रूपकातिशयोक्ति, ( २ ) भेदकातिशयोक्ति, ( ३ ) यद्यर्थातिशयोक्ति आणि ( ४ ) कार्यकारणपौर्वापर्यविपर्ययातिशयोक्ति ( विपर्ययातिशयोक्ति ).

( १ ) जेव्हां प्रकृत व अप्रकृत यांच्यामध्यें पूर्ण अभेद असून अप्रकृतानें प्रकृतास अगदीं गिळून टाकलें आहे असें वर्णन असतें तेथें **रूपकातिशयोक्ति** हा अलंकार होतो. जसें:—

(१) हरिच्या पुनःपुन्हा कां काञ्च्या नाकांत घालसी शशका ? ।
यश काय पक्षिपतिचें येइल हे चार करुनियां मशका ? ॥

मोरोपंत.

(२) हंसें मुक्ता नेली मग केला कलकलाट काकांनीं ।
हाकांनीं नभ भरिलें जाय सुरांच्या निनाद हा कानीं ॥

मोरोपंत.

येथें पहिल्या उदाहरणांत ‘ हरि ’ व ‘ पक्षिराज , हे शब्द धर्मराजाबद्दल आणि ‘ शशक ’ व ‘ मशक ’ हे शब्द दुर्योधनाबद्दल घातले असून धर्म व दुर्योधन या उपमेयांचा मुळींच कोठें उल्लेख केलेला नाहीं. त्याच प्रमाणें दुसऱ्या उदाहरणांत ‘ हंस ’ व ‘ मुक्ता ’ हे शब्द अनुक्रमें श्रीकृष्ण व रुक्मिणी यांचे बोधक असून ‘ काक ’ शब्द शिशुपाल, रुक्मी वगैरेबद्दल आलेला असून त्यांचा वरील वर्णनांत मुळींच नामनिर्देश नाहीं. धर्म, श्रीकृष्ण वगैरे उपमेयांस ‘हरि’ ‘हंस’ इत्यादि उपमानांनीं जणु काय गिळूनच टाकलें असून उपमानवाचक शब्दांनींच धर्म, कृष्ण इत्यादि उपमेयांचा बोध होतो म्हणून हीं दोन्ही रूपकातिशयोक्तीचीं उदाहरणें होत.

( २ ) जेथें प्रकृत आणि अप्रकृत यांच्यामध्यें वास्तविक भेद नसूनही भेद म्हणजे भिन्नपणा आहे असें वर्णन असतें तेथें **भेदकातिशयोक्ति** अलंकार होतो. जसें:—

**( १ ) ती अन्यपद्धति गमे मज भाषणाची**
**अन्याच तीहि रचना वचनावलीची ।**
**लोकोत्तरा सुकृति आकृति रम्य भारी**
**विद्वद्वरा सकलही अति तोषकारी ॥ १ ॥**

भाषांतर.

वरील उदाहरणांत ‘ अन्य ’ शब्द भिन्नतादर्शक आहे. येथें ‘भाषणपद्धति’, ‘वचनावलीची रचना’ इत्यादि पदें उपमेयें असून उपमानें दिलेलीं नाहींत. पण ‘अन्य’ हा शब्दच उपमानाचें काम करीत असून त्याच्या योगानें ‘अवर्णनीयत्व” ‘लोकोत्तरत्व’ हे गुण दाखविले जातात.

**( २ ) तूं घोर शब्द करिशी भलत्याच काळीं ।**
**लोकासवें नससि रीति तुझी निराळी ॥**
**रात्रीस तूंचि फिरसी खगजात्यमित्रा ।**
**सूर्यप्रकाश दिपवीत तुझ्याच नेत्रा ॥ १ ॥**

राम गडकरी.

या ठिकाणीं ‘ निराळी ’ हा शब्द भिन्नता किंवा विक्षिप्तपणादर्शक आहे.

**( ३ ) सौंदर्याची संपदा हे विभिन्ना**
**चातुर्याची पद्धती तीहि भिन्ना ।**

**लोकीं वाटे पद्मपत्रेक्षणा ही**
**स्रष्ट्याची कीं सृष्टि सामान्य नाहीं ॥**

वामन शास्त्री केमकर.

येथेंही ' भिन्न ' शब्द लोकोत्तरत्व हा गुण दाखवितो.

जेथें एकच पदार्थ अनेकांस भिन्नभिन्न प्रकारानें भासतो तेथेंही भेदकातिशयोक्ती होते. उदाहरणें:—

( १ ) मुखींचें चंद्रांशु पय म्हणुनि मार्जारहि पिती ।
तरुच्छिद्रींचे ते बिस म्हणुनि हत्ती कवळिती ॥
रतांतीं नारी त्या पट म्हणुनि झाकीति तनुंशीं ।
प्रभामत्ता चंद्रा ! सकल जग ऐसें फसविशी ॥ १ ॥

भाषांतर.

येथें चंद्रकिरणें मांजरास दुधाप्रमाणें, हत्तीस बिसतंतूप्रमाणें व नारींस पटाप्रमाणें वाटलीं असें वर्णन आहे.

( २ ) सीतेला स्मरसा, धनूस हरसा, राजां दिसे वीरसा
मूढाला नरसा, जनां नृवरसा, भक्तांसि माहेरसा ॥
देवा ईश्वरसा, रिपूंसि गरसा, ज्ञात्यांसि चित्सारसा
ऐसा सर्व रसांसि हेतु परिसा, जो सूर्य हृत्सारसा ॥ १ ॥

आनंदतनय.

( ३ ) मल्लां वज्र गमे, नरा नृप गमे, काम स्वयें स्त्रीजनां
गोपा आप्त, नृपां खळां प्रभु, शिशू मातापित्यांच्या मना ।
कंसा मृत्यु, अशक्त पामरजना संतांसि सत्वामृत
श्रीशेषासन यादवां हरि दिसे रंगांत रामान्वित ॥

वामन पंडित.

वरील दोन्ही उदाहरणांत राम व कृष्ण यांस अनेकांनीं अनेक प्रकारें लेखिलें असें वर्णिलें आहे म्हणून हीं भेदकातिशयोक्तीचीं उदाहरणें होत. या प्रकारास कोणी **उल्लेख** असेंही म्हणतात.

(३) **यद्यर्थातिशयोक्ति** हा अतिशयोक्तीचा तिसरा प्रकार आहे. या अलंकारांत ' यदि ' या शब्दाच्या अर्थाचे ' जर ' ' जरी ' हे शब्द घातले असल्यामुळें वर्णनांतील अतिशय किंवा असंभाव्यता दर्शविली जाते. जसें:—

( १ ) तिमिर शारदचंद्रहि तारका
कमल विद्रुप चंपक-कोरका ।
मिळति हीं जरि एकट कीं सये
तरि तिच्या वदना तुलना न ये ॥

गंगाधरशास्त्री.

या ठिकाणीं तिमिर शारदचंद्र तारका वगैरे सर्व पदार्थांनीं एकत्र होऊन तिच्या मुखाची बरोबरी करण्याचा प्रयत्न केला तरी तिच्या वदनाची बरोबरी त्याच्याकडून होणार नाहीं असे अतिशयोक्तिपूर्ण वर्णन आहे.

तसेंच येथें तिमिर, शरच्चंद्र इत्यादि शब्द उपमानवाचक असून त्या उपमानांत केश, मुख, फुलें, नेत्र, अधर व नासिका हीं उपमेयें अगदीं निगीर्ण ( गिळून टाकल्यासारखीं ) आहेत. म्हणून येथें **यद्यर्थातिशयोक्ति** असून रूपकातिशयोक्तिही आहे.

( २ ) ठेवियलें जर शुभ्र पुष्प तें बालपल्लवा वरतें;
अथवा सतेज मौक्तिक राहे स्वच्छ पोंवळयावर; तें ॥ १ ॥
तरि होइल गौरीच्या शुभ्रा हास्यापरि कांहींसें
रक्तां अधरीं कांति फाकतां विशेष तेंची विलसे ॥ २ ॥

कुमारसंभव.

येथें रक्त बालपल्लवावर जर शुभ्र पुष्प ठेवलें किंवा पोंवळ्यावर सतेज मौक्तिक ठेविलें तर त्यांच्यांत गौरीच्या शुभ्र हास्याची अगदीं थोडीशी छटा येईल असें वर्णन असल्यामुळें यद्यर्थातिशयोक्ति झाली आहे.

यद्यर्थातिशयोक्तीचे दोन पोटभेद आहेत. पहिला **संबंधातिशयोक्ति** व दुसरा **असंबंधातिशयोक्ति.**

दोन वस्तूंचा संबंध नसूनही जेथें कविप्रतिभानिर्मित संबंध आहे असें दाखविलें असतें तेथें संबंधातिशयोक्ति अलंकार होतो. जसें:—

( १ ) पुरे गर्जना ही घना ! चाल वाटे
धरीं गर्भ मी मास ना एक लोटे ।
गजश्रेष्ठ हा मानुनी बाळ माझें
उडे स्वोदरीं भेदण्या गंड तूझें ॥

भाषांतर.

येथें एक सिंहीण गरजणाऱ्या मेघास उद्देशून म्हणते हे घना, तुझी गर्जना आतां पुरे. कारण माझ्या पोटांतील एक महिन्याचा गर्भाचा गोळा तूं हत्तीच आहेस असें समजून तुझें गंडस्थल फोडण्याकरितां उसळ्या मारीत आहे. येथें मेघाच्या गर्जनेचा व गर्भाच्या चलनवलनाचा कांहीं संबंध नसून कवीनें संबंध कल्पिला आहे.

( २ ) जो अंबरीं उफळतां खुर लागलाहे ॥
तो चंद्रमा निज-तनूवरि डाग लाहे ॥
जो या यशास्तव कसें धवलत्व ने घे ॥
श्रृंगारिला हय तयावरि भूप वेंघे ॥ १ ॥

रघुनाथ पंडित.

या ठिकाणीं नलाचा अश्व आकाशापर्यंत उडाला हें वर्णन अतिशयोक्तीचें असून घोड्याचा खुर व चंद्राचा डाग ह्यामध्यें कांहींएक संबंध नसतां तो डाग घोड्याचा खुर लागूनच पडलेला आहे असा संबंध जोडलेला आहे.

जेथें संबंध असूनही संबंध नाहीं असें दाखविलें असतें तेथें असंबंधातिशयोक्ति होते. जसें:—

पीयूषकल्प अलपच्चि भाषण देतें तुझें नृपा तोषा ॥
अधरामृतपानेंही सुखलव देण्या न शक्त हे योषा ॥

भाषांतर.

येथें स्त्री पूर्णपणें सुख देण्यास समर्थ असतांही सुखाचा लव देखील देण्यास समर्थ नाहीं असें अतिशयोक्तिमय वर्णन आहे.

( ४ ) कार्यकारण-पौर्वापर्य-विपर्ययातिशयोक्तिः—

नेहमींचा क्रम म्हटला म्हणजे कारणापासून कार्य उत्पन्न होणें हा होय. प्रथम कारण अस्तित्वांत असून नंतर कार्य घडून येतें. परंतु या क्रमाची जेव्हां उलटापालट होते म्हणजे कार्य अगोदर घडलें व नंतर कारण अस्तित्वांत आलें असें अथवा जेथें कार्य व कारण यांचा सहभाव आहे असें ीन असतें तेथें हा अलंकार आहे असें जाणावें. ह्याचेही दोन पोटभेद आहेत.

( अ ) अत्यंतातिशयोक्ति, व ( आ ) अक्रमातिशयोक्ति.

( अ ) जेथें कार्य अगोदर घडून मागाहून कारण अस्तित्वांत आलें असें वर्णन असतें तेथें अत्यंतातिशयोक्ति नामक अलंकार होतो. उदाहरणें:—

(१) आधीं सुलोचनेच्या मदनें केला प्रवेश हृद्यांत ॥
दृष्टिपथीं पडुनि तिच्या तूंहि नृपा करिशि वास कीं त्यांत ॥१॥

भाषांतर.

वास्तविक पाहतां राजा दृष्टीस पडल्यावर मदनप्रादुर्भाव झाला असून मदनानें तिच्या चित्तांत प्रवेश केल्यावर तिच्या मनांत राजा भरला असें अतिशयोक्तीचें वर्णन येथें आहे.

(२) कदा नेणो ओढी शरधितुनि काढी शर कदा ।
कदा धन्वीं जोडी वरिवरिहि सोडी तरि कदा ॥
विपक्षाच्या वक्षावरि विवरलक्षास्तव रणीं ।
कळे राजेंद्राची त्वरित शरसंधान-करणी ॥ १ ॥

रघुनाथ पंडित.

येथें शत्रूंच्या वक्षस्थलांवर क्षतें झाल्यानंतर नळानें बाण सोडले असें अनुमानानें ठरवावें लागे असें वर्णन असल्यामुळें येथेंही अत्यंतातिशयोक्ति झाली आहे.

(आ) कारणाबरोबरच कार्याची उत्पत्ति झाली असें जेथें वर्णन असतें तेथें **अक्रमातिशयोक्ति** अलंकार होतो. जसें:—

(१) मृत्यु जे घडिस होय अघाला ।
प्राण ते क्षणिंच ये अनघाला ॥
दोन्हि एक समयींच कराया ।
जाय त्यांत, म्हणतो शुक राया ॥

वामन पंडित

या ठिकाणीं अघासुराला मारणें हें कारण व निष्कलंक आणि पापहीन मनुष्याचे प्राण वांचविणें हें कार्य होय. तरी कृष्णानें हीं दोन्ही एकदमच केलीं असें येथें वर्णन केलें आहे.

(२) "आवर आवर कोप विभो हा" ऐसीं जोंवर गगनीं
प्रार्थित सारे सुर विनयानें बसले दिव्य विमांनीं ।
तोंवरि शिवनेत्रांतुनि झाल्या उदित वन्हिनें मदन
जाळुन त्याचें भस्मचि केवळ शेष उरविलें जाण ॥

कुमार संभव.

येथें 'कोप आवर' या शब्दांच्या उच्चाराबरोबरच शिवाच्या तृतीय नेत्रांतील अग्नीनें मदनाचें जळून भस्म झालें असें वर्णन आहे.

(३) हा चंद्र जात विलया उदया रवी तो
चाले पुढें अरुण यापरि पाहिं येतो
हा एककालिक जणों उदयास्त होत
लोकांस शिक्षणचि भिन्न परिस्थितींत ॥

के. वि. गोडबोले.

वरील भेदाशिवाय कित्येकांनीं या अलंकाराचे आणखी दोन भेद कल्पिले आहेत ते खालीं दिले आहेत.

(१) अतिशय वर्णिला असूनही जेथें निषेध गर्भित असतो तेथें **सापह्नवातिशयोक्ति** अलंकार होतो. उदाहरणः—

बहु मीहि भागलों बा ! बोधुनि दगडांस कां न भागावें ।
खळ-हृदय शून्य केवळ, शून्य असें व्यर्थ कां नभा गावें ॥

मोरोपंत.

या पद्यांत आकाश शून्य आहे असें म्हणतात तें व्यर्थ आहे असा निषेध करून खळहृदयच फक्त शून्य आहे असा सातिशय आक्षेप केलेला आहे.

(२) जेथें कारणाचा उपक्रम झाल्याबरोबर कार्य घडतें म्हणजे नुसत्या कारणाचा नामनिर्देष केल्याबरोबर कार्योत्पत्ति होते असें वर्णन असतें तेथें **चपलातिशयोक्ति** असें म्हणतात. उदाहरणः—

(१) रामातें एकट्यातें दशरथ नृपती वाट दावी वनींची ।
ऐकोनी वृत्त ऐसें झडकरि गळलीं कंकणें तीं सतीचीं ॥
सीतेसी जावयातें अनुमत दिधलें त्यासवें, ही जनाची ।
वार्ता कर्णीं न येते तव झणिं तुटलीं बंधनें कंचुकीचीं ॥

येथें राम वनांत एकटाच जातो असें ऐकून सीता कृश होऊन तिचीं कंकणें गळालीं व त्याच्याबरोबर आपणासही जावयाचें आहे हें ऐकून आनंदानें ती इतकी फुगली कीं तिचीं चोळीचीं बंधनें तुटलीं असें वर्णन आहे.

(२) पतिप्रेमाचें ये हृदयकमलीं थोर भरतें
तयाचें हें देहीं प्रकट उमटे चिन्ह वरतें ।

प्रकर्षे हर्षाच्या कृशतनु अकस्मातचि फुगे
तदा त्या सत्वाचे अनुभव कसे राहति उगे ।

सामराज.

( ३ ) भुजीं कंचुकी फाटताहे तडाडा
करीं कंकणें फूटताती कडाडा ।
पुढें होउनी तत्करांभोरुहातें
उरोजीं धरी गाढ रंभोरु हातें ॥

वामन.

येथें अतिहर्षाच्या योगे अंगें फुगून वस्त्रादि फाटून गेलीं असें वर्णन आहे.

कोणी कोणी **मिथ्याध्यवसिति** नामक अलंकार निराळा आहे असें मानितात. यांत एका दुर्घट कार्याचें अथवा अर्थाचें मिथ्यात्व सिद्ध करण्याकरितां दुसऱ्या मिथ्याभूत अर्थाची कल्पना केलेली असते. जसेः—

प्रयत्नें वाळूचे कण रगडितां तेलहि गळे ॥
तृषार्ताची तृष्णा मृगजळ पिऊनीहि वितळे ॥
सशाचेंही लाधे विपिन फिरतां शृंगहि जरी ॥
परंतु मूर्खाचें हृदय धरवेना क्षणभरीं ॥

वामन.

या ठिकाणीं ' मूर्खाचें हृदय धरणें ' हें काम फारच कठीण आहे असें स्थापन करण्याकरितां वाळूचें तेल काढणें, मृगजळानें तहान भागविणें, व सशाचें शिंग सांपडणें ह्या मिथ्याभूत ( जगांत ज्यांचें मुळींच अस्तित्व नाहीं अशा ) अर्थाची कल्पना केली आहे.

वास्तविक पाहिलें असतां मिथ्याध्यवसिति हा वेगळा अलंकार मानण्याचें कारण नाहीं. वाळूचें तेल काढवेल परंतु मूर्खास संतुष्ट करवणार नाहीं ही अर्थातच अतिशयोक्ति आहे; आणि या दोन गोष्टींमध्यें संबंध नसूनही संबंध जुळविला आहे म्हणून वरील संबंधातिशयोक्तीचें उदाहरण आहे.

---

## ( १८ ) दीपक.

[ दीपःइव=दीपकः। दीपयति=सुंदरीकरोति । राजवाड्यांत लावलेल्या मोठ्या दिव्याचा जसा रस्त्यांतील लोकांनाही उजेड मिळतो तसा वर्णनीय वस्तुगत धर्म अप्रस्तुतनिष्ठ धर्मासही उपकारकारक होतो असा भावार्थ ].

जेव्हां प्रस्तुत आणि अप्रस्तुत यांच्याठायीं असणारा साधारणधर्म एकदाच कथन केल्यामुळें वाक्यास शोभा येते तेव्हां दीपक अलंकार होतो. याचे दोन प्रकार आहेत. ( १ ) **क्रियादीपक** व ( २ ) **कारकदीपक.**

( १ ) जेथें अनेक कर्त्यांचा एकाच क्रियापदाशीं संबंध असतो तेथें **क्रियादीपक** अलंकार होतो. जसें:—

**( १ ) नेत्रभुजोरुस्फुरणें चिंतेची सोडिली मनें बाज**
**माज प्राणांनींही, गेल्या धैर्यैंहि यावया लाज ॥**

मोरोपंत.

रुक्मिणी आपल्या लग्नाची कथा द्रौपदीस सांगतांना स्वतःच्या मनाच्या स्थितीचें येथें वर्णन करीत आहे. माझा डावा डोळा, डावा भुज इत्यादिकांच्या स्फुरणामुळें मला शुभ-शकुन झालेसें वाटून माझें मन चिंतारूपी बाजेवर निजलें होतें तें ती बाज सोडून गेलें ( माझी चिंता दूर झाली ), माझ्या शरीरांतून निघून जाण्याकरितां प्राणांनीं ( माज ) कंबर बांधली होती ती त्यांनीं सोडली ( माझ्या जीवांतजीव आला मला उत्साह वाटूं लागला ) व माझें धैर्य अगदीं गळून गेलें होतें त्यानें परत येण्याविषयीं जी त्यास लाज वाटत होती ती सोडली (धैर्यबळ पुन्हा प्राप्त झालें ). ह्या ठिकाणीं मनें बाज, प्राणांनीं माज व धैर्यें लाज यांचा ‘ सोडिली ’ या एकाच क्रियापदाशीं संबंध आहे व त्यांचा साधारण धर्म जो ‘ त्याग ’ तो ‘ सोडिली ’ या क्रियापदानें एकदांच सांगितला आहे; म्हणून हें **क्रियादीपकाचें** उदाहरण होय.

**( २ ) शाणोल्लेख जया असा मणि, रणीं जो वीर घायाळला ।**
**संभोगें शिणली अशी नव वधू, हस्ती न मस्तावला ॥**
**ज्यांचीं स्वच्छ शरद्तूंत पुलिनें त्या निम्नगा चंद्रही ।**
**बीजेचा, प्रभु पात्र-दत्त-धन जो, हे शोभती सर्वेही ॥**

वामन.

प्रस्तुत पद्यांत 'पात्र-दत्त-धन' प्रभु उपमेय आहे व मणि, वीर, वधू वगैरे उपमानें आहेत. ह्या उपमेय व उपमानांचा साधारण धर्म जो 'शोभा' तो एकदांच 'शोभती' या शब्दानें सांगितला आहे. म्हणून हा **दीपक** अलंकार होय. आणि अनेक कर्त्यांचा एकाच क्रियापदाशीं संबंध असल्यामुळें हें **क्रियादीपकाचें** उदाहरण आहे.

**( ३ ) दुर्मंत्रें नृप, संगतीस्तव यती, कीं पुत्रही लालनें ।**
**वेदानध्ययनें द्विजाति, कुळ दुष्पुत्रें, खलाराधनें ॥**
**नासे शील, न पाहतां कृषि, मदें मा, लाज मद्यें फुका ।**
**शाठ्यें मित्रपण, प्रवास गमनें स्नेह, प्रमादें रुका ॥**

वामन पंडित.

हेंही **क्रियादीपकाचें** उदाहरण आहे.

( २ ) अनेक क्रियापदांचा एकाच कर्त्याशीं संबंध आहे असें जेथें दाखविलें असतें तेथें **कारकदीपक** नामक अलंकार होतो. जसें:—

**( १ ) पायीं भ्रमली, श्रमली, निजली, भिजली निजाश्रु-नीरांनीं ॥**
**धार्मिक न पाहिला तो जो जाय अशीच टाकुनी रानीं ॥**

मोरोपंत.

प्रस्तुत पद्यांत उपमेय, उपमान, व साधारणधर्म हीं क्रियादीपकाप्रमाणें दिलेलीं नाहींत. फक्त ' दमयंती ' ह्या कर्त्यांचा अनेक क्रियापदांशीं संबंध आहे.

**( २ ) तूं करुनि समर न मर, भ्रमरसम रघूत्तमांघ्रिनवपद्मीं ।**
**रम, रस घे, अमरचि हो भ्रमरहित स्वस्थ नांद निजसद्मीं ॥**

मोरोपंत.

हें अंगदाचें रावणाशीं भाषण आहे. येथें ' तूं ' या कर्त्यांचा अनेक क्रियापदांशीं संबंध दर्शविला आहे.

**( ३ ) राक्षसभक्ष मनुष्यं, स्वजनत्यक्त प्लवंगसख यास ।**
**स्तविशी निंदिसि बंधुस राजास, प्रभूस, गुरुस, सखयास ॥**

मोरोपंत.

हें बिभीषणास उद्देशून केलेलें रावणाचें भाषण आहे. येथें क्रिया व कारक दीपक हे दोन्ही अलंकार साधले आहेत.

एकाच वाक्यांत जेव्हां पूर्वी आलेली वस्तु मागाहून येणाऱ्या वस्तूची शोभा वाढविण्यास कारणीभूत होते तेव्हां **मालादीपक** अलंकार होतो. जसेः—

**( १ ) आस्वादें रस कीं रसेंच कविता काव्येंहि वाणी सदा ॥**
**वाणीनेंचि परोपकाररतधी वक्ता, तयानें सभा ॥**
**क्षोणीनाथ, सभेमुळें सततही काया त्वदीया पहा ॥**
**कायेनें तव कीर्ति शोभत असे, तीनेंचि भूलोक हा ॥**

भाषांतर.

येथें सर्व वस्तूंचा 'शोभत असे' या क्रियापदाकडे संबध आहे व पूर्वीच्या वस्तूंनीं नंतरच्या वस्तूंची गुणवृद्धि झाली असें दाखविलें असल्यामुळें हा **मालादीपक** अलंकार झाला आहे.

**( २ ) संग्रामांगणिं ठाकतां क्षणिंच तूं जोडूनि चापीं शरा ।**
**कोणा काय रणांत लाभ घडला तें ऐक तूं भूवरा ॥**
**कोदंडा शर त्या शरां अरिशिरें त्यांनाहि पृथ्वी अहा !**
**पृथ्वीला नृप तूं, तुला यश, यशा ब्रह्मांड सारें पहा ॥**

भाषांतर.

येथें कोदंडा शर, शरां शिरें अशा प्रकारें पूर्व पूर्व वस्तु उत्तरोत्तर वस्तुस उपकारक झाली असें वर्णन असून सर्वांचा 'लाभ घडला' या क्रियेशीं चमत्कारजनक संबंध आहे; म्हणून हा मालादीपक अलंकार आहे.

---

## ( १९ ) तुल्योयगिता.

[ तुल्य असा जो योग ( संबंध, अन्वय ) तो तुल्ययोग—एकधर्मान्वय, त्याचा भाव तुल्ययोगिता. ]

जेव्हां फक्त प्रकृतांचा ( वर्णनीय पदार्थांचा ) किंवा फक्त अप्रकृतांचा म्हणजे प्रकृततुल्य वस्तूंचा—साधारण धर्म केवळ एकदाच कथन केलेला असतो तेव्हां **तुल्ययोगिता** अलंकार होतो. जसें:—

**( १ ) टाकी प्रिये रोष अशी प्रियाची ।**
**सस्नेह वाणी परिसोनि साची ॥**

**गळे किं नेत्रांतुनि वारिधारा ।**
**मनांतुनी मान तसाचि सारा ॥**

गंगाधरशास्त्री.

या ठिकाणीं मानिनीचें वर्णन असून प्रकृत अथवा वर्णनीय पदार्थ जो 'मान' आणि 'अश्रु' यांचा साधारण धर्म 'गळे' या क्रियेनें एकवारच सांगितलेला आहे.

**( २ ) हरिणनयनेचें बाल्य लया जातां ।**
**यौवनाचा संचार अंगिं होतां ॥**
**मधुर गमती अतिशयित मानसास ।**
**तिचीं वचनें गति तेविं ते विलास ॥**

लक्ष्मणशास्त्री लेले.

या ठिकाणीं कोणा एका स्त्रीच्या यौवनाचें वर्णन असून वर्णनीय पदार्थ जे "वाणी, गमन व विभ्रम" ह्यांचा सामान्य धर्म "माधुर्य" हा एकदांच सांगितलेला आहे. वरील दोन्हीं उदाहरणांत प्रकृतांचें साधर्म्य एकवार सांगितलेलें आहे. पुढील पद्यांत अप्रकृतांचेंच साधर्म्य कथन केलें आहे.

**(१) ऐसा श्रीमद्गुरुनें केला आम्हांवरी प्रसाद बुधा ॥**
**तन्मधुरता न जननी-स्तन्यास न कामधेनुच्याहि दुधा ॥**

मोरोपंत.

या ठिकाणीं 'प्रसाद' वर्णनीय वस्तु असून मातेचें दूध व कामधेनूचें दूध ह्या अप्रकृतांच्या साधारण धर्माचा म्हणजे मधुरपणाचा उल्लेख एकदाच केलेला आहे. तसेंच,

**(२) बहु लाजवीत होतों करि-केसरि-कीर-केकि-हरिणा मी ॥**
**हांसत कर्म करावें भोगावें रडत तेंचि परिणामीं ॥**

मोरोपंत.

येथें 'सीता' प्रकृत असून करि, केसरी वगैरे अप्रकृत पदार्थ आहेत. या अप्रकृतामध्यें असलेल्या "हीनगुणता" या सामान्य धर्माचा 'लाजवीत होतों' या शब्दांनीं उल्लेख केलेला आहे.

## (२०) उदात्त.

[ उत्कर्षेण आदीयते-गृह्यते=अतिशय समृद्धीचें वर्णन ].

एकाद्या वस्तूच्या समृद्धीच्या वर्णनावरून प्रकृताच्या समृद्ध्यातिशयाचा जेव्हां बोध होतो तेव्हां **उदात्त** अलंकार होतो. उदाहरणें:—

**(१) द्वारका विभव तो मुनि लक्षी । माडियांसि गणना नवलक्षीं ।**
**उच्च, शुभ्र, रजका स्फटिकाच्या । चांदण्या रजनिच्या घटिकाच्या ॥१॥**
**भूमि त्या नगरिं रत्नमणींची । कोंदणें जडित इंद्रमणींचीं ।**
**वाटते गजरथाश्वनृपाची । हेम दिव्य वरि सुंदर पाची ॥ २ ॥**
**हेमरत्नरचिता पडशाळा । सत्सभा बहु अशान्ति विशाळा ।**
**पंक्ति रत्नमय हाट-वस्त्यांची । दीप्ति रातिस दिसे दिवस्यांची ॥ ३ ॥**

वामन.

वरील वर्णनावरून द्वारका किती संपन्न होती हें दिसतें !

**(२) आहे सुंदर तळेंहि तेथें लहानसें ज्यामाजी ।**
**नित्य शोभती बहुत फुलोनी सुवर्णकमळें ताजीं ॥ १ ॥**
**पाचेच्या पायऱ्या सभोंतीं असति ज्यांत उतराया ।**
**जयांत नेमस्तचि जळ असतें क्रीडा स्त्रीस कराया ॥ २ ॥**
**त्याच तळयाच्या कांठीं आहे क्रीडापर्वत, ज्याचें ।**
**नीलमण्याचें चमके सुंदर उंच शिखर तें साचें ॥ ३ ॥**
**ठायीं ठायीं फुलें सुटोनि वेण्यांतुनि पडलेलीं ।**
**कोठें कोठें सुवर्ण कमलें कर्णींचीं गळलेलीं ॥ ४ ॥**
**तशीं विखरलेलीं मोतींही, तुटुनि गळयांतील हार ।**
**दाविति जेथें रात्रीं झाला तरुणींचा संचार ॥ ५ ॥**

कृष्णशास्त्री चिपळुणकर.

वरील वर्णनावरूनही अलकापुरीचें संपदातिशयाचें ज्ञान होतें.

फक्त एकाच पदार्थाचा समृद्ध्यतिशय जेथें वर्णिला तेथें **उदात्त** अलंकार होत नाहीं. शितावरून भाताची परीक्षा या न्यायानें एका भागाच्या वर्णनावरून जेथें सर्व वस्तूंच्यां वर्णनाचें ज्ञान होतें तेथेंच हा अलंकार होतो.

वर्णनीय पदार्थांचा उत्कर्ष दाखविण्याकरितां एकाद्या महापुरुषाचें जेथें अंगत्वें-करून वर्णन असतें तेथें देखील **उदात्त** अलंकार होतो. उदाहरण:—

**(१) श्रीकाशि ! तुझें दर्शन सर्व सुखाधिक म्हणे सदाशिव तो ॥**
**स्वशिरोमणि किरणांहीं सुरगण ज्याच्या पदा सदा शिवतो ॥१॥**

मोरोपंत.

देव देखील सदाशिवाच्या पायांवर आपलीं मस्तकें ठेवितात, यावरून सदाशिवाचें महत्व वर्णिलें आहे; व असा सदाशिवही काशीक्षेत्राचें दर्शन सर्व सुखापेक्षां जास्त आहे असें म्हणतो. ह्यावरून काशीक्षेत्राचें माहात्म्य फार मोठें आहे असे वर्णिलें आहे. येथें सदाशिवास गौणत्व दिलेलें आहे.

**( २ ) जळ घाली रुक्मिणी पदावरि मणि-कनकाच्या पात्रें ।**
**प्रक्षालन केलें श्रीनाथें सुखरोमांचित-गात्रें ॥ १ ॥**
**शंभुशिरीं ज्याचें चरणोदक वेद जयाचे बंदी ।**
**तो तीर्थरूप तीर्थांचाही मुनिपादोदक वंदी ॥ २ ॥**

मोरोपंत.

शंकराच्या शिरावर विष्णूच्या पायाचें जल पडतें ( गंगा विष्णुपदा-पासून निघाली असून तिला शिवानें आपल्या जटेच्या ठायीं धारण केलें ) म्हणून विष्णु शिवापेक्षां पावित्र्यादिकांमुळें अधिक वंद्य; पण तोच विष्णु-रूपी कृष्ण सुदामदेवाचे पाय धुता झाला व लक्ष्मीरूपी रुक्मिणी सुवर्ण मणि-पात्रानें पाणी घालती झाली असे वर्णन करून श्रीकृष्णरुक्मिणी यांस येथें गौण ( कमी ) लेखलें आहे.

---

## ( २१ ) विरोधाभास किंवा विरोध.

जेव्हां वस्तूंच्या गुण क्रियादिकांमध्यें वास्तविक विरोध नसून विरोध आहे असें वर्णन केलेलें असतें व जेव्हां अशा विरोधाचा परिहार करितां येतो तेव्हां विरोधाभास अलंकार होतो. यालाच विरोध असेंही म्हणतात.

**( १ ) जगांत असुनी सखे तुजविणें जगावेगळा**
**सजीव असुनी गमे सकल लोपली चित्कळा ।**
**स्वतंत्र असुनी कसा जखडलोंचि दासासम**
**प्रकाश असुनी, दिसें मज समस्त झालें तम ॥**

बाळकृष्ण अनंत भिडे.

येथें बाह्यतः विरोधी वचनें असून स्त्रीमरणामुळेंच अशी स्थिति झाली असा त्याचा परिहार होतो.

(२) आहे दरिद्र परि कारण संपदांचें
रूपें भयंकर तरी शिव नाम त्याचें ।
त्रैलोक्यनाथ बसतो जरि तो स्मशानीं
जाणे महेश्वर यथार्थ असा न कोणी ॥

कुमारसंभव.

ही उमेची जटिलरूपधारी शिवाप्रत उक्ति आहे. पार्वतीस हा शिवच आहे हें माहित नव्हतें. पार्वतीच्या सखीनें तिचें मन शिवावर बसलें आहे असें सांगितल्यानंतर जटिलानें शिव त्रिनेत्र म्हणून कुरूप, दिगंबर म्हणून भिकारी अशा प्रकारें तुला वरण्यास अयोग्य आहे, असें सांगितल्यावर पार्वतीनें वरील उत्तर त्यास दिलें आहे. येथें विरोधाचा आभास कसा होतो व त्याचा परिहार कसा करावयाचा हें स्पष्टच आहे.

(३) चोरी करी गोपगृहीं हरी हा ।
गोपस्त्रियांचें मन मोहरी हा ॥
जो जारकर्मी अतिधीट साच ।
मी ब्रह्मचारीहि वदे तसाच ॥

नरहरि कवि.

कृष्ण जनांला ' लौकिक भाव ' दाखवूनही ' योगीश्वर ' होता असा वरील पद्याचा परिहार करितां येतो.

(४) ज्या पाहतां थरथरे तनु घर्म येई ।
ठेवूं बघे उचललें पद अन्य ठायीं ॥
मार्गी नगें अडवितां भ्रमली नदीशी ।
ती पार्वती न चळली ठरली न तैसी ॥

कुमारसंभव.

जटिलरूपधारी शिवानें पार्वती आपल्यावर अनुरक्त आहे असें पाहून आपलें खरें रूप प्रकट केलें. त्यावेळीं रतिभाव प्रकट होऊन तिला लज्जाही वाटली. येथें ' चळली न, ठरली न ' ह्या दोन्ही क्रिया वरील मनोवृत्तीमुळें झाल्या असा त्या विरोधाचा परिहार करितां येतो.

(५) वज्रापेक्षांहि कठिणें, पुष्पाहूनि मृदू अशीं ॥
लोकोत्तरांचीं हृदयें कोणा जाणवतील तीं ॥ १ ॥

परशुरामभाऊ गोडबोले.

येथें लोकोत्तर पुरुषांचीं मनें अति कठिण व अति मृदु असतात असा बाह्यात्कारें विरोध दाखविला आहे. परंतु प्रसंगविशेषींच त्यांचें अंतःकरण वज्रापेक्षां कठीण होतें अथवा पुष्पापेक्षां मृदु होतें अशा रीतीनें वरील विरोधाचा परिहार करितां येतो.

**अथवा,**

**( ६ ) कुवलयदलस्निग्धैं अंगें करी नयनोत्सवा ॥**
**सतत जरि हा पाहों आला तथापि गमे नवा ॥**
**विकल दिसतीं याचीं अंगें पहा कृश पांढरीं ॥**
**कठिण पडतें जाणायातें, रुचे नयनां तरी ॥ १ ॥**

परशुरामपंत गोडबोले.

येथें प्रथमार्धांत राम जरी नेहमीं पाहण्यांत येतो तरी नवीन म्हणजे अपरिचित असा वाटतो असा विरोध दिसतो. परंतु रामास पाहून बराच काल लोटल्यामुळें असे वाटतें असा वरील विरोधाचा परिहार करितां येतो. द्वितीयार्धांतही विरोधाभास अलंकार आहे. साधारणपणें पाहिलें तर फिक्कट, कृश व निरुत्साही मनुष्याकडे पाहणें फारसें कोणास आवडत नाहीं. परंतु राम निस्तेज, निरुत्साही व कृश असूनही त्याचेकडे पाहण्यास आनंद वाटतो असा येथें विरोध दाखविला आहे. परंतु रामाचे ठायीं प्रेम व त्याचें शुद्ध व पवित्र चारित्र्य यांमुळें तो रमणीय वाटतो असा वरील विरोधाचा परिहार केला पाहिजे.

---

## ( २२ ) विभावना

[ विभावना=( अप्रसिद्ध पण चतुर पुरुषास समजेल
अशा ) कारणाची कल्पना ].

सुप्रसिद्ध कारणावांचून कार्याची उत्पत्ति झाली असें जेथें वर्णन असतें तेथें **विभावना** नामक अलंकार होतो. जसें:—

**( १ ) न ताप निवला, तृषा न शमली, रजें माखलें ।**
**शरीर, अजुनी नसे कमल एकही चाखलें ॥**
**न सोंड उचलोनियां कमलिनी गजें स्पर्शिली ।**
**हकाक मधुपीं. पहा, अधिंच काय आरंभिली ॥ १ ॥**

कृ. शा. चिपळुणकर.

येथें भ्रमरांनीं ओरड करण्याचें वास्तविक कारण नसूनही ओरड चालविली आहे म्हणजे कारणाशिवाय कार्योत्पत्ति झाली असें वर्णिलें आहे. येथें ओरडीचें खरें कारण दिलेलें नाहीं म्हणून येथें **अनुक्त-निमित्ता विभावना** आहे.

**( २ ) श्रीकृष्णा गोपींतें भुलविशि तूं वाजवूनि मुरलीला ॥**
**उरली लाज न लेशहि, परि गाती श्रीशिवादि सुर लीला ॥१॥**

मोरोपंत.

येथें तुझ्या सारख्या निर्लज्जाचें गुणवर्णन करणें योग्य नसूनही शिवासारखे देव देखील तुझा स्तव करितात असें वर्णन आहे.

**( ३ ) लता नच मुळीं तिला दुखविती, तरी रुष्टली ।**
**न दुष्ट मधुपीं, तरी दचकुनी मनीं कष्टली ॥**
**न पद्मलहरीहता, तरि वरीच संमोह ते ।**
**सख्या व्यजन-वायुनें सुखविती, तरी त्रासते ॥**

भाषांतर.

येथें ही कारणें दिलेलीं नाहींत.

कधीं कधीं कारण उक्त असतें. जसें:—

**( १ ) जधिपासुनि लीलागृह यौवन हें शशिमुखींत संचरतें ॥**
**तधि-पासुनि तरुणांचें दहनाविण कठिण हृदय तें जळतें ॥**

गंगाधरशास्त्री.

येथें जाळण्याचें प्रसिद्ध कारण जो अग्नि त्याच्याशिवाय दाह होतो म्हणजे कार्योत्पत्ति होते म्हणून ही विभावना होय. परंतु दाह होण्याचें खरें कारण जें ‘ कामिनीचें यौवन ’ त्याचा स्पष्ट निर्देश केल्यामुळें ही **उक्त-निमित्ता विभावना** होय.

---

## ( २३ ) विशेषोक्ति.

[ विशेष म्हणजे सहृदय वाचकास आकलन करितां येईल अशा नवीन प्रकारच्या कारणाची उक्ति ].

सुप्रसिद्ध कारणांची सामग्री पुष्कळ असूनही कार्य उत्पन्न होत नाहीं असें जेथें वर्णन असतें तेथें **विशेषोक्ति** अलंकार होतो. जसें:—

( १ ) व्याघ्री-परी भय करीत उभी जरा रे ॥
देहासि रोग करिती रिपुतुल्य मारे ॥
आयुष्य भिन्न-घट नीर सरे तसें हें ॥
पापें तथापि जन आचरतात पाहें ॥ १ ॥

वामन.

या ठिकाणीं निर्वेद उत्पन्न होण्यास अनेक कारणें असूनही निर्वेद उत्पन्न झाला नाहीं असें दाखविलें आहे.

अथवा,

( २ ) झालें स्नान घनोदकें, वसति ही केली महा काननीं ॥
ऊटी शीतचि चर्चिली, स्मर सदा आराधिला आसनीं ॥
केलें जागरणव्रतासि रजनीं, लज्जा दिली दक्षिणा ॥
ऐसें मीं तप साधिलें फल नव्हे हें प्रोक्त मध्यक्षणा ॥ १ ॥

विठ्ठल कवि.

येथें कामाचें आराधन करण्यासाठीं पुष्कळ उपाय केले तरी कार्योत्पत्ति झाली नाहीं असें दाखविलें आहे.

( ३ ) भिक्षाटणें अशन तें क्षण एक वार
शय्या महीवरि जया न कलत्र पोर ।
कंथा जया वसन कीं शतखंड तें ही
टाकीच ना तदपि तो विषयांस देही ॥

वामन.

विषय टाकण्यास अनेक कारणें असूनही मनुष्य विषयलंपटच असतो असें येथें वर्णिलें आहे.

( ४ ) रत्नाकराचा सुत शांत दान्त
श्रीचा असे बंधु कलानियुक्त ।
सुधा-करांनीं सुखवी अनेकां
अशा सवें पद्मिनि ! रुष्ट तूं कां ? ॥

पांडुरंगशास्त्री पारखी.

येथें चांगल्या कुळांत जन्म, लक्ष्मीशीं बंधुत्वाचें नातें व स्वतः परोपकारीं रत असा चंद्र प्रत्येकीस आवडण्यासारखा असून पद्मिनीला मात्र तो रुचत नाहीं; म्हणजे कारण सामग्री पुष्कळ असूनही फलप्राप्ति नाहीं असें येथें वर्णन आहे.

## ( २४ ) असंगति.

दोन वस्तूंमध्यें कार्यकारणभाव असून त्या दोन वस्तु एकाच काळी निरनिराळ्या ठिकाणीं कार्यकारणसंबंधानें असतात असें जेथें वर्णन केलेलें असतें तेथें **असंगति** अलंकार होतो. जसेः—

**( १ ) रात्रीं जागर जाहला तुज, असे नेत्रीं मला शोणिमा ।**
**तूं प्यालास मधूस तें करितसे माझ्या मनीं विभ्रमा ॥**
**भ्राम्यद्भृंग घनीं निकुंज-भवनीं तूं पावशी श्री-फळा ।**
**मारी मार शरीं करोनि मजला मी भोगितें त्या फळा ॥**

विठ्ठल कवि.

येथें तुला जागरण पण माझे डोळे लाल, तूं मद्य प्यालास पण त्याचा परिणाम माझ्या मनावर; याप्रमाणें एकेच काळीं कारण एके ठायीं तर कार्य दुसरे ठिकाणीं असें वर्णन असल्यामुळें हा **असंगति** अलंकार आहे.

**( २ ) ती बाला परि अप्रगल्भ मनिं मी, ती स्त्रीहि मी कातर**
**घेती उन्नति ते पयोधर तिचे, कां खिन्न हें अंतर ।**
**वाहे घोर नितंबभार जरि ती, जाण्या न शक्ति मला**
**अन्याचे जरि दोष हे अपटु मी झालों असूनी भला ॥**

भाषांतर.

येथेंही ती बाला असल्यामुळें अप्रगल्भत्व तिच्याच ठायीं असावयाचें; पण तसें नसून तें माझ्या ठिकाणीं आहे. तसेंच ती स्त्री म्हणून तिच्या ठायीं भीति असावयास पाहिजे; पण तसे नसतां मीच भीतियुक्त आहें. अशा प्रकारें कार्यकारणभाव विचित्र असल्यामुळें येथें **असंगति** अलंकार झाला आहे.

**( ३ ) वाटे विचित्र किति ही खल भुजगाची तऱ्हा वधायाची ॥**
**एका डसुनी कर्णीं करितो कीं प्राणहानि अन्याची ॥ १ ॥**

भाषांतर.

साप चावणें हें कारण व प्राण जाणें हें कार्य होय. ज्यास साप चावतो तोच मनुष्य मरतो असा नेहमींचा क्रम असून या ठिकाणीं हेतु एके ठिकाणीं व कार्य भलतेंच ठिकाणीं असें वर्णन आहे.

अथवा,

( ४ ) ती अतिसुकुमारांगी शोभा हरिते प्रफुल्ल कुसुमांची ॥
हा मदन बाण हाणी, भेदाया मृदु-मनेंहि तरुणांचीं ॥ १ ॥

भाषांतर.

या ठिकाणीं स्त्रीनें कुसुमांची शोभा हरण करण्याचा अपराध केला, म्हणून मदन तरुणांस शिक्षा करितो असें वर्णन आहे.

---

## ( २५ ) विषम.

जेथें अतिवैधर्म्यामुळें दोन वस्तूंमध्यें संबंध जुळणें अशक्य आहे असें वर्णन असतें तेथें, अथवा कर्त्याच्या मनांत जें कांहीं करावयाचें आहे तें घडून न येतां उलट-त्याच्या अगदीं विरुद्ध क्रिया घडली असें जेथें वर्णन असतें तेथें, अथवा कार्याचे जे गुण व क्रिया असतात त्यांच्यापेक्षां कारणाचे गुण व क्रिया क्रमानें जेथें अगदीं उलट असतात तेथें **विषम** अलंकार होतो. क्रमानें उदाहरणें:—

( १ ) कोठें दरिद्र हा मी ! कोठें लक्ष्मीनिवास तो स्वामी ।
आलिंगिलें भुजांहीं प्रेमें वक्षस्थळीं रमाधामीं ॥

मोरोपंत.

येथें अतिशय दरिद्री सुदामदेव व सर्वसंपन्न श्रीकृष्ण या दोघांची आश्लेषरूपी क्रिया घडणें असंभवनीय आहे असा 'कोठें' 'कोठें' या शब्दांनीं अर्थ स्पष्ट केलेला आहे.

( २ ) ज्या इष्ट वाटति मनीं तुज देवता त्या
आहेत सर्व सदनीं कर तुष्ट तूं त्या
कोठें तुझें मृदु शरीर कुठें तपें तीं
कैशीं मुली ! सहन गे करशील तूं तीं ॥

कुमारसंभव.

येथें उमेचें मृदु शरीर व तिनें आचरलेलीं उग्र तपें यांच्यामध्यें अतिशय वैधर्म्य आहे असें दाखविलें आहे.

विषमाचा पहिला प्रकार व वाक्यार्थ निदर्शना यांच्यामध्यें 'कोठें' 'कोठें' या अव्ययांच्या जोडीच्या उपयोगामुळें इतकें साम्य दिसून येतें कीं, कित्येक वेळां ह्या दोन अलंकारांमधील फरक ओळखणें कठीण पडतें. निदर्शनेमध्यें अशक्य

संबंध दाखवून शेवटीं उपमेमध्यें पर्यवसान होतें. जसें:—" जो तुझ्या पायांच्या नखांस आळत्याचा रंग लावून लाल करावयास पाहतो तो चंद्राला चंदनाच्या लेपानें पांढरा करूं पाहतो." येथें पहिली गोष्ट करणें म्हणजे दुसरी करण्यासारखेंच अशक्य आहे असें दर्शविलें आहे. पहिल्या विधानास दुसरें विधान उदाहरणासारखें आहे. तसेंच—

**रवीचा महाकीर्तिमान् वंश कोठें**
**तशी ही मदीया जडा बुद्धि कोठें।**
**तराया महा दुस्तरा सागरातें**
**प्लवें इच्छितो ! केवढा मान मातें ॥**

गणेशशास्त्री लेले.

येथें **निदर्शना** अलंकार आहे. परंतु—

(३) **विद्रूप नेत्र-वपु जन्म कळे न त्याचें।**
**ठावें दिगंबरपणें धनही तयाचें ॥**

× × × × ×

**काढीं मनोरथ अनिष्ट मनांतुनी तूं।**
**कोठें तसा शिव, कुठें शुभलक्षणा तूं ॥**

कुमारसंभव.

येथें शिव व पार्वती यांच्यामध्यें होणारा संबंध अनुरूप नाहीं असें वर्णन असून दोन्ही वाक्यार्थांचें पर्यवसान उपमेमध्यें झालेलें नाहीं म्हणून हा **विषम अलंकार** आहे.

विषम अलंकारांत दोन वस्तूंमध्यें जो संबंध दाखविलेला असतो तो अनुरूप किंवा योग्य नाहीं एवढेंच सांगितलेलें असतें; निदर्शनेमध्यें तो संबंध अशक्य किंवा अत्यंत कठीण असतो, असें वर्णन दोन वाक्यांत केलेलें असून त्याचें उपमेमध्यें पर्यवसान होतें. विषम अलंकारांत तसें नसतें.

(४) **जेव्हां लोक समग्र आपअपुले कार्यांमध्यें गुंतती।**
**तेव्हां चंचुपुटेंचि पंजरकपाटा-लागिं मी या रितीं ॥**
**तोडोनी वनिं जाइन, स्वमनिं या कामामृता पीतसे।**
**रावा, ते क्षणिं पंजरीं मुसळसा काळा फणी जातसे ॥ १ ॥**

गंगाधरशास्त्री.

येथें रावा पिंजऱ्यांतून सुटून जाण्याची इच्छा करीत असतांना तसें न घडतां उलट सर्पाच्या तावडींत सांपडून गतप्राण झाला असे वर्णन आहे. ह्याच प्रकाराला **विपादन** असें नांव देऊन त्यास कित्येक आलंकारिक वेगळा अलंकार मानितात. तसेंचः—

**(५) घालूं पाहसि दंष्ट्रा उपडाया अहिमुखांत आंगोळी ॥**
**ऐसें साहस करितां होइल तनुची क्षणांत रांगोळी ॥ १ ॥**

मोरोपंत.

येथें कर्त्याच्या मनांत जें कांहीं करावयाचें आहे त्याच्या अगदीं उलट कार्यसिद्धि होईल असे वर्णिलें आहे.

**( ६ ) होतां स्पर्श कराचा खड्ग तुझा हा तमालनील रणीं ॥**
**शरदिंदु–पांडु यश हें प्रसवे; गमते विचित्र ही करणी ॥ १ ॥**

भाषांतर.

येथें तमालनील तरवारीपासून शरदिंदुपांडु यश उत्पन्न झालें असें वर्णन आहे. कारणाचा रंग काळा त्यापासून कार्य पांढऱ्या रंगाचें झालें आहे. कारण व कार्य यांचे गुण परस्परविरुद्ध असल्यामुळें हा **विषम** अलंकार आहे.

' अथवा,

**( ७ ) गोरा नंद, यशोदा गोरी, वसुदेव, देवकी, गोरा ॥**
**तत्सुत काळा कां तूं? भोळे जन ठकविशी हृदयचोरा ॥ १ ॥**

मोरोपंत.

येथें कारणांचा रंग पांढरा असून कार्याचा रंग काळा आहे असें वर्णिलें आहे.

**(८) कुवलय-दल-नयने! गे! देशी आनंद तूं मला बहुसा ॥**
**त्वज्जन्य विरह परि हा तापद वाटे मला सदा रविसा ॥ १ ॥**

भाषांतर.

येथें कारण जी नायका तिच्यापासून उत्पन्न होणारा आनंद व कार्य जी विरहावस्था तिच्यापासून उत्पन्न होणारा ताप ह्या दोन्ही कार्य–कारणांच्या क्रिया परस्परविरुद्ध आहेत.

---

## (२६) विशेष.

**जेथें प्रसिद्ध** आधाराशिवाय आधेय राहतें असें वर्णन असतें तेथें, **अथवा एकच वस्तु एकाच स्वरूपानें अनेक** ठिकाणीं **एकदम** दिसते तेथें, **अथवा एक** कार्य करीत असतां भलत्याच अशक्य अथवा असंभवनीय कार्याची सिद्धि जेथें होते तेथें **विशेष** अलंकार होतो. क्रमानें उदाहरणें:—

**( १ ) स्वर्गीं निवास ज्यांचा, गुणगण ज्यांच्यांत नित्य करि वास ॥**
**वाणी तया कवींची रमवी चित्तास; वंद्य ते खास ॥ १ ॥**

भाषांतर.

येथें ‘ कवि ’ आधार व ‘ वाणी ’ आधेय आहे. परंतु कवि स्वर्गी असल्यामुळें त्याच्या वाणीस आतां आधार नसूनही ती लोकांच्या चित्तास रमविते असे वर्णन आहे.

**( २ ) नित्यचि ती तव वसते नेत्रीं वचनीं तशीच हृदयांत ॥**
**मी दुर्दैवी ! मजला कोठें थारा असे शरीरांत ॥ १ ॥**

भाषांतर.

येथें एक स्त्री एकाच रूपानें एकदम नेत्र, वचन व हृदय यांचेठायीं वास करिते असें वर्णन आहे.

**( ३ ) अखिल परिमलांनीं वानिलें फार तूंतें ।**
**म्हणुनि बहु न दावीं गर्व कस्तूरि ! मातें ॥**
**गिरिकुहरिं लपे जो होउनी फार दीन ।**
**करिशि निज पिता तो सौरभें प्राणहीन ॥**

भाषांतर.

येथें कस्तूरीमृगाचा गुणच त्याच्या घातास कारण होतो असें वर्णिलें आहे.

**( ४ ) चोरें पिंडिवरीच देउनि पदें तो चांदवा सोडिला ॥**
**भक्तें देह समर्पिला, म्हणुनियां गौरीपती तुष्टला ॥**
**कैलासाप्रति तस्करा मग शिवें नेलेंचि, भोळा असा ॥**
**त्याचें चिंतन हो करा निजमुखें पाहों तरे ना कसा ॥ १ ॥**

नारायणसुत.

येथें चोर चोरी करण्याचा प्रयत्न करीत असतां त्याला भलत्याच असंभवनीय अशा अर्थाची म्हणजे कैलासाची प्राप्ति झाली असें वर्णन आहे.

अथवा,

( ५ ) पत्नी सखी सचिवही मम तूं मनोज्ञ ॥
शिष्या मदीय प्रिय तूं ललितांत सुज्ञ ॥
ओढोनि निर्दय यमें तुज आजि नेतां ॥
त्यानें न काय हरिलें मम ? सांग आतां ॥ १ ॥

भाषांतर.

या ठिकाणीं तुला यमानें नेल्यामुळें माझी पत्नी, सखी, सचिव व शिष्या हीं सर्व नाहींशीं झालीं असें ध्वनित केलें आहे. येथें एक गोष्ट घडल्यामुळें दुसऱ्याही अशक्य गोष्टी घडल्या असें वर्णिलें आहे.

गुणाचें दोषत्वेंकरून अथवा दोषाचें गुणत्वेंकरून जेथें वर्णन असतें तेथेंही **विशेष** अलंकारच होतो. ह्यास कित्येक आलंकारिक **लेश** असेंही म्हणतात.

जसें:—

( १ ) तुझी वाणी कोणी म्हणति गुण हा अद्भुत असे ॥
मला वाटे मोठा तुजजवळि हा दोषाचि वसे ॥
शुका, तीच्या योगें सतत पिंजऱ्यामाजि पडशी ॥
गड्या ! स्वातंत्र्याचीं अनुपम सुखें सर्व मुकशी ॥ १ ॥

कृ. चिपळुणकर.

शुकाची वाणी हा गुण असून त्याचेमुळें तो पिंजऱ्यांत पडतो म्हणून तो गुण दोषच आहे अशी कल्पना येथें केली आहे.

अथवा,

( २ ) मृगमदेंचि मरे मृग, कर्दळी ।
निपजतां तिस कर्पुर निर्दळी ॥
फणि मणीस्तव, गो निज चामरें ॥
मिरवि भूषण, यास्तव तो मरे ॥ १ ॥

श्यामा कवि.

या पद्यांतही गुणांचे ठायीं दोषत्व वर्णिलें आहे.

कोठें कोठें दोषाचें गुणत्वेंकरून वर्णन असतें. जसें—

**( ३ ) नैर्गुण्य श्लाघ्य असे, गुणसंघाला असो किं धिक्कार ॥**
**वनिं तरु इतरचि शोभति, तोडिति चंदन तरूंसि जन फार ॥१॥**

भाषांतर.

येथें सुवास नसल्यामुळें इतर वृक्ष वनांत जशेच्या तसेच राहतात; परंतु चंदनास सुवास असल्यामुळें लोक त्यास तोडण्यास प्रवृत्त होतात असें वर्णन आहे.

---

## ( २७ ) सामान्य.

प्रकृत आणि अप्रकृत यांच्यामध्यें एका विवक्षित गुणामध्यें साम्य असून तें गुणसाम्य दाखविण्याकरितां जेव्हां प्रकृत व अप्रकृत यांचें एकात्म्य आहे असें वर्णिलें असतें तेव्हां **सामान्य** अलंकार होतो.

जसें:—

**( १ ) रत्नस्तंभीं पडली प्रतिबिंबांची चहूंकडे माला ॥**
**तेव्हां अंगद अमुकचि रावण ऐसें न जाणता झाला ॥ १ ॥**

मोरोपंत.

प्रतिबिंबांच्या मालेंत अंगद व रावण या दोघांची कांति सारखी असल्यामुळें ते एकरूप होऊन गेले असें येथें दाखविलें आहे.

**( २ ) वेणींत घालुनि फुलें मधुमालतीचीं**
**अंगासि लाउनि उटी हरिचंदनाची ।**
**नेसूनि शुभ्रपटही अभिसारिका या**
**ज्योत्स्नेंत निर्भयपणें निघती रमाया ॥**

भाषांतर.

येथें अभिसारिका व ज्योत्स्ना यांच्यामध्यें शुभ्रपणा हा सामान्य गुण असल्यामुळें अभिसारिका चांदण्या रात्रींत फिरत असतांही दिसत नव्हत्या असे वर्णिलें आहे.

**( ३ ) राधेच्या तनुची दिसे रुचिरता वेत्रत्वचेच्या-परी**
**कर्णांतील तिच्या सुचंपक-सुमें येताति गालांवरी ।**

**त्यांच्यांतील यथेच्छ मत्त अलि ते घेती जरी स्वाद ना**
**चाफ्यांचीं श्रवणीं फुलें विकसतीं होई कशी भावना ? ॥**

भाषांतर.

फुलांवर जर भ्रमर नसते तर राधेच्या कानावर चाफ्याचीं फुलें आहेत हें समजलें नसतें असें वर्णन करून दोघांच्याही वर्णांचें एकात्म्य ध्वनित केलें आहे.

---

## ( २८ ) मीलित.

साधारण लक्षणांनीं युक्त अशा दोन वस्तूंपैकीं जेव्हां एक वस्तु आपल्या स्वाभाविक प्राबल्यानें दुसऱ्या वस्तूस अगदीं लपवून टाकिते तेव्हां **मीलित** नामक अलंकार होतो. याचे दोन प्रकार आहेत—( १ ) स्वाभाविक चिन्हामुळें दुसरी वस्तु लपली जाणें, अथवा ( २ ) आगंतुक चिन्हांनीं ती लपली असें दाखविणें. क्रमानें उदाहरणें:—

**( १ ) सुरम्य चल नेत्र ते, मधुर गूढही भाषण ॥**
**विलास-युत मंद तें गमन, कांतही आनन ॥**
**असे सहज यौवन प्रकट भाव होती तिचे ॥**
**मदोदय जरी असे तरि पथीं न ये दृष्टिचे ॥ १ ॥**

भाषांतर.

नेत्राची तरलता, मधुर भाषण इत्यादि लक्षणें यौवनावस्थेंत स्त्रीचेठायीं स्वाभाविकपणें असतात. मधुपान केलेल्या मनुष्याचेठायीं देखील हींच लक्षणें स्पष्ट दिसतात. स्त्रीनें मदिरा सेवन केली असून मधुमदाचीं सर्व लक्षणें यौवनमदाच्या स्वाभाविक लक्षणांनीं लपवून टाकिलीं आहेत असें येथें वर्णन आहे.

**( २ ) जे कंदरीं वसति नित्य हिमाचलाच्या ॥**
**येणार तूं म्हणुनि शंकित धी जयांच्या ॥**
**अंगें सकंप पुलकान्वित हीं जयांचीं ॥**
**जाणे न सुज्ञवर भीति कधीं तयांची ॥ १ ॥**

भाषांतर.

वास्तविक पाहतां कंप सुटणें व शरीरावर रोमांच उभे राहाणें या दोन्ही गोष्टी भयापासून उत्पन्न झाल्या असतांही हिमाचलावरील शैत्यामुळें उत्पन्न

झालेल्या त्याच आगंतुक भावामुळें खरीं भीतीचीं लक्षणें झांकलीं गेलीं असें येथें दाखविलें आहे.

(३) उडुपा उडुसें धर्मौदार्यालागोनि अभ्र मुरडे हो ॥
सावित्रीच्या सुयशीं न दिसे पति म्हणुनि अभ्रमु रडे हो ॥१॥

मोरोपंत.

सावित्रीच्या यशानें जग अगदीं व्यापून गेल्यामुळें अभ्रमूचा नवरा ऐरावत हा शुभ्र असल्यामुळें दिसेनासा झाला असें येथें वर्णन आहे.

---

## (२९) प्रत्यनीक.

[ प्रति=प्रतिनिधि; अनीक=सैन्य; सैन्य-प्रतिनिधि. ]

जेव्हां कोणी आपल्या प्रतिपक्षाचा सूड घेण्यास असमर्थ असल्यामुळें अथवा त्याची बरोबरी करण्यास असमर्थ असल्यामुळें चिडून जाऊन अथवा लज्जित होऊन प्रतिपक्षांशीं संबंध असलेल्या कोणत्याही पदार्थास त्रास देऊं लागतो असें वर्णन असतें तेव्हां **प्रत्यनीक** अलंकार होतो.

उदाहरणः—

(१) प्रखर तापें रवि पीडितो गजास ॥
ताप हरण्यास्तव जाइ तो सरास ॥
धरुनि शुंडाग्रीं उपटि कमलिनीतें ॥
अहा! दुःखद तें रविस किती होतें ॥ १ ॥

भाषांतर.

सूर्याचा सूड घेण्यास गज असमर्थ असल्यामुळें सूर्याशीं निकट संबंध असलेल्या कमलिनीस उपटून गजानें सूड उगविला असें येथें वर्णिलें आहे.

अथवा,

(२) पंकज, विधु, हरि, गज, पिक, चमरीमृग, कीर जिंकिले होते ॥
त्वन्मित्रातें मातें, त्वद्वैरें पीडितील सखि! हो! ते ॥ १ ॥

मोरोपंत.

येथें पंकज, विधु, हरि, इत्यादि शब्द उपमानवाचक असून त्यांच्यायोगानें नेत्र, मुख, कटि इत्यादि सीतेच्या अवयवांचा बोध होतो. सीतेच्या अवयवांनीं वरील

पदार्थास खालीं मान घालावयास लाविलें म्हणून ते ‘ वड्याचें तेल वांग्यावर ’ या न्यायानें रामास पीडा करितील असे वरील पद्यांत वर्णन आहे.

**(३)करस्पर्शें मातंग पद्मिनीस । भ्रष्ट करिती पाहूनि तें अलीस ॥**
**राग येई स्वप्रिया-धर्षणानें । भेदण्या तच्छिर जाति जणू मानें॥१॥**

पांडुरंगशास्त्री पारखी.

येथें हत्ती आपल्या सोंडांनीं पद्मिनी उपटतात व अशा रीतीनें आपल्या प्रिय-करणींस भ्रष्ट करितात हें सहन न होऊन भ्रमर त्यांचीं मस्तकें फोडण्याकरितां जातात व सूड उगवतात असें वर्णिलें आहे.

---

## ( ३० ) सम.

दोन पदार्थांच्या योग्यतेनुरूप त्यांचा संबंध श्लाघ्य आहे असे जेथें वर्णन असतें तेथें **सम** अलंकार होतो. हा संबंध दोन चांगल्या अथवा दोन वाईट पदार्थांमध्यें असतो. क्रमानें उदाहरणें:—

**( १ ) ज्याचे पल्लव मंगलप्रद, शिणा छाया जयाची हरी ॥**
**गंधेंयुक्त फुलें फळेंहि असतीं ज्याचीं सुधेच्यापरी ॥**
**वाटे जो रमणीय भूषण वन-श्रीच्या मुखींचें, भला ॥**
**आम्रा त्या पिक सेवितां सम समा संयोग कीं जाहला ॥ १ ॥**

कृष्णशास्त्री चिपळूणकर.

येथें आम्र व पिक या दोन सद्वस्तूंचा योग आहे.

**( २ ) भासे विचित्र करणी मजला विधीची ।**
**दैवें घडे किं उचिता रचना तयाची ॥**
**निंबा ! तुझीं कटु फळें परिपक्क जीं का ।**
**चाखावया रसिकता दिलि काकलोका ॥ १ ॥**

भाषांतर.

येथें निंबाचीं कटु फळें खाण्यास काकच योग्य आहेत असा दोन असद्वस्तूंचा योग वर्णिला आहे.

---

## ( ३१ ) सहोक्ति.

एका पदापासून एकच अर्थ निघत असून त्याच्या बरोबरच योजिलेल्या ' सह ' शब्दाच्या सामर्थ्यामुळें दुसराही अर्थ जेथें निष्पन्न होतो तेथें **सहोक्ति** अलंकार होतो. ' सह ' या शब्दामध्यें सवें, स, सहित वगैरे समानार्थक शब्दांचा समावेश होतो. इतर अलंकारांप्रमाणें येथेंही ' हृदयाल्हादकत्व ' हा गुण असला पाहिजे. उदाहरणें:—

**( १ ) कालानलप्रभ शरासि गुणासि जोडी ।**
**आकर्ण चाप-लतिकेप्रति राम ओढी ॥**
**बालद्वयावरि कृपेसह शीघ्र सोडी ।**
**तों त्यास सानुजकुश स्मितवक्त्र तोडी ॥**

मोरोपंत.

रामानें कृपेसह बालद्वयावर बाण सोडिला असें येथें वर्णन आहे. क्षात्र धर्मास अनुसरून रामानें ह्यांच्यावर बाण तर सोडिलाच, परंतु वात्सल्यामुळें त्यांच्यावर कृपा देखील सोडिली म्हणजे कृपा केली असा दुसरा अर्थ ' सह ' या शब्दामुळें निष्पन्न झाला आहे.

**( २ ) शीतासवें शिशिर सोडुनि विश्व जाई ।**
**शौर्यें वसंत नृप सर्वहि राज्य घेई ॥**
**पर्णें गळून नव कोमल पल्लवांच्या ।**
**वृक्षीं ध्वजा फडकल्या मुधुराजयाच्या ॥**

विठ्ठल भगवंत लेंभे.

येथें शीताबरोबरच शिशिरऋतुही नाहींसा झाला असें वर्णन आहे म्हणून हें सहोक्ति अलंकाराचें उदाहरण आहे.

**( ३ ) बाल्यासवें गमन मंथरतेस गेलें**
**चित्तासवें अधरबिंब सुरक्त झालें ।**
**तैसा नितंब मृगबालक-लोचनेचा**
**कामासवें अखिल गौरव दावि साचा ॥**

लक्ष्मणशास्त्री लेले.

येथें बाल्य गेलें व त्याबरोबरच तिचें गमनही मंथरतेस (मंदत्वाप्रत) गेलें-ती मंदगति झाली-अशा प्रकारें एका विधानाबरोबरच दुसरींही विधानें चित्ताल्हादकारक रीतीनें केलीं आहेत. हा मालासहोक्ति अलंकार आहे.

**( ४ ) वांकवि वैरिमुखासह, कीर्तिसहहि त्या गुणास मग जोडी ।**
**ओढी सीता-चित्तासह, भृगु-जाहंकृती-सहित मोडी ॥**

चिंतामणि कवि.

प्रस्तुत पद्यांत सह या शब्दाचा अनेक पदांशीं अन्वय असल्यामुळें दुसरे अनेक अर्थ निष्पन्न झालेले आहेत; म्हणून हा **मालासहोक्ति** अलंकार आहे. रामानें शिवधनुष्य वांकविलें व त्याबरोबर शत्रूंच्या मानाही वांकविल्या. धनुष्याची दोरी जोडली व लागलीच कीर्तिही मिळविली, धनुष्य ओढल्याबरोबर सीतेचें अंतःकरणही आपल्याकडे ओढलें व तें मोडल्याबरोबर भार्गवाच्या अहंकाराचाही भंग झाला असें हृदयंगम वर्णन येथें आहे.

---

## ( ३२ ) विनोक्ति.

एकादी वस्तु दुसऱ्या वस्तूशिवाय ( विना ) शोभते अथवा शोभत नाहीं असें जेथें वर्णन असतें तेथें **विनोक्ति** अलंकार होतो. विना या शब्दामध्यें वीण, विणें, शिवाय, निर, वि, विकल इत्यादि शब्दांचा समावेश होतो.

हिचे दोन प्रकार आहेत—शोभना व अशोभना.

( अ ) **शोभनेचीं** उदाहरणें:—

**( १ ) पंकावांचुनि शोभे जलमय सर, दुर्जनाविना सुसभा ॥**
**कटु वर्णाविंण काव्यहि, विषयाविण साधुचित्त घे शोभा ॥**

गंगाधरशास्त्री.

या ठिकाणीं पंकावांचून तळें शोभतें, दुर्जनावांचून सभा शोभते इत्यादि वर्णनांत वाईट गोष्टी वर्ज केल्यामुळें त्या त्या वस्तु शोभतात असें दर्शविलें आहे.

**( २ ) वामेक्षणेविण असे जंव राजपुत्र ।**
**चातुर्य दाखवुनि चालवि राजसूत्र ॥**
**दुष्टाजनाविण बसे स्वसभेंत जेव्हां ।**
**भासे सुनिर्मलमना जनतेस तेव्हां ॥**

भाषांतर.

येथें वाईट लोकांच्या संगतींत राजपुत्र नसला म्हणजे तो स्वकर्तव्यदक्ष व प्रजेस प्रिय असा असतो असें वर्णिलें आहे. ही देखील **शोभना** विनोक्ति आहे

**( आ ) अशोभना विनोक्ति**–जसें:—

**( १ ) चंद्राविना नच गमे रुचिराहि रात्री ।**
**रात्रीविणें न विलसे विधु चारुगात्रि ! ॥**
**रात्रीशशीविण विलास नच स्मराचे ।**
**आनंदवीति हृदया नव-कामुकांचे ॥**

भाषांतर

येथें चंद्र व रात्र एकमेकावांचून शोभाहीन असतात व या दोहोंविना कामीजनांच्या विलासास रंग चढत नाहीं असे वर्णिलें आहे.

**( २ ) दुग्ध-पूर नसतां निजरूपीं क्षीर–सिंधु तो जैसा**
**वसंत आला नाहीं तरि तो उद्यान–भाग जैसा ॥ १ ॥**
**अमृत-कराचा उदय न होतां रजनी समयो जैसा**
**तुमच्या विरहें आजि जहाला कवण देश तो ऐसा ॥ २ ॥**

रघुनाथ पंडित.

येथें क्षीर समुद्रांत ‘ दुग्धपूर ’ नसला म्हणजे तो जसा शोभत नाहीं किंवा वसंताविना उद्यान शोभत नाहीं किंवा चंद्राशिवाय रात्र शोभत नाहीं त्याचप्रमाणें तुम्ही येथें येऊन कोणत्या देशास शोभाहीन केलें आहे असा दमयंतीचा नळास प्रश्न आहे.

**( ३ ) तालसुरांविण गीत ज्ञानाविण तो मुनींद्र नच साजे ।**
**मानाविना महीवर, दानाविण तो करीहि जो माजे ॥**

भाषांतर.

येथें एक दुसऱ्याविना शोभत नाहीं असें वर्णन आहे.

**( ४ ) नक्षत्रें इंदुविणें स्त्रीरत्नें प्रभुविणें जशीं गमलीं ।**
**स्वसुखनिधान करांचें जातां त्यांचीं मनें बहु भ्रमलीं ॥**

मोरोपंत.

नक्षत्रांना चंद्राशिवाय व सुंदर स्त्रियांना प्रभूंशिवाय शोभा नसते असें वर्णन आहे.

**गर्भित विनोक्ति**–जसें:—

**होई निरर्थकचि जन्म सरोजिनीचें**
**दृष्टी पडे नच कधीं शशिबिंब जीचे ॥**

उत्पत्ति होय विफला विधुची गमे ती
जेणें न देखिली तिची स्मितवक्त्रकांति ॥

भाषांतर.

येथें विनादि शब्दांचा उपयोग न करितां विनोक्ति अलंकार ध्वनित झाला आहे.

---

## (३३) स्वभावोक्ति.

जेथें बाल, स्त्री, मुग्ध, कातर, भ्रांत इत्यादिकांच्या चमत्कारजनक क्रियेचें अथवा रूपाचें म्हणजे आसनादि अवयव-विन्यासाचें वर्णन वस्तुस्थितीस अनुरूप असें केलेलें असतें तेथें **स्वभावोक्ति** अलंकार होतो.

(१) पृथु नितंब नितंबिनिचा वरी ।
कटितटीं कटिसूत्रचि सावरी ॥
कनक कंकण वृंदहि वाजती ।
मुखिं सुखश्रमबिंदु विराजती ॥ १ ॥
श्रवणिचे श्रवणीं नग हालती ।
गळति गुंफिलिया शिरिं मालती ॥
घुसळितां कुचकुंभहि कांपती ।
अमृत ज्यांतिल घे कमळापती ॥ २ ॥
फिरविते रवितें दधिभीतरीं ।
मिरविते रवितेज नगांवरी ॥
स्वकरिं ते करि चंचलता मनीं ।
उपरमे परमेश्वर गायनीं ॥ ३ ॥

वामन.

वरील तीन्ही पद्यांत यशोदेची दधिमंथनक्रिया व तिजमुळें होणारा नैसर्गिक अंगविन्यास यांचें वर्णन फार खुबीदार असून तें कोणत्याही स्त्रीस याच स्थितींत असतांना लागू होणारें आहे.

(२)परोपरी खेळति जी वनांत । अर्पूनि चित्तें जगज्जीवनांत
धरूनिया मर्कट-पुच्छ हातीं । तयासवें वृक्षिं उडों पहाती ॥१॥
मुखें वासुनी लोचन-भ्रू-तटातें । उभारूनियां वांकुल्या मर्कटातें
अहो दाविती शब्द तैसे करीती । असे खेळती बाळ निःशंकरीति २

खगांचिया साउलिच्याच संगें । हे धावती हास्य रसप्रसंगें ।
हंसांचिया दाखविती गतीतें । जे लाधले हंस गुरूगतीतें ॥३॥
वनीं देखुनी मेघ-नीळास मोर । प्रमोदें करी नृत्य लीला समोर ।
तया सारखे नाचती तोक सारे । खुणावुनि अन्योन्य कीं तो कसारे ४

वामन.

येथें बाललीलांचें वस्तुस्थितीस अनुसरून वर्णन केलें आहे.

( ३ ) पळतांचि झरोक्याच्या जवळ, सुटे बंध सांडती सुमनें ।
ती वेणी बांधाया विसरे कोणी, धरी जरि करानें ॥ १ ॥
रंजन करणारीनें धृत हिसकी आर्द्र अग्रचरण कुणी ।
त्वरित गवाक्षावेरी जातां पथ लाल होय लाक्षेनी ॥ २ ॥
लावुनि कज्जल उजव्या नयना परि लावितां न डाव्याला ।
जाई तैशीच तिजी जाळीजवळीं धरून सळईला ॥ ३ ॥
जाळी-मधूनि बघतां एकीला राहिलें नसे भान ।
लवकर पळतां सुटली नीवी ती बांधली स्वयें वा न ॥ ४ ॥
यद्भूषणकांतींनीं केला होता प्रवेश नाभींत ।
त्या निजकरें धरूनी वासासी, राहिली हरा बघत ॥ ५ ॥

शिव गिरिराजाच्या घरीं उमेस वरण्यासाठीं जात असतांना त्यास पाहण्यास चाललेल्या भ्रांतचित्त स्त्रियांच्या नैसर्गिक क्रियांचें हें वर्णन आहे.

(४ , धनु करुनि चुईचें चांगलें ठाण मांडी ।
पुढिल सरळ जंघा, वांकुडी वाम मांडी ॥
श्रवणवरि करातें ने, भवास्त्रास भंगी ।
घडिभरि मुरली घे, ठाण मांडी त्रिभंगी ॥

सामराज.

या ठिकाणीं लहान मुलाच्या शरसंधानक्रियेचें यथायोग्य वर्णन केलेलें आहे

( ५ ) सरळ चवक दावी थोकला पाठ चाटी ॥
पळत पळत पाहे मागुता दूर दृष्टीं ॥
श्रवण नयन पायें खाजवी भूमि हुंगे ॥
विचरत मृग चेष्टा पर्णशाळेंसि नीघे ॥

मुक्तेश्वर.

येथें मृगाच्या स्वाभाविक क्रियेचें वर्णन आहे. या अलंकारास **जाति** असेंही म्हणतात.

---

## (३४) व्याजस्तुति.

[ व्याज=कपट, ढोंग. ]

बाह्यात्कारें स्तुति असून तिचें जेव्हां निंदेमध्यें पर्यवसान होतें, अथवा बाह्यात्कारें निंदा असून तिचें वास्तविक स्तुतीमध्यें पर्यवसान होतें तेव्हां **व्याजस्तुति** अलंकार होतो.

१. जेव्हां स्तुतीचें निंदेमध्यें पर्यवसान होतें तेव्हां व्याजस्तुति ह्या पदाचा विग्रह व्याजरूपा स्तुति असा करावयास पाहिजे. उदाहरणें:—

**(१) कृष्ण म्हणे गे कांते ! बंधू विजयी ह्मणूनि ओंवाळीं ॥**
**करि भाउबीज यातें, चित्तीं कल्पूनि आजि दिपवाळी ॥**

सखाराम-तनय.

कृष्णानें रुक्मिणीच्या भावाचा पराभव केल्यानंतर तो तिला म्हणतो, ‘ बंधू विजयी म्हणूनि ओंवाळी; ’ या शब्दांनीं अर्थात् रुक्मीची निर्भत्सना केली आहे.

**(२) सोसूनि दूति ! बहु दुःख मदर्थ तूंही ॥**
**झालीस धन्य ! कृति वंद्य गमे तुझी ही ॥**
**होशी विळून बहु-दंत-नख-क्षतांनीं ॥**
**ऐसे करील उपकार दुजी न कोणी ॥**

भाषांतर.

नायिकेच्या मनांत दूतीची वास्तविक निंदा करण्याचें असून ती निंदा ‘धन्य’ ‘वंद्य’ ‘ उपकार ’ ह्या स्तुतिवाचक शब्दांनीं केलेली आहे.

२. जेव्हां निंदेचें खरोखर पर्यवसान स्तुतीमध्यें होतें तेव्हां व्याजस्तुति या पदाचा विग्रह व्याजेंकरून स्तुति असा केला पाहिजे. उदाहरणः—

**(१) आम्रतरूशीं घडवी सौम्य पिकाचा सदव सहवास ॥**
**विधि निंद्य तोचि, काका ! शब्द करीं, दोष तव नसे खास ॥**

भाषांतर.

आम्रतरूचा व कोकिल पक्षाचा समागम करविणारा विधि निंद्य आहे असें येथें वर्णन आहे. तथापि, त्यानें जें केलें तें उचितच केलें असा बोलणाराचा आशय असल्यामुळें निंद्य या शब्दानें त्याची स्तुतीच केली आहे.

(२) सदा सर्वदा दान तूं सर्व कांहीं
करीशी अशी ख्याति तूझी वृथा ही ।
अरींना कधीं पृष्ठ ना प्राप्त झालें
परस्त्री-जनां वक्षही ना मिळालें ॥

भाषांतर.

येथें बाह्यात्कारें जरी एका राजाची निंदा केली आहे तरी तिच्यामुळें त्यांचें शौर्य व एकपत्नीव्रत हे दोन गुण व्यक्त होतात.

व्याजस्तुतींत वाच्यार्थ खरा नसून लक्षणेनें विपरीत अर्थाची प्रतीति होते.

---

## ( ३५ ) तद्गुण.

जेव्हां एकादा पदार्थ आपल्या अंगचा गुण सोडून देऊन दुसऱ्याजवळ असलेल्या पदार्थांच्या सुप्रसिद्ध गुणाचा स्वीकार करितो असें वर्णन असतें तेव्हां **तद्गुण** नामक अलंकार होतो. जसें:—

(१) नेला नासे-जवळी जाति-कुसुम-गुच्छ कामिनीनें तो ।
अधर द्युती-मुळें त्या गुंजाफलवर्ण प्राप्त कीं होतो ॥ १ ॥

भाषांतर.

येथें जाति–कुसुमाचा रंग पांढरा असून अधराच्या सान्निध्यामुळें त्यास रक्त-वर्ण प्राप्त झाला असें वर्णन आहे.

अथवा,

(२) दिवाकराचे हय जे सुनील ।
अनूरु-तेजें दिसतात लाल ॥
मणि-प्रभा वंशकरीरसी ते ।
स्ववर्ण अश्वा लवलाहि देते ॥ १ ॥

भाषांतर

येथें नीलवर्ण अश्व लाल दिसतात व नीलमण्यांच्या तेजानें त्यांना पुन्हां पूर्वींचा रंग प्राप्त होतो असें वर्णिलें आहे.

(३) जो मानसीं विहरतो विहरो परी तो
कां आमुची कुलसती असती करीतो ।

**राखीं नळा निजयशोमय हंस राया**
**आलों महीवर फिराद अशी कराया ॥**

रघुनाथपंडित.

येथें नळाचें यश हाच एक हंस त्याच्या धवलत्वामुळें सुवर्ण-वर्णाचे जे राजहंस त्यांस शुभ्रपणा येतो व यामुळें त्या हंसांची अपकीर्ति होते; कारण ते सोन्याचे असून इतर हंसांप्रमाणें पांढरेच दिसतात अशी तक्रार आहे. तुझ्या यशोमय हंसानें तुझ्या मानसांत खुशाल विहार करावा पण त्या हंसानें मानस सरोवरांत क्रीडा करूं नये असा कलहंसाच्या बोलण्याचा रोख आहे.

नलाची कीर्ति सर्व जगभर पसरलेली आहे हा हंसाच्या बोलण्याचा आशय होय.

---

## ( ३६ ) अतद्गुण.

जेव्हां एक पदार्थ जवळ असलेल्या दुसऱ्या पदार्थाच्या प्रसिद्ध गुणाचा स्वीकार करीत नाहीं असें वर्णन असतें तेव्हां **अतद्गुण** अलंकार होतो. जसें:—

( १ ) **पंकांत पद्म न मळे; काकांच्या दुर्गुणा शिके न पिक ॥**
**चंदन पर गंध न घे; होय तृणामाजि तृणचि काय पिक ॥१॥**

मोरोपंत.

( २ ) **अथवा कशास हेंही ? सुगंध कर्पूरही न करि लशुना ॥**
**सिंह-गुण स्वीकृतिला तत्संगें काय गा ! करील शुना ॥२॥**

मोरोपंत.

वरील दोन्ही पद्यांत एक वस्तु दुसऱ्या समीप असलेल्या वस्तूच्या उज्ज्वल गुणांचा स्वीकार करीत नाहीं असें वर्णन आहे.

---

## ( ३७ ) अधिक.

आधार व आधेय हीं दोन्ही वास्तविक लहान असूनही तीं अनुक्रमें आधेय व आधार–जीं स्वाभाविकपणेंच परिमाणानें फार मोठीं आहेत अशी लोकप्रसिद्धि आहे–यांच्यापेक्षांही मोठीं आहेत असें जेथें वर्णन असतें तेथें **अधिक** अलंकार होतो. क्रमानें उदाहरणें:—

(१) वाटे मला किती तरि ब्रह्मांडोदर विशाल राया हें ॥
मायाचें न कधीं जें त्वद्यश, कष्टें तयांत तें राहे ॥ १ ॥

भाषांतर.

यश हें आधेय व ब्रह्मांड हा आधार होय. आधाराचेपेक्षां आधेय मोठें आहे अशी वस्तुस्थिति असून यश ब्रह्मांडांत कसे तरी मावतें असें वर्णन करून ब्रह्मांड हा आधार यश या आधेयापेक्षां मोठा आहे असें दाखविलें आहे. अर्थात् येथें आधाराचें म्हणजे ब्रह्मांडाचें श्रेष्ठत्व वर्णिलें आहे.

(२) ज्या उदरांत सकलही लोकत्रय सावकाश राहतसे ॥
त्यांतचि मुनिवर दर्शन होतां आनंद तो न मावतसे ॥ १ ॥

मोरोपंत.

भुवनत्रय पोटांत राहूनही जागा उरतेच; तेव्हां कृष्णाचें शरीर फारच मोठें आहे. परंतु नारदास पाहून झालेला आनंद थोडा असूनही कृष्णाच्या शरिरांत मावला नाहीं असें वर्णन आहे. कृष्णाचें उदर हा आधार व आनंद हें आधेय होय; व आधार इतका मोठा असूनही त्यांत आधेय मावत नाहीं तेव्हां आधारापेक्षां आधेय परिमाणानें फार मोठें आहे, असें दाखविलें आहे. अर्थात् येथें आधेयाचें म्हणजे आनंदाचें महत्त्व वर्णिलें आहे.

---

## (३८) अन्योन्य.

जेव्हां दोन वस्तु सारख्याच गुणांनीं अथवा क्रियांनीं एकमेकांस शोभा देतात असें वर्णन असतें तेव्हां **अन्योन्य** नामक अलंकार होतो. जसेः—

(१) लाजे जिला मौक्तिक-रत्न-माला ।
ऐसी ललाटीं श्रमबिंदुमाला ॥
कांतीहि वक्त्रीं कनकापरी ते; ।
दोन्ही रुची देति परस्परांतें ॥ १ ॥

भाषांतर.

मौक्तिक-मालेस जिंकणारी जी श्रमबिंदु-माला तिच्या प्रभेनें मुखास शोभा आली व मुखाच्या सुवर्णकांतीमुळें श्रमबिंदुमालेस शोभा आली असें वर वर्णिलें

आहे. अर्थात् येथें परस्परांच्या गुणांमुळें परस्परांस शोभा आली असें दाखविलें आहे.

(२) श्रीकृष्ण काळा असि-गौर बाळा। संयोग शोभेल अपूर्व यांला ॥
रत्ना सुवर्णा जरि भेटि होते। परस्परें कांति विशेष येते ॥
सामराज.

येथें श्रीकृष्ण व रुक्मिणी परस्परांस शोभा आणतात असें वर्णिलें आहे.

(३) निशिनेंच शशी निशि चंद्रमसें
शशिनें निशिनेंहि वियद्विलसे।
कमलें सुपया कमलासि पयें
कमलें सुपयेंहि सरा द्युति ये ॥
भाषांतर.

येथें एकानें दुसऱ्यास व दोहोंनीं तिसऱ्या पदार्थास शोभा आणली असें वर्णिलें आहे. तसेंच वर्णन पुढील पद्यांत आहे.

(४) उन्नत असतां स्तनभारानें किंचित नत जो झाला।
कंठ तियेचा तशीच त्यांतील वर्तुल मौक्तिक-माला ॥१॥
परस्परांना शोभवितीं तीं दोन्ही संयोगानें।
झाला भूषणभूष्यभाव हा समान त्यांचा तेणें ॥२॥
कुमारसंभव.

(५) परदृष्टिपात-भीता सीता धांवे भुजांतरीं पतिच्या ॥
पर-युवति भयें रामहि मारी सत्वर मिठी गळां सतिच्या ॥१॥
भाषांतर

येथें परस्परांच्या आलिंगनक्रियेनें परस्परांस शोभा आली असा ध्वनि आहे.

---

## (३९) स्मरण.

पूर्वी जो पदार्थ पाहिला असेल त्याच पदार्थासारखा दुसरा पदार्थ कालांतरानें पाहिल्यावर पूर्वी परिचित असलेल्या पदार्थाची जेव्हां एखाद्यास आठवण होते तेव्हां **स्मरण** नामक अलंकार होतो. उदाहरणें:—

(१) मातें कमल-मृणालें विलोकितां स्मरति युवतिच्या सुभुजा
प्रणयक्रोधें मजला बद्ध करायासि सर्वथा विभु ज्या ॥ १ ॥
अलि-पुंज देखतां मज सीतेचे केश लक्ष्मणा! स्मरती
तत्कबरीसम हे शिखिपिच्छकलाप स्वमानसीं भरती ॥ २ ॥
मोरोपंत.

येथें भ्रमर व मोर पाहून रामास सीतेच्या काळ्या केसांची व वेणीची आठवण झाली असें वर्णिलें आहे.

अथवा,

( २ ) वेणी हे भुजगापरी कुरळ कीं मोरापरी बोलणें ।
गोरा रंग तयांत कांति झळके हंसापरी चालणें ॥
वक्त्रेंदूवरि गोंधणें चमकतें तेणें मला वाटतें ।
ती राधाचि असेल कुंदरदना जी मानसीं दाटते ॥ १ ॥
विठ्ठल कवि.

ह्या वर्णनांत दुसऱ्या एका स्त्रीस पाहून नायकास राधेची आठवण झाली असें व्यक्त केलें आहे.

---

## ( ४० ) उत्तर.

उत्तर ऐकल्याबरोबर अमुक प्रश्न असावा असा जेव्हां ऐकणाराचा तर्क होतो अथवा जेव्हां अनेक प्रश्नांना अनेक असंभाव्य उत्तरें दिलेलीं असतात तेव्हां **उत्तर** अलंकार होतो. क्रमानें उदाहरणें:—

( १ ) पांथा त्वत्सम पति मम वल्लींकुंजांत चित्त रमवितसे ॥
आहे जिवंत मी कीं याहुनि तें अधिक कुशल काय असे ॥१॥
भाषांतर.

येथें कामिनीच्या उत्तरावरून पांथानें " तूं, कुशल आहेस ना ", असा प्रश्न केला असावा अशी कल्पना होते.

( २ ) काय विषम ? दैवगती; दुर्लभही काय ? जन गुणग्राही ॥
सौख्यद काय ? सुपत्नी; दुःख जगीं काय ? दुष्ट जन पाहीं ॥१॥
भाषांतर.

या ठिकाणीं अनेक प्रश्नांस अनेक चमत्कारजनक अशीं उत्तरें दिलेलीं आहेत.

प्राचीन अलंकारशास्त्रज्ञांच्या मतें अनेक प्रश्नांस अनेक असंभाव्य उत्तरें असतील तरच उत्तरालंकार होतो; परंतु नवीनांच्या मतें एकच प्रश्न व एकचचमत्कारजनक उत्तर असलें तरी हा अलंकार होतो. जसें:—

**( ३ ) स्वामी, शूर ह्मणावें कोणाला ? हें मला तुह्मी बोधा ॥**
**शिष्या, स्त्रीनेत्रशरें पावेना जो व्यथेसि तो योधा ॥ १ ॥**

मोरोपंत.

या ठिकाणीं प्रश्नास दिलेलें उत्तर सामान्य जनांस न सुचविणारें व चमत्कारजनक आहे.

प्रश्नांत जे शब्द असतात तेच जेव्हां उत्तरामध्यें असतात तेव्हांही उत्तर अलंकार होतो. जसें:—

**(४)कशांनीं रणीं मारती स्वार घोडे । ह्मणे भीरु कोणास दे स्थान थोडे**
**कशांनीं रणीं मारती स्वार घोडे । ह्मणे भीरु कोणांस दे स्थान थोडे**

गोविंदशास्त्री दामले

हें उत्तर श्लेषमूलक आहे.

---

## ( ४१ ) परिवृत्ति.

दोन पदार्थांमध्यें दोन सारख्या अथवा दोन लहानमोठ्या वस्तूंची देवघेव अथवा अदलाबदल झालेली आहे असे जेथें वर्णन असतें तेथें **परिवृत्ति** अलंकार होतो. मात्र ही अदलाबदल कविप्रतिभानिर्मित असली पाहिजे, उदाहरणें:—

**( १ ) लता-पुष्पांचा तो परिमल वनांतीं हरुनियां ।**
**सदा वायू देई अभिमत असें लास्यहि तयां ॥**
**लताही पांथांची हरुनि सहसा दृष्टि सुपथीं ।**
**तयां देती व्याधि, भ्रम, रुदित, मोहादिक किती ॥ १ ॥**

भाषांतर.

या ठिकाणीं वायु लतांच्या पुष्पांचा सुगंध हरण करितो व त्याबद्दल लतांना लास्य देतो असे वर्णिलें आहे. येथें ( पहिल्या अर्धांत ) दोन सारख्या पण

---

( १ ) कशा=चाबूक. ( २ ) कोण=कोपरा.

चांगल्या वस्तूंची अदलाबदल झालेली आहे. पुढील अर्धामध्यें पांथांची दृष्टी हरण करून त्याबद्दल लता त्यांना व्याधी श्रम इत्यादि देतात असें दाखविलें आहे. येथें चांगली वस्तु घेऊन वाईट वस्तु दिली म्हणून असम वस्तूंची देवघेव झालेली आहे. वस्तु या शब्दांत गुणक्रियादिकांचा समावेश होतो.

तसेंच,

**( २ ) देवत्व मला देउनि आपण घे श्रीनिवास दासत्व ।**
**जिव्हा श्रुति हो ! त्याचे गाउनि ऐकुनि निवा सदा सत्व ॥**

मोरोपंत.

येथें श्रीकृष्णानें सुदामास स्वतःच्या शय्येवर निजवून त्याचे पाय चुरले असे वर्णन असल्यानें चांगली वस्तु देऊन श्रीकृष्णानें हीन वस्तूचा अगिकार केला असें दर्शविलें आहे.

**( ३ ) देवूनि काक, घ्यावे पांच तुवां चित्रबर्ह-शितिकंठ ।**
**घे पंचानन पांच क्रोष्टा दे मानवेल शितिकंठ ॥**

मोरोपंत.

ही विदुराची धृतराष्ट्राप्रत उक्ति आहे. येथें प्रथमार्धात दुर्योधनादि कौरवांस काक म्हटलें आहे व पांडवांस ( शितिकंठ ) मोर असें म्हटलें आहे. द्वितीयार्धात पांडवांस ( पंचानन ) सिंह व दुर्योधनास ( क्रोष्टा ) कोल्हा म्हटलें आहे. व ही देवघेव झाल्यास ( शितिकंठ ) महादेव प्रसन्न होईल असें सांगितलें आहे.

येथें ही चांगल्या वस्तूंचा स्वीकार व वाईट वस्तूंचा त्याग अशा प्रकारची देवघेव आहे.

**( ४ ) अग्रभागीं जे राहती तुझ्या ते ॥**
**अस्थिमालामय देउनी तनूतें ॥**
**रुंडमालामय देह जरी घेती ॥**
**लाभ शंभो त्या काय अशा रीती ॥**

भाषांतर.

येथें दोन सारख्याच पण वाईट वस्तूंची देवघेव आहे असें दाखविलें आहे.

---

## ( ४२ ) व्याजोक्ति.

[ व्याज=कपट, मिष, छद्म ].

एकादी लपविलेली गोष्ट कोणत्या ना कोणत्या रीतीनें उघडकीस आल्यावर ती अन्य मिषानें झांकण्याचा प्रयत्न जेथें केलेला असतो तेथें **व्याजोक्ति** अलंकार होतो. उदाहरणें:—

**( १ ) शैलेंद्रें गिरिजाकरा शिवकरीं हर्षें दिलें जेधवां**
**तत्संसर्ग करी तदा शिवतनू रोमांचकंपोद्भवा ॥**
**देखोनी रतिभाव मातृगण तें किंचित् स्मितातें करी**
**तों बोले शिव ' शैत्य तात करिंचें बाधे किती हो तरी ' ॥**

भाषांतर.

वास्तविक पाहतां रोमांच कंप इत्यादि भाव शिवाचे उमेच्या ठायीं असलेल्या प्रेमामुळें उत्पन्न झालेले पाहून तिच्या मेनादि माता हंसल्या. आपले शरीरावरील स्पष्ट भाव झाकण्याकरितां रोमांच कंपादि भाव नैसर्गिकपणेंच अतिशय थंड असलेल्या नगराजाच्या कराच्या स्पर्शानेंच उद्भवले असें शिवानें आपल्या भाषणानें दर्शविलें असें येथें वर्णन आहे. वस्तुस्थिति मोठ्या खुबीनें लपविण्याचा हा प्रयत्न असल्यामुळें येथें व्याजोक्ति अलंकार झाला आहे.

**( २ ) कां हा कंप सखे ? प्रभो अहिभयें, कां धर्म ? नेत्रानळें**
**कां रोमांच तनूवरी ? प्रियतमा ! गंगातुषारामुळें ।**
**झाल्या सात्विकवृत्ति उत्थित पतिप्रेमें तयांतें उमा**
**पाहे जी लपवूं शिवानिकट ती सौख्यास देवो तुम्हा ॥**

भाषांतर.

येथेंही पार्वतीच्या शरीरावर स्पष्ट दिसणारा प्रत्येक रतिभाव अन्य मिषानें झांकण्याचा प्रयत्न तिनें केला आहे असें वर्णिलें आहे.

**( ३ ) तनू कां तुझी व्यापिली जीवनानें ।**
**पथीं चालतां घाम आला उन्हानें ॥**
**वधूचे रदाचा दिसे दंश ओष्ठीं ।**
**रुते शंख ओठीं नसे मिथ्य गोष्टी ॥ १ ॥**

**वनीं पोवळी गाय माझी पळाली।**
**तियेलागिं आणावया रात्र झाली ॥**
**अशा जाग्रणें नेत्र आरक्त झाले।**
**मुखीं तेज नाहीं असे कष्ट केले ॥ २ ॥**

राधाविलास-काव्यसंग्रह.

सत्यभामेच्या घरून राधेच्या घरीं कृष्ण आल्यावर तिनें शरीरास ग्लानि येण्याचें कारण विचारल्यावरून त्यानें वरील उत्तर दिलें. येथें रतिचिन्हें स्पष्ट दिसत असून तीं लपविण्यासाठीं जागरणामुळें अशी स्थिति झालेली आहे, असे कृष्णानें राधेस सांगितलें आहे.

**( ४ ) नखांचीं क्षतें दीसतीं ठाइं ठाइं ॥**
**ह्मणे खेळलों फार भूतांशि पाहीं ॥**
**बहू येतसे वास तूझे शरीरीं ॥**
**पुजा भक्ति केली सुगंधोपचारीं ॥ १ ॥**

सदाशिव कवि.

शिव हिमालय पर्वतावर तपश्चर्येकरितां गेल्यावर त्यानें गंगेस वरिलें. पुढें नारदाच्या सांगण्यावरून पार्वतीच्या घराकडे परत यावयास निघाला. पण गंगा त्यास जाऊं देईना; तेव्हां शिवानें तिला आपल्या जटेंत लपवून ठेवून पार्वतीची भेट घेतली त्यावेळीं तिनें प्रश्न केल्यावरून शंकरानें उत्तर दिलें, असें वर्णन वरील पद्यांत आहे.

ह्या पद्यांतही एक गोष्ट लपवून ती उघडकीस आल्यावर ती छद्मानें किंवा अन्य मिषानें झांकण्याचा प्रयत्न केलेला आले.

---

## ( ४३ ) पर्यायोक्त.

एकाद्याच्या मनांतील भावार्थ जशाचा तसाच स्पष्टपणें न सांगतां तो पर्यायानें **म्हणजे म्हणजे** अन्य रीतीनें जेव्हां व्यक्त केलेला असतो तेव्हां **पर्यायोक्त** अलंकार होतो. उदाहरणें:—

**( १ ) केलेंचि धन्य दर्शन-दानें येऊनि कानना मातें ॥**
**अजि देवेश निवावे बहु हे सेवूनि कान नामातें ॥**

मोरोपंत.

येथं तुम्ही आल्यानें मला फार आनंद झाला आहे. आपलें नांव सांगावें असा बोलणाराच्या मनांतील भावार्थ असून तो पर्यायानें व्यक्त केलेला आहे.

तसेंच,

( २ ) मारुति ह्मणे जसा तूं घेउनियां पादुकांसि आलास ॥
तैसाचि विरह रामें समर्पिला चित्रकूट शैलास ॥ १ ॥

मोरोपंत.

येथं चित्रकूटापासून राम निघून गेला असें पर्यायानें मारुतीनें भरतास कळविलें आहे.

"अलिकुलवहनाच्या वाहना नेत होतें ॥
शशिधरवहनानें लोटिलें जाण मातें ॥
नदिपतिरिपुचा तो तात भंगोनि गेला ॥
रविसुत महिसंगें फार दुःखीत झाला ॥ १ ॥

विठ्ठलकवि.

असलीं कूट व क्लिष्ट पद्ये पर्यायोक्त अलंकाराचीं उदाहरणें होऊं शकत नाहींत; कारण त्यांत रमणीयत्व नसतें.

---

## ( ४४ ) पर्याय.

[ पर्याय=क्रम (काळाचा किंवा स्थानाचा) ].

जेव्हां एक विवक्षित वस्तु काळाच्या क्रमानें अनेक आधारांच्या ठायीं वास करिते असें वर्णन असतें, तेथें **पर्याय** अलंकार होतो. जसें:—

( १ ) हालाहला ! तुज दिली स्थिति सांग कोणें
जी दे महत्व तुजलागिं अनुक्रमानें ।
पूर्वीं समुद्र-हृदयीं, मग शंकराच्या
कंठीं निवास, वचनींहि अतां खलांच्या ॥

भाषांतर.

येथें 'कालकूट' ही एकच वस्तु क्रमानें 'समुद्रहृदयीं' 'शंकराच्या कंठीं' व 'खलांच्या वचनीं' आश्रय करून राहिली असें वर्णन आहे.

अथवा,

**चांचल्यातें त्यजिति पद ते, सेविती नेत्र त्यातें ।**
**श्रोणी कार्श्या त्यजित असती, घेतसे मध्य त्यातें ॥**
**ऐक्या टाकी उर, कुचयुगीं अद्वितीयत्व थाटे ।**
**तारुण्यानें गुण-विनिमया-केलि केलीच वाटे ॥ १ ॥**

पा. गो. शास्त्री पारखी.

या ठिकाणीं चांचल्य पायापासून निघून जाऊन नेत्रांचे ठायीं राहतें व याचप्रमाणें पुढील दोन चरणांत एकच वस्तु क्रमानें अथवा कालभेदानें एकापेक्षां जास्त आधारांचेठायीं राहते असें वर्णन असल्यामुळें पर्याय अलंकार झाला आहे.

या ठिकाणीं ' विनिमय ' हा शब्द असल्यामुळें वरील पद्यांत परिवृत्ति अलंकार आहे असें कित्येकांस भासण्याचा संभव आहे; परंतु अशी शंका घेण्याचें कारण नाहीं. परिवृत्ति अलंकारांत एक वस्तु देऊन दुसरी तिच्याबद्दल घेतली असें वर्णन असतें, येथें तसें नाहीं. पदांचें चांचल्य नेत्रांनीं घेतलें, परंतु नेत्रांचा एकादा गुण पायांनीं घेतला आहे असें दिसत नाहीं. पुढील दोन ओळींतही असाच प्रकार आढळतो. तेव्हां हें परिवृत्ति अलंकाराचें उदाहरण नसून **पर्याया**-चेंच आहे हें उघड आहे.

**पक्ष्मीं ठरून पळ, ताडुनि वक्ष तीचा**
**गेलें फुटून पडतां वरती कुचांच्या ।**
**तें होउनी स्खलित तीन वळयांत गेलें**
**नाभींत वारिकण नूतन फार काळें ॥**

कुमारसंभव.

येथें डोळ्यांतील अश्रू कालाच्या क्रमानें स्थान बदलीत बदलीत खालीं वहात होतें असें वर्णन आहे.

जेथें अनेक वस्तु क्रमेंकरून एके ठिकाणीं राहतात असें वर्णन असतें तेव्हांही **पर्याय** अलंकार होतो. जसें:—

**मधुर रुचिर वाणी कोमलाही खलाची**
**प्रथम खचित होते थोर धारा सुधेची ।**
**उदरिं गरल होते मागुती तीव्र तीच**
**उपजवि मग भारी मोह कीं जाण साच ॥**

**भाषांतर.**

वरील पद्यांत खलाच्या वाणीच्या ठायीं अमृतत्व व विषत्व हे दोन्ही गुण क्रमानें आश्रय करितात असें वर्णन आहे.

---

## ( ४५ ) परिसंख्या.

[ परि=वर्जन, संख्या=बुद्धि ( वर्जन-बुद्धि ) ].

एकाद्या वस्तूचा नाम-निर्देश केल्याबरोबर बाकीच्या सर्व वस्तु जेथें साहजिकपणें वगळल्या जातात तेथें **परिसंख्या** अलंकार होतो. ह्याचे शुद्धा व प्रश्नपूर्विका असे मुख्य दोन भेद असून ह्या प्रत्येकाचे आर्थी व शाब्दी असे पोटभेद आहेत. क्रमानें उदाहरणें:—

( १ ) शुद्धा आर्थी—

**( १ ) कौटिल्य पूर्ण वसतें तव केशपाशीं**
**तो राग हस्त-चरणाधर-गंडदेशीं ।**
**काठिन्य गे कुचयुगीं तव फार दाटे**
**चांचल्य नेत्र मिथुनीं अतिमात्र थाटे ॥**

भाषांतर.

या ठिकाणीं कौटिल्य हें केशपाशींच आहे असें सांगितल्यावरून तें हृदयांत नाहीं असा गर्भित निषेध आहे. त्याचप्रमाणें राग फक्त हस्त, चरण व अधर यांचे ठायींच आहे, परपुरुषाचे ठायीं नाहीं; काठिण्य स्तनभागींच आहे, अंतःकरणांत नाहीं व चंचलता नेत्रांतच आहे, मनामध्यें नाहीं; अशा प्रकारें एका गोष्टीचा नामनिर्देश करून दुसऱ्या इतर वस्तूंचा गर्भित व्यवच्छेद केलेला आहे.

**( २ ) दूर जाया साठींच काय वास ।**
**नाश व्हाया साठींच का विकास ॥**
**होत दिवशीं ज्या पूर्ण तुज विकास ॥**
**त्याच दिवशीं व्हावाच काय नाश ॥**

राम गडकरी.

येथेंही वर्जन गर्भित आहे.

( २ ) शुद्धा शाब्दीचीं उदाहरणें:—

( १ ) **तेथें हर्षें नयनिं जल ये, ये न अन्येंनिमित्तें**
**तेथें दुःख स्मरजचि, सरे जें सुहृत्संगमें तें ।**
**न प्रीतीच्या क्षणिक रुसण्यावीण कोणा वियोग**
**यक्षांना बा वयहि न दुजें, नित्य तारुण्य योग ॥**

बाळकृष्ण लक्ष्मण अंतरकर.

येथें वर्जनीय वस्तूंचा उल्लेख स्पष्ट आहे.

( २ ) **सद्रत्न-हार, मणि, ताइत बाहु-दंडीं ।**
**कीं स्नान, चंदन, फुलें, आणि लांब शेंडी ॥**
**यांनीं खरी घडतसे पुरुषा न शोभा ।**
**वाणीच भूषण सु-शिक्षित-शब्दगर्भा ॥**

वामन.

येथेंही वरीलप्रमाणेंच वर्णन असून वर्जनीय पदार्थांचा उल्लेख स्पष्ट केलेला आहे.

( ३ ) **श्रुतेंच कीं श्रोत्र न कुंडलानें**
**दानेंच कीं पाणि न कंकणानें ॥**
**साजे तसा देहहि हा न आनें**
**परोपकारेंचि न चंदनानें ॥ १ ॥**

वामन.

येथेंही वरीलप्रमाणेंच वर्णन असून व्यवच्छेद ( वर्जन ) मात्र स्पष्ट आहे.

( ३ ) प्रश्नपूर्विका आर्थी—

**कोणा अंध म्हणावें ? न दिसे सन्मार्ग उघडाहि ज्यास ।**
**कोण बधिर ? जो नाहीं परिसत केल्या हितोपदेशास ॥ १ ॥**
**कोण दरिद्री ? ज्याच्या हृदयीं तृष्णा सदा विशाल वसे ।**
**श्रीमान् कोण म्हणावा ? जो नर संतुष्टचित्त नित्य असे ॥ २ ॥**

कृ. चिपळुणकर.

येथें प्रथम प्रश्न केलेला असून नंतर त्याचें उत्तर दिलेलें आहे व त्यांत एका वस्तूचा निर्देश केल्यामुळें बाकीच्या इतर वस्तु वर्जनीय आहेत असें ध्वनित केलें आहे.

( ४ ) प्रश्नपूर्विका शाब्दी—

**रात्रिदिवस चिंतावी कोण ? गुरुवरा स्वदासविश्रमदा ।**
**कुशलें संसाराची ध्यावी निःसारताचि, न प्रमदा ॥ १ ॥**
**स्वामी कोण सुदुःसह सर्वां नरकां परीसही नरक ? ।**
**परवशताचि निरय, हें जाणुनि तूं संग सोडुनी सरक ॥ २ ॥**

मोरोपंत.

वरील दोन्ही गीतींत एका वस्तूचा निर्देश केल्यामुळें इतर ज्या गोष्टी वर्ज्य **म्हणून** सांगितल्या आहेत त्यांचा उल्लेख स्पष्ट केलेला आहे.

---

## ( ४६ ) यथासंख्य.

पहिल्यानें ज्या क्रमानें पदार्थ आलेले असतात त्याच क्रमानें दुसरे पदार्थ घालून त्यांचा पहिल्याचा पहिल्याशीं, दुसऱ्याचा दुसऱ्याशीं या क्रमानेंच जेथें संबंध जुळविलेला असतो तेथें **यथासंख्य** अलंकार होतो. जसें:—

**( १ ) मानी मनोजशर हार-तुरे फुलांचे ॥**
**कंदर्प-कोप-वचनें ध्वनि कोकिलांचे ॥**
**राका शशी मदन-दर्पण भाविलाहे ॥**
**ने घेचि तो, न परिसे, न तयासि पाहे ॥ १ ॥**

रघुनाथ पंडित.

येथें ‘ हारतुरे ’ याचा संबंध ‘ ने घे ’ या शब्दांकडे, ‘ कोकिलांचे ध्वनि ’ याचा ‘ न परिसे ’ याकडे व ‘ राका शशी ’ याचा ‘ न पाहे ’ याकडे आहे.

**( २ ) तृणें मृगाला सलिलें झषाला ॥**
**संतोष हे वृत्ति महाजनाला ॥**
**तयांस निष्कारण तीन वैरी ॥**
**किरात, कैवर्तक, दुष्ट भारी ॥ १ ॥**

वामन.

या ठिकाणीं मृग, झष, महाजन हे शब्द ज्या क्रमानें आलेले आहेत, त्याच क्रमानें किरात, कैवर्तक, दुष्ट हे शब्द आले असून त्यांचा पहिल्याचा पहिल्याशीं, दुसऱ्याचा दुसऱ्याशीं व तिसऱ्याचा तिसऱ्याशीं याप्रमाणें संबंध जोडलेला आहे

वास्तविक पाहिलें असतां वरील दोन्ही पद्यांत कविप्रतिभानिर्मित असें कांहींच वर्णन नसल्यामुळें ‘ यथासंख्य ’ हा अलंकार मानण्याचें कारण नाहीं. तरी अनेक शब्दांचा अनेक शब्दांशीं जो संबंध असतो, तो चमत्कारजनक असल्यामुळें त्यास अलंकारमालिकेंत गोंविलें आहे.

---

## ( ४७ ) आक्षेप.

बोलणाऱ्याच्या मनांत एक विशेष अर्थ असून तो अर्धवट बोलून दाखविल्यानंतर आपला विवक्षित अर्थ दुसऱ्यास कळावा अशी इच्छा धरून, परंतु आपली सांगण्याची इच्छा नाहीं असें बाह्यात्कारी दाखवून व खुबीदार रीतीनें प्रकृत अर्थाचा निषेध केल्यासारखें दाखवून, जेथें बोलणारा आपल्या मनांतील अर्थ व्यक्त करितो तेथें **आक्षेप** अलंकार होतो. असल्या निषेधाचे दोन प्रकार आहेत. ( १ ) पुढें जें कांहीं बोलावयाचें आहे त्याचा निषेध; ( २ ) पूर्वीं जें कांहीं सांगितलेलें आहे त्याचा निषेध. क्रमानें उदाहरणेः—

**( १ ) तूं जीव तूं हृदय तूं मजला विसावा ।**<br>
**तूं चंद्रिकाच नयनां, शरिरा सुधा वा ॥**<br>
**मोहीं जिला वदुनि यापरि गुंतवावें ।**<br>
**तीशीं असें कपट– काय पुढें वदावें ॥**

परशुराम शास्त्री गोडबोले.

या ठिकाणीं पुढें जें बोलावयाचें आहे त्याचा निषेध केला आहे; म्हणजे यापुढें बोलणेंच अशक्य आहे असे दाखविलें आहे.

**( २ ) आतां तरी क्षत्रिय तूं भला गे ।**<br>
**वरीं, जयाचा तुज लोभ लागे ॥**<br>
**जेणें तुला साधति लोक दोन्ही ।**<br>
**आम्ही वृथा– काय बहू वदोनी ॥**

वामन.

कृष्ण रुक्मिणीस म्हणतो मी जें बोलणार तें तर तूं जाणतच आहेस; मी सांगण्याची जरूरी नाहीं. येथेंही जें बोलावयाचें, त्याचा निषेध केला आहे.

(३) असो-घालविणें योग्य अतिथियाला ।
उचित नोहे हें तातकुलिनतेला ॥
तुम्हा तरि मी निजगेहिं नेत आहें ।
परी-इतकें बोलोनि उगी राहे ॥

ब. रा. प्रधान.

हें देवसेनीचें जयसेनाप्रत भाषण आहे. येथें 'परी' या शब्दानें तिच्या मनांतील आशय जाणण्याइतका जयसेन चतुर आहेच असें व्यक्त केलें आहे.

अथवा,

(४) जाणें श्वास तिचा मी शीतळ तें अंग, निश्चला दृष्टि ॥
राहो तिची कथा रे, कथिं इतरा, होय जी सुधावृष्टि ॥ १ ॥

गंगाधरशास्त्री.

या ठिकाणीं पूर्वी जें कांहीं ठाऊक आहे त्याचा निषेध केलेला आहे; म्हणजे पूर्वीची गोष्ट सुप्रसिद्धच आहे असें दाखविलें आहे.

जेथें विधि (अमुक कर असें) स्पष्ट असून निषेध गुप्त असतो तेथेंही **आक्षेप** अलंकार होतो. उदाहरणें:—

(१) तपोनिधे ! राघव बाळ अल्प ॥
नेतां तरी न्या, मनिं कां विकल्प ॥
पाहोनि त्यांना पशुवर्ग वन्य ॥
होवो सदा काननिं धन्य धन्य ! ॥

भाषांतर.

येथें रामास न्या असा विधि स्पष्ट असून तो गेल्यावर अयोध्यापुरींतील सर्व लोक गतप्राण होऊन ती नगरी केवळ रान होईल म्हणून नेऊं नका असा गुप्त निषेध आहे.

(२) जरी जाणें हो योग्य तुह्मा कांता ! ॥
सुखें जावें, वाहणें नको चिंता ॥
परी समजा कीं जाल तुह्मी जेथें ॥
त्वरित जन्मा येईन मीहि तेथें ॥ १ ॥

भाषांतर.

येथें तुम्ही जा पण तुम्ही जेथें जाल तेथेंच मी पुन्हा जन्म घेईन असें बोलून तुमच्या वियोग-दुःखानें मला मरण येईल असें एका नायिकेनें सुचविलें आहे.

## ( ४८ ) समाधि किंवा प्रहर्षण.

[ सम्यक् आधानें=कार्याचें सुलभ रीतीनें निर्माण होणें ].

एकादें आरंभिलेलें कार्य दुसऱ्याच आकस्मिक कारणामुळें अधिक सुकर होतें असे जेथें वर्णन असतें तेथे **समाधि** अलंकार होतो. असें:—

**ही आली क्षणदा यदा सुवदना होती समुत्कंठिता ।**
**कैसा मान अतां सुरक्षित मनीं राहील तो तत्वता ॥**
**ऊहापोह मनांत कंज-नयना ऐसा करी जेधवां ।**
**कामच्छत्र-भ चंद्रबिंब झळके तें अंबरीं तेधवां ॥**

भाषांतर.

मान टाकून देण्याकरितां कोणी एका मानिनीस तिचा पती प्रार्थीत असतां चंद्रोदयामुळें तिचा मान अनायासेंच गळाला असें येथें वर्णन आहे.

यत्न केल्यावांचून कार्यसिद्धि होणें अथवा इच्छिलेल्या अर्थापेक्षां अधिक अर्थ मिळणें असे जेथे वर्णन असतें तेथेंही समाधि अलंकार होतो. समाधीच्या ह्या प्रकारास कित्येक आलंकारिकांनीं **प्रहर्षण** असें नांव दिलें आहे. याचीं क्रमानें उदाहरणें:—

**( १ ) अवलोकितांचि आधीं भुलला लावण्यकल्पलतिकेला ।**
**त्यांत तिनें उचितादर सस्मित मधुरोदितेंहि अति केला ॥ १ ॥**

मोरोपंत.

येथें दुष्यंत शकुंतलेचें लावण्य पाहून मोहित झाला होता व त्यांतच त्याचे मनोरथ तृप्त होण्याचे कामीं तिच्या मंद हास्याची व मधुर भाषणाची भर पडली असें वर्णिलें आहे.

**( २ ) आम्हांसि आमची बहु, तीची चिंता वृथाच कां पडली**
**कवड्यांची न मिळावी परि मणिमाळा पथींच सांपडली ॥**

मोरोपंत.

ही राधेची तिच्या सखीप्रत कुब्जेसंबंधीं उक्ति आहे. कुब्जेला कोणी भिकारी देखील पुसणार नाहीं; पण तिला दुर्लभ असा श्रीकृष्ण वश झाला हें नवलच आहे. अलभ्य लाभ झाला म्हणून येथें प्रहर्षण अलंकार आहे.

( ३ ) लोभें कपर्दिकेचे ताक विकायास फिरतसे रमणी ॥
परि त्या व्रजकुमरीला लब्ध असे पथिं महेंद्रनील-मणी ॥ १ ॥

गंगाधरशास्त्री मंगरूळकर.

येथें इच्छिलेल्या अर्थापेक्षां अधिक लाभ झाला आहे असें वर्णन आहे.

## ( ४९ ) समुच्चय.

एकाच कारणानें कार्यसिद्धि होत असतांही दुसरीं अनेक कारणें त्याच कार्याचें उत्पादन करितात असें जेथें वर्णन असतें तेथें **समुच्चय** नामक अलंकार होतो. त्याचे तीन प्रकार आहेतः—( १ ) चांगल्या वस्तूंचा योग, ( २ ) वाईट वस्तूंचा योग, आणि ( ३ ) चांगल्याच वस्तु वाईट असतात अशा वस्तूंचा योग. यांचीं क्रमानें उदाहरणें:—

( १ ) आहे तुझें जनन आद्यविधातृ-वंशीं ।
त्रैलोक्यसुंदर तुझी तनु साच ऐशी ॥
ऐश्वर्य सौख्य न उणें वयही नवीन ।
याहून अन्य फल काय तपें करून ॥

कुमारसंभव.

हें जटिलरूपधारी शिवाचें उमेप्रत भाषण आहे. तुला योग्य पति मिळण्यास 'तुझें आद्यविधातृवंशीं जनन' हें एकच कारण पुरेसे आहे; त्यांत तुझें सौंदर्य, ऐश्वर्य, तारुण्य हींही इष्ट-फल-प्राप्तीस कारणें असून तप-साधन कशाकरितां करितेस असा त्यानें तिला प्रश्न केला आहे.

( २ ) शाणोल्लेख जया असा मणि, रणिं जो वीर घायाळला ।
संभोगें शिणली अशी नववधू, हस्ती न मस्तावला ॥
ज्यांचीं स्वच्छ शरदृतूंत पुलिनें त्या नीम्नगा, चंद्र ही ।
बीजेचा, प्रभु पात्र-दत्त-धन जो, हे शोभती सर्वही ॥ १ ॥

वामन.

येथें शाणोल्लेखमणी हें एकच कारण हर्षोत्पादनास पुरेसें असूनही आणखी अनेक कारणें त्याच कार्याच्या उत्पत्तीकरितां लागलेलीं आहेत असें वर्णन आहे. प्रस्तुत पद्यांतील सर्वच कारणें आनंदजनक असल्यामुळें येथें सद्वस्तूंचा योग जुळला आहे.

( ३ ) दुर्वार स्मरमार्गण, प्रिय दुरीं, उत्कंठिता मी मनीं ।
प्रेमा गाढ, नवीन यौवन, कुळीं विख्यात होई जनीं ॥
स्त्रीजाती अतिकातरा, स्मरसखा काल, क्षमा ही यमीं ।
दासी ही चतुरा न, हा विरह गे साहूं कशी सांग मी ॥ १ ॥

भाषांतर.

मदनाच्या बाणांनींच विरहावस्था दुःसह होते असें असूनही त्याच कार्याच्या उत्पादनासाठी प्रियकर दूर, मन अतिशय उत्कंठित झालेलें, अपार प्रेम, यौवनास नुकताच आरंभ झालेला, उत्तम कुळांत जन्म म्हणून स्वच्छंदानें वागतां न येणें, स्त्रीजाती म्हणून साहस करितां न येणें, मदनाचा परममित्र असा वसंतकाळ, यमाचे ठायीं क्षमा म्हणून तो प्राण हरण करीत नाहीं, व दासीही चतुर नसल्यामुळें नायकाची भेट करविण्यास असमर्थ आहेत हीं दुसरीं अनेक कारणें लागलेलीं आहेत; म्हणून हा समुच्चय अलंकार आहे. हीं सर्व कारणें विरहावस्था दुःसह करितात म्हणून येथें वाईट वस्तूंचा योग वर्णिला आहे.

( ४ ) चंद्राला दिवसा प्रकाश नसणें, ये कामिनीला जरा ॥
पद्मावीण जलें, निरक्षर मुर्खीं जो साजिरा गोजिरा ॥
दात्याला धनलोभ, नित्य असणें दारिद्र्य विद्वज्जनीं ॥
दुष्टाचा पगडा महीपति-गृहीं, हीं सात शल्यें मनीं ॥ १ ॥

वामन.

येथें ' चंद्राला दिवसा प्रकाश नसणें ' ही एकच गोष्ट मनास दुःख देणारी असून ' कामिनीला जरा ' ' पद्माविणें जल ' वगैरे दुसऱ्या वस्तु तेंच कार्य उत्पन्न करणाऱ्या आहेत असें वर्णिलें आहे. चंद्र हा स्वतः चांगला असून त्याला दिवसा प्रकाश नाहीं ही वाईट गोष्ट आहे. हाच प्रकार कामिनी, जल, इत्यादिकाविषयीं आहे; म्हणून येथें सदसद्योग म्हणजे चांगल्या गोष्टी विशिष्ट परिस्थितीमुळें वाईट भासतात अशा वस्तूंचा योग आहे.

दोन अथवा अधिक गुणांचा किंवा क्रियांचा जेथें युगपद्भाव वर्णिलेला असतो तेथेंही समुच्चय अलंकार होतो. क्रमानें उदाहरणें:—

( १ ) प्रादुर्भाव घनांचा होतां कज्जल-मलीन नभ होई ॥
रक्तत्व पांथहृदया, तरुणी-गंडासि पांडुता येई ॥ १ ॥

भाषांतर.

येथें मेघांमुळें आकाश काळें झाल्याबरोबर पांथांचें हृदय रक्त होतें व तरुणींचे गाल पांढरे होतात असें वर्णन आहे. या पद्यांत मलिनता, रक्तता, व पांडुता या तीन गुणांचा युगपद्भाव आहे.

**जेव्हां कृष्णग्रीवा मन्माला या युगासि गांठि घडे ।**
**त्याचि क्षणांत बाई ! खल-भूप-भ्रूलतांसि गांठि पडे ॥**

मोरोपंत.

येथें मित्रविंदेनें कृष्णाच्या गळ्यांत माळ घातल्याबरोबर प्रतिस्पर्धी राजांच्या भुवयांना आठ्या पडल्या असा सहभाव दाखविला आहे.

**उगवे नभीं शशी जों विरही जन दीर्घ टाकिती श्वास ।**
**हांसे मनीं मदन जो करितो तरुणांस प्रत्यहीं दास ॥**

भाषांतर.

येथें चंद्राचें उगवणें, विरही जनांचें श्वास टाकणें व मदनाचें हसणें या तिन्ही क्रियांचा युगपद्भाव ( एक समयावच्छेदेंकरून अस्तित्व ) वर्णिला आहे.

---

## ( ५० ) अनुमान.

तर्काच्या साहाय्यानें जेथें साधनापासून साध्याविषयीं ज्ञान होतें, म्हणजे अमुक एक गोष्ट घडल्यामुळें अमुक एक गोष्ट घडली असावी असा जेथें कोणी मनुष्य तर्क करितो तेथें **अनुमान** अलंकार होतो.

' साधन ' व ' साध्य ' या पारिभाषिक शब्दांचें थोडक्यांत स्पष्टीकरण करणें जरूर आहे. " पर्वतावर वन्हि आहे; कारण धूर दिसतो आहे " हें नेहमीचें उदाहरण घेऊं. ह्यांत ' वन्हि ' आहे असें सिद्ध करावयाचें आहे म्हणून 'वन्हि' यास ' साध्य ' असें म्हणतात. ज्याच्यायोगानें वन्हीचें अस्तित्व सिद्ध करावयाचें आहे त्यास ' साधन ' अथवा ' हेतु ' असें म्हणतात. प्रस्तुत उदाहरणांत धुराच्यायोगानें साध्याचें अस्तित्व सिद्ध करावयाचें आहे म्हणून ' धूर ' हा ' हेतु ' अथवा ' साधन ' आहे. ज्याच्यावर साध्य आहे असें सिद्ध झालें आहे त्यास ' पक्ष ' म्हणतात. वरील उदाहरणांत ' पर्वत ' हा पक्ष आहे. आतां साधन आणि साध्य यांच्यामध्यें व्याप्ति असेल तरच अनुमान खरें असतें. व्याप्ति म्हणजे नित्यसंबंध. जेथें जेथें धूर असतो तेथेंच वन्हि असतो ही व्याप्ति होय. पक्षावर साधनाच्यायोगानें जेव्हां साध्याचें अस्तित्व सिद्ध केलेलें असतें तेव्हां त्या प्रयोगास अनुमान असें म्हणतात. वरील प्रकारचें वर्णन जेव्हां कविप्रतिभानिर्मित असतें तेव्हां **अनुमान** अलंकार होतो.

उदाहरणें:—

( १ ) **जेथें या अतिचंचलाक्षि ललना स्वभ्रूलता फेंकिती ॥**
**तेथें हे पडतात मार्गण सदा, मर्मास जे भेदिती ॥**
**वाटे मन्मथ, कोपयुक्त स्वमनीं, ओढोनि चापा करीं ॥**
**अग्रे सत्वर धांवतो धरुनियां आज्ञा तयांच्या शिरीं ॥ १ ॥**

भाषांतर.

ह्या ठिकाणीं ' कटाक्षरूपी बाण तरुण जनांवर फेंकतात ' हें साधन आहे. ' चापधर मदन पुढें धांवतो ' हें साध्य आहे. ' ललना ' हा पक्ष आहे; व ' जेथें जेथें स्त्रिया कटाक्ष फेंकितात तेथें तेथें त्यांच्यापुढें मदन धांवतो ' अशी व्याप्ति आहे. अर्थात् ही व्याप्ति कविकल्पित आहे म्हणून हा **अनुमान** अलंकार होय.

( २ ) **कुरंगीशीं अंगें स्तिमित करि जी गान समयीं ।**
**पुसे दासींना ही प्रणयिजनवार्ता सुखमयी ॥**
**निजेना रात्रींही म्हणुनि मज वाटे, कुसुमिता ।**
**लता प्रेमाची ती स्मर करि जला सिंचुनि स्वतां ॥**

भाषांतर.

पहिल्या तीन चरणांत सांगितलेल्या लक्षणांवरून एका स्त्रीच्या अंगीं तारुण्योद्भव होऊं लागला असा तर्क होतो; म्हणून हा **अनुमान** अलंकार आहे.

( ३ ) **उष्ण श्वास न टाकिशी न अजुनी गालांवरी पांडुता**
**होतो दृष्ट-पदार्थ-बोध तुजला भ्रांतीविणें सर्वथा ।**
**गे निर्बाध कुलांगना-व्रत तुझें पाहून वाटे मला**
**कीं नंदात्मज–वेणुनाद सरले ! कर्णीं न तूं ऐकिला ॥**

**नारायण नरसिंह फडनीस.**

जर तूं वेणुनाद ऐकला असतास तर तूं उष्ण श्वास टाकिला असतास व गालांवर पांडुर वर्ण दिसावयास लागला असता व इतर चिन्हेंही तुझ्या शरीरावर दिसूं लागलीं असतीं; पण ज्या अर्थी असें झालें नाहीं व तुझें कुलवधूव्रत तसेंच चालू राहिलें आहे त्या अर्थी हे सरले ! तूं मुरलीध्वनि ऐकलाच नसशील असें वाटतें; ह्या तर्कामुळें येथें अनुमान अलंकार झाला आहे.

## ( ५१ ) काव्यलिंग.

[ काव्य=काव्याभिमत, लिंग=हेतु; काव्यहेतु. ]

कविप्रतिभानिर्मित हेतूनें जेव्हां एकाद्या अर्थाचें समर्थन केलेलें असतें तेव्हां **काव्यलिंग** अलंकार होतो. या अलंकारांत हेतु कधीं एक सबंध वाक्य असतें व कधीं एक पद असतें. क्रमानें उदाहरणें:—

**(१) शब्द तुझा मधुर परी वाटे हृदयीं वसे कपट फार।**
**वाढविती जे तुज त्यां सोडिशि, होतांचि कोकिला! थोर ॥ १ ॥**

कृष्णशास्त्री चिपळुणकर.

येथें कोकिलाच्या हृदयांत कपट आहे ह्या अर्थाचें समर्थन वरील पद्याच्या दुसऱ्या ओळींतील अर्थानें केलेलें आहे.

**( २ ) वारा, वणवा, थंडी, वीज अशीं तुज भयें बहुत असती।**
**वृक्षा करिं उपकारा; चंचल ही मृत्युलोकिंची वसती ॥ १ ॥**

कृ. चिपळुणकर.

येथें उपकार करण्याचें कारण ( हेतु ) मृत्यु-लोकची वस्ती चंचल आहे हें होय. येथें ' चंचल ही मृत्युलोकींची वसती ' एवढें पद हेतु आहे.

**( ३ ) रे माझ्या उजव्या करा! द्विजशिशू वांचावया सत्वरी।**
**टाकीं खड्ग विशंक होउनिच त्या शूद्रा तपस्व्यावरी ॥**
**टाकाया पटु जो वनीं प्रियसखी जी गर्भखिन्ना तशी।**
**रामाचें निजगात्र तूं असिसि, त्या तूतें दया कायशी ॥ १ ॥**

परशुरामपंत गोडबोले.

येथें ' तूतें दया कायशी ' ह्या पदाचा हेतु ' टाकाया पटु जो वनीं ' इत्यादि पद आहे. सीतेला टाकणाऱ्या कठोर-हृदयी रामाचेंच तूं ( करा! ) अवयव असल्यामुळें तुला दया येणार नाहीं असा भावार्थ.

**( ४ ) पुन्हा जन्मा आलों!! म्हणुनिच पुरारे! समजलें।**
**न पूर्वींच्या जन्मीं नमन तुज केव्हांहि घडलें ॥**
**प्रणामें मुक्तातें पुढति नमनीं संभव नसे।**
**क्षमा कीजे मातें सहुनि अपराधद्वय असे ॥**

भाषांतर.

येथें पूर्वजन्मीं 'नमन तुज न घडलें' हें एक पाप; व नमस्कार करून या जन्मीं मुक्ति मिळणार असल्यामुळें पुढील जन्मीं 'नमनीं संभव नसणें' हें दुसरें पाप. हीं दोन्ही क्रियारूप असून वाक्यार्थानें दर्शविलीं आहेत व 'अपराधद्वय' हें जें कार्य त्याचीं, त्या नमन न करणें ह्या दोन क्रिया, कारणें होत. येथें कारण-दर्शक शब्दाचा उल्लेख न करितांच कार्यकारणभाव वर्णिला आहे म्हणून हा **काव्यलिंग** अलंकार आहे.

**( ५ ) जयाच्या उद्धाराविषयिं बहु तीर्थेंहि पळतीं**
**स्वकानीं हस्तातें मग हरिहरादीक धरिती ।**
**असा मी त्या मातें पुनित करिशी तूं जननिये !**
**जगीं पापघ्नांच्या हरसि गुरुगर्वास सदये ॥**

वामनपंडित.

येथें 'पापघ्नांच्या गुरुगर्वास' हरण करणें हें कार्य जगन्नाथ पंडितांच्या गंगास्नानानें पुनित ( पावन ) होण्यामुळें घडणारें आहे व 'तीर्थें पळती' व 'हरिहरादिक स्वकानीं हस्त धरिती' या दोन वाक्यांमध्यें इतर कारणांचें क्षुद्रत्व वर्णिलें असून तीं पावनसामर्थ्यात कमी आहेत असे दर्शविलें आहे. येथें हेतु-वाचक शब्दाचा उल्लेख न करितांच कार्यकारणभाव कथन केला आहे.

---

## ( ५२ ) भाविक.

[ भावाय साक्षात्काराय प्रभवति इति भाविकं, प्रत्यक्षीकरणम्. ]

पूर्वीं झालेल्या व पुढें होणाऱ्या गोष्टी सध्यां आपल्या डोळ्यांसमोर घडत आहेत असें जेथें वर्णन असतें तेथें **भाविक** अलंकार होतो. जसें:—

**( १ ) स्मरतें कीं तें जे श्रीगुरुदारांहींच इंधनानयना ॥**
**पाठविलें विपिनाला, माझ्या दिसतें तपोधना ! नयना ॥ १ ॥**

मोरोपंत.

कृष्ण सुदामजीस म्हणतो, गुरुभार्येनें आपणास लांकडें आणावयास पाठविलें तें मला आतां माझ्या डोळ्यांसमोर दिसत आहे. येथें दुसऱ्या ओळींत **भाविक** अलंकार आहे.

( २ ) अद्यापि ते श्रुतिमनोहर मंजु वाणी
जी वर्णिली कुशल किन्नर गायकांनीं ।
जीच्या पुढें परुष ते रव वल्लकीचे
माते स्मरे अखिल जें स्थल रंजनाचें ॥ १ ॥

अद्यापि ते कनकचंपकगौर काया
माझ्या समोर दिसते; परि हाय ! वायां ।
जी जिंकते रुचिरता नवपल्लवांची
धन्या अशी भुजलता झणिं सुंदरीची ॥ २ ॥

विठ्ठल भगवंत लेंभे.

येथे दिवंगत प्रियकरणीचे वीण्याप्रमाणें मंजुळ शब्द अद्यापि देखील कानांत घुमतात व तिची गौर कायाही डोळ्यांसमोर दिसत आहे असें वर्णन आहे.

( ३ ) सखे माझे परतोनि घरा येतां
तुवां सजणें हा समाचार घेतां ।
तया शोकें घायाळ हृदय होतां
कशी होशिल तें आठवितों आतां ॥ १ ॥

थोर होतिल बाळकें तुझीं बाळे
तुला कामा येतील वेल्हाळे ।
माय माझी बैसेल शोकशाळे
मला आठवितां हृदय तिचें पोळे ॥ २ ॥

रघुनाथ पंडित.

येथें पुढें घडून येणाऱ्या स्थितीचें चित्र डोळ्यांसमोर दिसतें आहे असें वर्णन आहे.

अथवा,

( ४ ) जैसें कज्जल पूर्वीं, आतांही तें तसेंच कीं नयनीं ॥
वस्त्रालंकारांची भावी शोभा दिसे मला रमणी ! ॥ १ ॥

भाषांतर.

येथें काजळाची पूर्वींची शोभा व वस्त्रालंकारांची भावी शोभा हीं दोन्ही सांप्रत डोळ्यांसमोर दिसत आहेत असें वर्णिलें आहे.

## ( ५३ ) सार अथवा उदार.

[ सार=उत्कर्ष, सीमा ]

पूर्वी आलेल्या वस्तूंपेक्षां मागाहून येणाऱ्या वस्तूंचें क्रमाक्रमानें गुणाधिक्य वर्णून अगदीं शेवटीं गुणाची परमावधि झाली असें जेथें वर्णन असतें तेथें **सार** नामक अलंकार होतो. यासच **उदार** असेंही म्हणतात. जसें:—

चांगल्या गोष्टींच्या उत्कर्षाचीं उदाहरणें:—

**( १ ) वाहे महीते स्वशिरीं फणींद्र तो ।**
**पाठीवरी कूर्म तयास वाहतो ॥**
**त्यालाहि घे सागर मांडियेवरी ।**
**थोराचिये थोरिव जाण यापरी ॥**

वामन पंडित.

पृथ्वी अगोदरच फार मोठी; तिला आपल्या **फणांवर** धारण करणारा शेष सामर्थ्यानें मोठाच; त्या शेषालाही धारण करणारा सागर त्याहूनही मोठा; याप्रमाणें हे एकापेक्षां एक वरचढ आहेत असे येथें वर्णिलें असल्यामुळें हा **सार** अलंकार झाला आहे.

**( २ ) पटुत्व सकलेंद्रियीं, मनुजता, सुवंशीं जनि ।**
**द्विजत्वहि दिलें भलें बहु अलभ्य जें कीं जनीं ॥**
**यशःश्रवण-कीर्तनीं रुचि दिली तरी हा बरा ।**
**म्हणे अखिल याच कीं अखिल याचकीं हावरा ॥**

येथें सर्व इंद्रियें कार्यक्षम, मनुष्यजन्म, कुलीनता, द्विजत्व व हरिसंकीर्तनाचे ठायीं अभिरुचि ह्या सर्व गोष्टी क्रमानें अधिकाधिक आहेत. आतां हावऱ्याला मुक्ति मात्र पाहिजे आहे ! म्हणून हा सार अलंकार होय.

आल्हादकारक न वाटणाऱ्या गोष्टींचा क्रमानें उत्कर्ष. जसें:—

**( १ ) आधींच भीषण निशा तम त्यांत घोर**
**चोहींकडे वन भयंकर, भीति थोर ।**
**येतां अशांत तव तापद शब्द कानीं**
**घोर स्थितीस जणुं पूर्ण दशेसि आणी ॥**

राम गडकरी.

येथें अप्रिय वस्तूंचा उत्कर्ष वर्णिला आहे.

(२) अत्यंत कष्टद असे सतत प्रवास
त्याहून कष्ट बहु दे परगेहवास ।
त्याहूनिही अधिक कष्टद नीच सेवा
दारिद्य कष्ट वितरी नच तो वदावा ॥

महादेव नारायण काळे.

(३) आधींच मर्कट तशांतहि मद्य प्याला ॥
झाला तशांत जरि वृश्चिक-दंश त्याला ॥
झाली तयास तदनंतर भूतबाधा ॥
चेष्टा वदूं मग किती कपिच्या अगाधा ॥ १ ॥

जुनें चवथें पुस्तक.

मर्कटाच्या चेष्टा अगोदरच चमत्कारिक असतात व निर्दिष्ट केलेल्या कारणांनीं त्यांचा विचित्रपणा वाढत जाऊन शेवटीं त्याची परमावधि झाली असें वर्णन येथें आहे.

अथवा,

(४) कुंतीस काय सांगूं कृष्णेला दाखवूं कसें वदन ॥
दुष्कर मला सुभद्रा-सांत्वन, दुर्दर्श उत्तरासदन ॥ १ ॥

मोरोपंत.

येथे पहिलें कृत्य कठीण आहे, दुसरें त्याच्यापेक्षां कठीण आहे, तिसरें त्याच्याही पेक्षां कठीण आहे व शेवटचें तर अत्यंत कठीण आहे; त्याप्रमाणें कठिणत्व क्रमानें वाढत गेलें आहे. त्याचप्रमाणें अर्जुनास वाटणारी लाजही क्रमाक्रमानें वाढत जाऊन शेवटीं तिचा अगदीं कळस झाला आहे म्हणून हें **सार** अलंकाराचें उदाहरण होय.

जेथें पूर्वीच्या वस्तूंपेक्षां मागाहून येणाऱ्या वस्तूंच्या गुणांचा क्रमाक्रमानें अपकर्ष वर्णिला असून शेवटीं गुणांच्या अपकर्षाची परमावधि होते तेथेंही **सार** अलंकार होतो. जसें—

(१) झालों रणीं न विजयी पळुनीहि येई
वस्ती करूनि मग येथ गिरींत राहीं ।

**नीचा कृती करुनि पूर्वज भूमिपालां**
**लावी कलंक, मज नष्ट कसा न केला ॥**

काव्यरत्नावली, आनदीरमण.

येथें पराभव पावणें, पळून जाणें, डोंगरांत वस्ती करणें व नीच कृत्यें करणें यामुळें गुणांचा उत्तरोत्तर ऱ्हास झाला असें वर्णिलें आहे; म्हणून हें अपकर्ष साराचें उदाहरण आहे.

**( २ ) पूर्वीं अमात्य बहुमान्य हि जो सदैव ।**
**झालाचि लेखक पहा फिरतांचि दैव ॥**
**होई पदाति मग कीं बहुरूपधारी ।**
**सस्त्रीक नित्य फिरतो हतधी भिकारी ॥ १ ॥**

भाषांतर.

जो मनुष्य पहिल्यानें आमात्य होता तोच क्रमाक्रमानें कारकून, सैनिक, बहुरूपी व शेवटीं भिकारी होऊन व वेड लागून आपल्या स्त्रीसह दारोदार भिक्षा मागून पोट भरतो आहे असें येथें वर्णन आहे.

---

## ( ५४ ) एकावली.

पूर्वीं आलेल्या प्रत्येक वस्तूचें ( विशेष्याचें ) नंतर आलेली वस्तू जेव्हां विशेषण होते व जेव्हां तें विशेषण विधिवाचक अथवा निषेधवाचक असतें तेव्हां **एकावली** अलंकार होतो. वरील प्रकारचे विधि अथवा निषेध अनेकवार आले तरच वर्णनास आल्हादजनकत्व प्राप्त होतें; एरव्हीं नाहीं. जसें:—

**( १ ) अंतःपुरें युक्त वरांगनांनीं ॥**
**वरांगना रूपगुणेंचि मानी ॥**
**रूपेंहि त्यांचीं सुविलास-युक्त ॥**
**विलास ते कीं शर काम-मुक्त ॥ १ ॥**

भाषांतर.

या ठिकाणीं अंतःपुरांचें वरांगना, वरांगनाचें रूप, रूपाचें विलास आणि विलासांचें शर येणेंप्रमाणें पूर्व–पूर्व वस्तूंस उत्तरोत्तर वस्तु विशेषणें आहेत असें स्थापन केलेलें आहे. येथें विधि आहे.

**( २ ) न वारि तें जेथ न पंकजें तीं**
**न पंकजें ज्यांत न भृंगपंक्ति ।**
**न भृंग तो जो नच मंजु गुंजे**
**न गुंज ज्यानें नच चित्त रंजे ॥**

भाषांतर.

येथे पाण्यास पंकज, पंकजास भृंग, भृंगास गुंजन व गुंजनास चित्तरंजन अशीं पूर्व पूर्व वस्तूस उत्तरोत्तर वस्तु निषेधवाचक वाक्यरूप विशेषणें आहेत.

**( ३ ) नव्हे सभा जी नच वृद्ध जींत ।**
**न वृद्ध ते धर्म न दावितात ।**
**न धर्म तो ज्यांत वसे न सत्य ।**
**न सत्य तें जें छलना-प्रयुक्त ॥**

महादेव नारायण काळे.

येथेंही पूर्व-पूर्व वस्तूंस उत्तरोत्तर वस्तु निषेधवाचक विशेषणरूप आहेत.

मागाहून आलेली वस्तु ( विशेषण ) पूर्वी आलेल्या वस्तूचें विशेष्य होतें व त्याच क्रमानें जेथें अनेकवेळां विधान केलेलें असतें तेथेंही **एकावली** अलंकार होतो. उदाहरणः—

**( ४ ) धर्मेंचि राया ! तव बुद्धि शुद्धा ॥**
**बुद्धीमुळें श्रीहि असे निबद्धा ॥**
**श्रीनेंच होतें सुख सर्व लोकां ॥**
**लोकेंच नेलें यश कीं त्रिलोका ॥ १ ॥**

भाषांतर.

या ठिकाणीं धर्मानें बुद्धि, बुद्धीनें लक्ष्मी, लक्ष्मीनें लोक व त्यानें कीर्ति पसरली असे वर्णन आहे. येथें धर्मानें, बुद्धीनें, लक्ष्मीनें व लोकांनीं हे शब्द विशेषणात्मक आहेत; व नंतर आलेलें विशेषण जें ' बुद्धी ' ( बुद्धीनें ) तें पूर्वी आलेलें विशेषण जें ' धर्मानें ' याचें विशेष्य झालेलें आहे. हाच क्रम पुढेंही आहे.

वरील पद्यांत धर्म बुद्धीला, बुद्धि लक्ष्मीला, याप्रमाणें पूर्व-पूर्व वस्तु उत्तरोत्तर वस्तूला उपकारक झाल्यामुळें **एकावली**चा हा प्रकार व **मालादीपक** यांमध्यें कांहींच फरक नाहीं; तेव्हां मालादीपक हा दीपकाचा प्रकार न मानितां तो **एकावली**चाच एक भेद आहे असें मानणें चांगलें, असें जगन्नाथ पंडितांचें मत आहे.

---

## ( ५५ ) कारणमाला.

पूर्व-पूर्व कारण उत्तरोत्तर कार्यांचें उत्पादक असतें असें जेथें वर्णन असतें तेथें, अथवा पूर्व-पूर्व कार्य उत्तरोत्तर कारणामुळें घडलें असें जेथें वर्णन असतें तेथें **कारणमाला** अलंकार होतो. जसें:—

**( १ ) मिळे किं पुण्यें गृहिणी मनोज्ञ ॥**
**तिचेमुळें पुत्र पवित्र सुज्ञ ॥**
**तयांमुळें कीं यश होय लोकीं ॥**
**तयें यशें नांदति नाकलोकीं ॥ १ ॥**

गंगाधरशास्त्री.

येथे पुण्यामुळें स्त्री, स्त्रीमुळें पुत्र, पुत्रांमुळें कीर्ति आणि कीर्तीमुळें स्वर्गवास ह्याप्रमाणें पूर्व-पूर्व कारण उत्तरोत्तर कार्यांचें उत्पादक झालेलें आहे.

**( २ ) घडे रौरवीं वास कीं पातकानें ॥**
**घडे पाप दैन्यें बुधालाहि जाणें ॥**
**खरें दैन्य येतें नरा अल्पदानें ॥**
**करीं दान रे मानवा सन्मनानें ॥ १ ॥**

भाषांतर.

येथें रौरव पापामुळें, पाप दैन्यामुळें व दैन्य अल्पदानामुळें येणेंप्रमाणें पूर्व-पूर्व कार्य उत्तरोत्तर कारणामुळें घडलें असें वर्णन आहे.

**(३) विद्या दे विनयास विनय तो दे पात्रत्व नरासी**
**पात्रत्वें धन धनें धर्म तो पावे मग सुखराशी ॥**

शि. रा. नित्सुरे.

येथेंही कारणांची माला आहे.

---

## ( ५६ ) सूक्ष्म.

एकादी गोष्ट अगदीं नाजुक असून ती तज्ज्ञ अथवा मार्मिक मनुष्याचे कोणत्या तरी रीतीनें ध्यानांत येऊन तीच गोष्ट तो दुसऱ्यास मर्मज्ञानसूचक अथवा साभिप्राय चेष्टांनीं अथवा हावभावांनीं कळवितो असें जेथें वर्णन असतें तेथें **सूक्ष्म** अलंकार होतो. जसें:—

**( १ ) हेम-जंबीर पैं कान्त हातीं धरी ।**
**खेळवी त्यास देखोनिया सुंदरी ॥**
**सूर्य रेखाटिला चित्र-भित्तीवरी ।**
**चंद्र-बिंबानना बिंदु दे त्यावरी ॥**

विठ्ठल कवि.

येथें हेमजंबीरानें परस्परांचें क्रीडौत्सुक्य दर्शविलें आहे. ‘ सूर्य रेखाटिला ’ यावरून संकेत समय नायकानें सायंकाळ ( सूर्यास्ताच्या सुमारास ) दर्शविला आहे. पण त्यावर बिंदु देऊन प्रणयिनीनें चंद्रोदयानंतरचा काल सुचविला आहे.

**(२) कोणी युवा सत्वर ये घराला । घेवोनिया वंजुल-मंजरीला ॥**
**देखोनि त्याला चलचित्त होई । गळोनि तीचा मग मान जाई ॥**

रूपांतर.

स्वतः संकेत करूनही संकेत स्थानीं न गेलेल्या तरुणीस तिच्या घरीं जाऊन एका तरुणानें त्या स्थानापासून खूण म्हणून आणलेली अशोक ( वंजुल ) मंजरी दाखविली. त्यामुळें तिचें मन चंचल व खिन्न झालें. या ठिकाणीं अशोकमंजरी-मुळें एकमेकांस संकेताची आठवण पटली. ती तशी दुसऱ्यास पटली नसती म्हणून येथें सूक्ष्म अलंकार झाला आहे.

---

## ( ५७ ) व्याघात.

[ व्याहति=नाश, त्याचा हेतु ].

ज्या उपायांनीं एकादा मनुष्य एकादी गोष्ट सिद्धीला नेतो त्याच गोष्टीचा त्याच उपायांनी दुसरा एकादा मनुष्य विघात करितो असें जेथें वर्णन असतें तेथें **व्याघात** अलंकार होतो. जसे—

**( १ ) तोडी दीनतरूंना दुर्जन-गण तो सदैव वचनांहीं ॥**
**वचनांनींच सतांच्या पल्लव फुटती तयास बा पाहीं ॥ १ ॥**

भाषांतर.

ज्या उपायांनीं दुर्जन आपलें कार्य साधितो त्याच उपायांनीं सज्जन त्या कार्याचा विघात करितो असें येथें वर्णिलें आहे.

**( २ ) 'प्रिया' म्हणुनि ठेविशी मज घरींच नाथा ! जरी ॥**
**तुझ्यावरिल राग हा क्षणहि राहुं देना तरी ॥**
**'असे प्रकृतिभीरु ही,' तरि धरूनि बाव्हंतरीं ॥**
**करीं मज सुशांत वा सकल भीतिला तूं हरीं ॥**

भाषांतर.

वरील पद्यांत प्रेम हा उपाय अथवा साधन आहे व ह्या उपायानें राम सीतेस घरीं ठेवण्याचा प्रयत्न करीत होता व सीताही रामाबरोबर वनवासास जाण्याचा प्रयत्न करीत होती. शेवटच्या दोन चरणांत सीतेचें भीरुत्व हा उपाय असून त्यानें राम सीतेस घरीं ठेवण्यास व सीता वनवासास जाण्यास यत्न करीत होती. अशा रीतीनें एकाच उपायानें परस्पर परस्परांच्या अर्थाचा विघात करीत होते असें येथें वर्णिलें आहे.

---

## ( ५८ ) अलंकार-संसृष्टि आणि अलंकार-संकर.



आतांपर्यंत ज्या अलंकारांचें निरूपण केलें त्यांत एकाच प्रधान अलंकाराचें विवेचन केलेलें आहे. परंतु क्वचित् दोन किंवा अधिक अलंकार एकत्र आल्यानें अर्थाला विशेषच शोभा येते. जेव्हां दोन किंवा अधिक अलंकार एकाच पद्यांत पृथक् पृथक् ग्रथित केलेले असतात पण छायाऽऽदर्श[१] किंवा तिलतंडुलें[२]-न्यायानें त्यांची निवड करितां येते तेव्हां **अलंकार-संसृष्टि** ( समान उत्पत्ति किंवा संभव) नामक अलंकार होतो. पण अलंकारांचें संमिश्रण जेव्हां जास्त गुंतागुंतीचें असतें व पांसुपानीय[३] किंवा नीरक्षीरन्यायानें[४] त्यांच्यांतील आस्वाद घेतां येतो पण अगदीं स्वतंत्र रीतीनें घेतां येत नाहीं तेव्हां **अलंकार-संकर** होतो.

---

( १ ) छायाऽऽदर्शन्याय म्हणजे ज्याप्रमाणें आरश्यांतील प्रतिबिंब मूळच्या आकृतीपेक्षां भिन्न असतें तसें. ( २ ) तिलतंडुल न्याय म्हणजे तीळ व तांदूळ एकत्र केलेले असले तरी वेगवेगळे करितां येतात तसें. ( ३ ) मातीच्या कणांनीं गढूळ झालेल्या पाण्याप्रमाणें; ( ४ ) दूध आणि पाणी मिसळल्याप्रमाणें; भिन्न न करितां येण्यासारखे.

---

## ( अ ) अलंकार-संसृष्टि.

शब्दालंकार व अर्थालंकार ह्यांपैकीं दोन किंवा अधिक अलंकार एकाच पद्यांत आलेले असून ते एकमेकांवर अवलंबून न राहतां जेव्हां पृथक् पृथक् आहेत असे दिसतें तेव्हां **अलंकार-संसृष्टि** होते.

अलंकारांची संसृष्टि तीन प्रकारांनीं होतेः–( १ ) दोन शब्दालंकारांची संसृष्टि; ( २ ) एक शब्दालंकार व एक अर्थालंकार यांची संसृष्टि; व ( ३ ) दोन अर्थालंकारांची संसृष्टि.

( १ ) शब्दालंकारांची संसृष्टि. जसें:—

**( १ ) प्रिय-सुत-विरह सुदुःसह, देह-विरह बहु बरा सु-सह देवा ॥**
**पावेन कधीं बा मी म्हणतें स्वबहिश्चरासु सहदेवा ॥ १ ॥**

मोरोपंत.

वरील पद्यांत ‘ स ’ आणि ‘ ह ’ या वर्णांचा अनुप्रास आहे व ‘ रासुसहदेवा ’ ह्या अक्षरांनीं यमक साधिलें आहे; ह्मणून येथें अनुप्रास व यमक या दोन शब्दालंकारांची संसृष्टि झालेली आहे.

**( २ ) पाहोनि ताप बहुतापरि तापसाचा ॥**
**पावे तयापरिस तो परिताप साचा ॥**
**दे चक्र ताप पळमात्र तपोनिधीते ॥**
**ज्याच्या तसा सुकठिना न तपोनि धीते ॥ १ ॥**

मोरोपंत.

येथें ‘ ताप ’ व ‘ परि ’ यांनीं अनुक्रमें वृत्त्यनुप्रास व छेकानुप्रास व ‘परितापसाचा ’ व ‘ तपोनिधीते ’ यांनीं यमकें साधिलीं आहेत; म्हणून येथें तीन शब्दालंकारांची संसृष्टि आहे.

(२) शब्दालंकार व अर्थालंकार यांची संसृष्टि. जसें:—

**( १ ) जातां कुरुकटकावरि वाजविला दिव्य देवदत्तदर ॥**
**तो होय जनां जैसा कल्पांतीं रुद्रदेव दत्तदर ॥ १ ॥**

मोरोपंत.

येथें ‘ क ’ व ‘ द ’ यांचे अनुप्रास, देवदत्तदर या अक्षरांचे यमक व शेवटीं उपमा आहे. हें शब्दालंकार व अर्थालंकार यांच्या संसृष्टीचें उदाहरण होय.

**( २ ) अति मृदुला करवल्ली सलील हि जीं सनाल कीं कमळें ॥**
**अद्भुत वदनश्रीची सुषमा जी पाहतां मृगांक मळे ॥ १ ॥**

मोरेश्वर कवि.

येथें वरच्या ओळींत ' ल ' या वर्णाचा अनुप्रास व खालच्या ओळींत व्यतिरेक या दोन अलंकाराची संसृष्टि आहे.

(३) अर्थालंकारांची संसृष्टि. जसें:—

**( १ ) उतरे, चढेहि, वर्षे, गर्जे, पाडी घनांधकारातें ॥**
**प्राप्तनवश्रीपुरुषापरि मेघ धरी अनेक रूपांतें ॥**

प. ना. गोडबोले.

येथें पहिल्या ओळींत कारकदीपक व दुसऱ्या ओळींत उपमा या दोन अर्थालंकारांची संसृष्टि आहे.

**( २ ) लिंपी तम जणुं अंगा, जलधर करिती किं कज्जला वृष्टि ॥**
**दुर्जन सेवेसम गे सुभगे ! होतेचि निष्फला दृष्टि ॥ १ ॥**

भाषांतर.

येथें पहिल्या ओळींत उत्प्रेक्षा व दुसऱ्या ओळींत उपमा या दोन अर्थालंकारांची संसृष्टि झालेली आहे.

**( ३ ) हा मेघ आर्द्रमहिषोदर-तुल्य काळा**
**शंखाकृती धरि करांत बलाकमाला ॥**
**विद्युत्प्रभा वसन पीत धरोनि कासे**
**विष्णूच आक्रमितसे गगनांत भासे ॥**

परशुरामशास्त्री गोडबोले.

येथें प्रथम चरणांत ' तुल्य ' शब्दामुळें उपमा अलंकार झाला आहे. ' विद्युत्प्रभावसन ' या पदामुळें रूपकही आहे व शेवटच्या चरणांत उत्प्रेक्षा अलंकार आहे म्हणून येथें तीन अलंकारांची संसृष्टि आहे.

**( ४ ) भासें कौरवराष्ट्र-तुल्य नभ हें जें अंधकारा धरी**
**हर्षानें बहु गर्जना करि शिखी दुर्योधनाचे परी**
**द्यूतीं निर्जित धर्मसा पिक वनीं आला असे संप्रती ।**
**गेले स्त्री-सह हंस-पांडव तसे अज्ञातवासाप्रती ॥**

परशुरामपंत गोडबोले.

येथें उपमा व रूपक ( हंस-पांडव ) या अलंकारांची संसृष्टि आहे.

## ( आ ) अलंकार-संकर.

एकाच पद्यांत दोन अथवा अधिक अलंकार असून त्यांचें जेव्हां मिश्रण असतें म्हणजे त्यांच्यापैकीं कोणालाही स्वतंत्र अस्तित्व नसतें तेव्हां **अलंकार-संकर** होतो. ह्याचे ( १ ) अंगांगिभाव-संकर, ( २ ) संदेह-संकर व ( ३ ) एकपदाश्रित-संकर, असे तीन भेद आहेत.

१ अंगांगिभाव संकरामध्यें एक अलंकार प्रधान असून बाकीचे अलंकार गौण असतात. तथापि सर्वच अलंकार परस्परांस उपकारक असतात. जसें:—

**( १ ) कोणी वणिग्जन विकी तुळितां तराजें ॥**
**कस्तूरिका तिजसवें अलिनी विराजे ॥**
**दोन्ही समान निरखी विकणार देतो ॥**
**घेणार तो न समजोनि उगाच घेतो ॥ १ ॥**

रघुनाथ पंडित.

वरील पद्यात कस्तूरीच्या देवघेवीचा जो प्रकार वर्णिला आहे त्यावरून कुण्डिन-नगरीच्या संपदातिशयाचा बोध होतो ह्मणून येथें उदात्त अलंकार प्रधान आहे. तसेंच ह्या अलंकारास अंगभूत असा भ्रांतिमान् अलंकारही येथें आहे. त्याच-प्रमाणें ह्या पद्यांत कस्तूरी व अलिनी यांच्यांतील साम्यामुळें मीलित व सामान्य या अलंकारांचीही छटा दिसून येते. ह्या सर्व अलंकारांमध्यें अंगांगिभावसंबंध असून ते परस्परांस उपकारक झाले आहेत; यामुळें वरील पद्यास विशेष रमणी-यता प्राप्त झाली आहे.

**( २ ) हस्तीं माला स्फटिकमय; ती दाडिमांच्या बिजांची-**
**भ्रांती पेसी उपजवि शुकीं, कांति जीच्या नखांची ॥**
**ये ओढाया फिरफिरुनि तो[1], जो[2] निवारी तयास**
**होवो भूतिप्रद[3] मज तुझा वाणि[4] ! तो मंद हास ॥**

भाषांतर.

येथें सरस्वतीच्या नखाच्या रक्त कांतीनें लालसर झालेल्या स्फटिकमाळेवर राघु डाळिंबाचे दाणे समजून झडप घालीत होता; पण तिचा हास ( हास्य ) स्फटिक मण्यांस पुन्हा शुभ्रपणा देऊन राघूचा भ्रम नाहींसा करून त्यास (राघूस) निवारीत होता असें वर्णन आहे.

---

( १ ) शुक ( २ ) हास; हास्य. ( ३ ) कल्याणकारक ( ४ ) सरस्वती.

नखांच्या कांतीनें स्फटिकास रक्तत्व आलें म्हणून **तद्गुण** अलंकार; शुक एक वेळच नाहीं तर अनेकवार ती माळ ओढण्यास येत होता म्हणून **भ्रांतिमान्** व सरस्वतीच्या हास्यानें त्या रक्तवर्ण स्फटिक माळेस शुभ्रत्व येत होतें म्हणून पुन्हा **तद्गुण ( पूर्वरूप )** अलंकार अशा दोन अलंकारांचें येथें संमिश्रण आहे. येथें तद्गुण अलंकार प्रधान असून भ्रांतिमान् अलंकार तद्गुण अलंकारामुळेंच साधला गेला असल्यामुळें गौण आहे; म्हणून हा अंगांगिभाव-संकर आहे.

**क्रीडेमाजि तुटोनि हार गळले, दासीजनीं लोटले ।**
**मुक्तांचे सर प्रांगणीं पदतळीं लाक्षारसें रंगले ॥**
**क्रीडा-कीर तयांस ओढति दुरीं दाळिंबबीजभ्रमें ।**
**ऐसी पंडितगेहिं भोजकृत कीं औदार्यलीला गमे ॥**

भाषांतर.

येथें एका पंडिताच्या घरांतील संपत्तिसमृद्धीच्या वर्णनावरून भोज नगरींतील लोकांच्या महदैश्वर्याची कल्पना होते म्हणून उदात्त अलंकार झाला आहे. रक्तवर्ण मोत्यांस दाळिंबाचे दाणे समजून राघु त्यांवर झडप घालतात म्हणून भ्रांतिमान् अलंकारही आहे. म्हणून येथें उदात्त व भ्रांतिमान् यांचा **अंगांगिभाव-संकर** आहे. कुवलयानंदकार व तन्मतानुयायी कांहीं अलंकारशास्त्रज्ञ येथें **तद्गुण** अलंकारही झाला आहे असें म्हणतात. पण लाक्षारसाची लाली दुरूनच जर मोत्यांवर चढली असती तर तो अलंकार झाला असता; पण येथें लाक्षारसयुक्त पायांखालीं तीं प्रत्यक्ष तुडविलीं गेल्यामुळें त्यांवर लाक्षारसाचें पुट चढलें व म्हणून त्यांस लाली आली असें वर्णन असल्यामुळें हा तद्गुण अलंकार झालेला नाहीं. याच पद्यांतील त्यांनीं सांगितलेले इतर अलंकारही विशेष चमत्कारजनक नाहींत.

२. दोन किंवा अधिक अलंकारांचा एकाच पद्यांत समावेश झाला असून त्यांच्यापैकीं हा अमुक अलंकार आहे व तो अमुक अलंकार नाहीं अशाविषयीं जेव्हां साधक बाधक प्रमाणें देतां येत नाहींत व त्या पद्यांत कोणते अलंकार आहेत याविषयीं वाचकांचा निश्चय होत नाहीं तेव्हां **संदेह-संकर** होतो. जसें:—

**( १ ) पृच्छा पार्वति शंकराप्रति करी हें काय आहे शिरीं ॥**
**प्यालों मी विष तें दहा बहु करी स्वर्गांबु माथां धरीं ॥**
**स्वर्गांबू वदसी तरी वदन कां त्या चंद्रचूडामणी ॥**
**नोहे आनन हें सुपंकज असे, हें सत्य माना मनीं ॥ १ ॥**

**केलें हें प्रभु मान्य मीं परि तया कां नेत्र हो दीसती ॥**
**नोहे लोचन मीन ते तळपती पृच्छा करीसी किती ॥**
**कैशा शोभति भ्रूलता कथिं मुखें हें तूं मला त्र्यंबका ॥**
**ते कांते अतिवक्रताचि उद्कीं हेलावती वीचिका ॥ २ ॥**

सदाशिव कवि.

शिव व पार्वती यांचा कलह झाल्यावर शिव वनांत निघून गेला व चैन पडेना म्हणून त्यानें जान्हवीस वरिलें. पुढें पार्वती विरहानें फार दुःखित आहे असें नारदांनीं त्यास सांगितल्यावरून तो तिच्या भेटीस निघाला. परंतु गंगेनें बरोबर जाण्याचा अत्याग्रह धरिल्यामुळें त्यानें तिला आपल्या जटेमध्यें लपविलें. ही गोष्ट पार्वतीच्या लक्षांत येऊन तिनें शंकरास वरील प्रश्न केले आहेत.

वरील उदाहरणांत एक लपविलेली गोष्ट कशीतरी उघडकीस आल्यानंतर ती अन्य मिषानें लपविण्याचा प्रयत्न केला आहे म्हणून **व्याजोक्ति अलंकार** झाला आहे. तसेंच आनन नेत्र इत्यादि प्रकृत पदार्थाचा निषेध करून पंकज, मीन इत्यादि अप्रकृत पदार्थाचा आरोप केल्यामुळें **अपन्हुति** अलंकारही झाला आहे; ह्या दोन अलंकारांचें अस्तित्व स्वतंत्रपणें नसल्यामुळें येथें व्याजोक्ति व अपन्हुति या दोन अलंकाराचा **संदेह-संकर** आहे.

**( २ ) मोठे संयमशील[1] केश नयन श्रुत्यंत[2] ही पावले**
**अंतर्वक्र सुनिर्मल द्विजगणीं[3] जें सर्वदा सेविलें ।**
**मुक्तांचा[4] सतताधिवास हृदयीं सद्वृत्तता[5] ही स्तनीं**
**ऐसें शांत[6] शरीर ताप करितें कां सांग वो कामिनी ॥**

वामन पंडित.

येथे शांत शरीरच तापदही आहे असे वर्णिलें आहे.

---

१ निग्रह करून सन्मार्गानें वागणारे, ( पक्षीं– ) बांधलेले.
२ वेदाध्ययन पूर्ण केलेले; ( पक्षीं– ) कर्णप्रान्त, कानशील.
३ पुण्यशील ब्राह्मणांनीं; ( पक्षीं– ) शुभ्र दंतपंक्तीनें.
४ मोत्यांचा; ( पक्षीं– ) मुक्त स्थितीप्रत गेलेल्या साधूंचा.
५ चांगले वागणारे; वाटोळेपणा.
६ शांतियुक्त.

येथें विशेषणें शांत शरीराला व तापद शरीरालाही लागू पडतात म्हणून श्लेषालंकार आहे. शांत शरीरास लागू पडणाऱ्या श्लिष्ट विशेषणांनी एकाद्या तपस्विनीची कल्पना होते व तापद शरीरास लागू पडणारीं विशेषणें घेतलीं तर एकाद्या कामिनीचा बोध होतो म्हणून येथें समासोक्ति अलंकार आहे. एकाच स्त्रीस वरील श्लिष्ट विशेषणें लाविल्यास स्वभावतः शांत शरीर विशेष कारणांनी तापद होतें म्हणून विरोधाभास अलंकारही आहे. परंतु अमुक अलंकार प्रधान व अमुक अलंकार गौण असा निर्धार होत नसल्यामुळें येथें **संदेह-संकर** झाला आहे.

३. एका पदामध्येंच जेव्हां शब्दालंकार आणि अर्थालंकार हे दोन्ही आलेले असतात तेव्हां **एकपदाश्रित-संकर** होतो. उदाहरणें:—

**( १ ) निजदास-वासराला बहु पाजुनिही दयादुधास रिते ॥**
**नव्हति गुणस्तन जीचे गणिले अतिकाठिण त्या सुधासरिते ॥ १ ॥**

मोरोपंत.

या ठिकाणीं 'निजदासवासरूं' ' दयादुध' आणि ' सुधा-सरित् ' या तिन्हींपैकी प्रत्येक पदांत रूपक व अनुप्रास हे दोन्ही अलंकार आहेत.

**( २ ) तों ये प्रल्हादप्रभु, त्यासि करी बद्ध बळि शिरोनमनें ।**
**जाणो म्हणे कदा तो गुरुपदपद्मांत अलि शिरेन मनें ॥**

मोरोपंत.

येथें ' प्रल्हादप्रभु ' व ' पदपद्म ' ह्या पदांत अनुप्रास व रूपक हे दोन्ही अलंकार साधले आहेत म्हणून ह्यास **एकपदाश्रित-संकर** असें म्हणतात.

**( ३ ) होतां न्यून सहस्रीं एक, नयन-नीरजें यथाविधिनें ।**
**पूजन करिता, दिधलें पूर्वी जें काय तुज दयानिधिनें ॥**

मोरोपंत.

येथेंही ' नयन-नीरज ' या पदांत एकपदाश्रित संकर झाला आहे.

संसृष्टि व संकर या प्रत्येकाचे शेंकडों प्रकार होतात; त्या सर्वांचें विवेचन करणें अशक्य असल्यामुळें केवळ दिग्दर्शन करण्याकरितां वर दिलेलीं उदाहरणें पुरेशीं आहेत.

---

# अलंकार-दोष.



अलंकार–दोषांचें सविस्तर विवेचन माझ्या **काव्यदोषदीपिकेंत** केलेलें आहेच. तथापि विषयविवेचनपरिपूर्णार्थ येथेंही थोडेंसें दिग्दर्शन केलें आहे.

अनुप्रास अलंकार साधण्यासाठीं जर प्रसिद्धीच्या विरुद्ध वर्णन केलें असेल तर **प्रसिद्धिविरुद्धत्व** दोष होतो. जसें:—

**( १ ) चक्रीं चक्कार पंक्ती, हरिहय हरिंना, धूर्ध्वजा व्योमकेश ।**
**अक्षां नक्षत्रमाला, वरुणहि अरुणा, कूबरा किन्नरेश ॥**
**प्रीतीनें देववृंद स्तवि सतत जवा, तोष लोकांस सत्य ।**
**देण्या जो सज्ज आहे दिनकर-रथ तो रक्षु आम्हांस नित्य ॥**

भाषांतर.

येथें विष्णु इंद्र शिव इत्यादि देव सूर्याच्या रथाच्या अनेक अंगांचें नित्य स्तवन करितात असे वर्णन आहे. परंतु हें वर्णन कवीनें केवळ अनुप्रास अलंकार साधण्यासाठींच केलें असून तें कविसंप्रदायास अनुसरून नाहीं; ह्मणून येथें **प्रसिद्धिविरुद्धत्व** दोष झाला आहे.

**( २ ) शाका अनेका, वरि लिंबु चोळी**
**कडेस ठेवीत अहार पोळी ॥**
**भातास तो आग्रह फार झाला**
**कैलास नेणो दुसराच आला ॥**

नागेश कवि.

येथें उत्प्रेक्षा अलंकार असून ‘ भाताची रास ’ या उपमेयास ‘ कैलास ’ हें उपमान प्रमाणानें अधिक आहे; म्हणून हा **अनुचितार्थत्व** दोष आहे.

**( ३ ) ती धर्मामर्यादा सोसावी सर्वथा न रामासी ।**
**जागृदवस्थेंत जशी नासाग्रीं बैसली नरा मासी ॥**

मोरोपंत.

या ठिकाणीं युद्धधर्माची अमर्यादा झाल्यानें बळिरामास जो राग आला होता तो एकाद्यास नाकावर माशी बसल्यामुळें जितका राग येतो त्याच्यापेक्षां पुष्कळच अधिक असला पाहिजे. अर्थात् येथें उपमानवाक्यानें बळिरामाच्या रागाची

यथार्थ कल्पना होत नाहीं; ह्मणजे त्याला फारच थोडा राग आला होता असें ध्वनित होतें; म्हणून येथें **प्रकाशितविरुद्धत्व** दोष आहे.

परंतु एकाद्याची निंदा किंवा निर्भत्सना करण्यासाठीं उपमान नीच योजल्यास दोष होत नाहीं. जसें—

**( ४ ) शल्य म्हणे रे सूता बडबड करितोसि फार मद्यपसा ।**
**गुरु सागर बहु गर्जे परि मुनिचा एकही भरे न पसा ॥**
**पाहे शयनीं निजला होता जो कांत कीर्तिवरटांचा ।**
**बसल्या ज्याच्या दुर्जननाग-फणारूप कीर्तिवर टांचा ॥**

मोरोपंत.

येथें ‘ फणा ’ व ‘ कीर्ति ’ यांच्या मध्यें सादृश्य मुळींच नसल्यामुळें **अप्रयुक्तत्व** दोष झाला आहे.

उत्प्रेक्षेमध्यें वाटे गमे जणो इत्यादि शब्द न घालतां त्याबद्दल ‘ जसे ’ ‘जेवीं ’ इत्यादि उपमा-प्रतिपादक शब्दांचा उपयोग केल्यास अवाचकत्व दोष होतो. जसेः—

**( ५ ) शास्त्रप्रोक्तविधीनें रथ कल्पुनि शीघ्र आणिला शल्यें ।**
**जेविं मनोरथ साक्षात् केला दैवेंचि सिद्ध वात्सल्यें ॥**

मोरोपंत.

येथें जेविं शब्दाऐवजीं जणु हा उत्प्रेक्षादर्शक शब्द पाहिजे होता.

कवितेंत जो अलंकार साधला असेल त्या अलंकाराचा नामनिर्देश जर त्याच कवितेंत केला असेल तर तें दोषस्थान होतें. जसें—

**(६) धर्मकटक खांडववन, भीष्म विजय, विजय तोचि हरि गमला ।**
**शर-दव-रक्तज्वाला रूपक याहूनि होय बहु न मला ॥**

मोरोपंत.

या ठिकाणीं **अलंकार-शब्दवाच्यता** दोष झाला आहे. याच प्रमाणें अलंकारांचे इतर दोष समजावे.

---

# अर्थालंकारांचें वर्गीकरण.

अलंकारशास्त्रकारांचे दोन वर्ग आहेत—प्राचीन व नवीन. प्राचीन मतानुयायी आलंकारिक बोलण्याचे मुख्य दोन प्रकार करितात. ( १ ) स्वभावोक्ति व ( २ ) वक्रोक्ति. वक्रोक्तिच काव्याचें जीवित आहे असें ते मानतात; वक्रोक्तिविना काव्य असणेंच शक्य नाहीं असेंही ते प्रतिपादन करितात. काव्यांत 'ध्वनि' किंवा 'व्यंग्यार्थ' असतो असें जरी ते कबूल करितात तरी 'ध्वनीचा' ते वक्रोक्तींतच अंतर्भाव करितात. स्वभावोक्ति ह्मणजे पदार्थाच्या वास्तविक स्वरूपाचें कथन. ह्या वर्णनांत अपुष्टार्थ, विपरीत अर्थ, उपमा, अतिशयोक्ति, श्लेष इत्यादि दोष व अलंकार त्यांनीं वर्ज मानिले आहेत.

चतुर लोकांच्या भाषणांत जे अनेक चमत्कारजनक प्रकार दृष्टीस पडतात त्यांचा वक्रोक्तींतच समावेश करितां येतो, हें उद्भटांचें मत ग्राह्य मानणाऱ्या प्राचीन आलंकारिकांस 'वक्रोक्तिजीवितकार' असें म्हणतात. अर्थालंकारांचे त्यांनीं मुख्य चार भेद मानलेले आहेतः—( १ ) वास्तव ( वस्तुरूपकथन ); ( २ ) औपम्य ( वस्त्वंतर–कथन अथवा अप्रस्तुत वर्णन ); ( ३ ) अतिशयमूलक अलंकार; व ( ४ ) श्लेष–मूलक अलंकार. ह्या प्राचीन मताचा पुरस्कार अलीकडे कोणी करीत नसल्यामुळें या मताचा जास्त विस्तार येथें केला नाहीं.

नवीन मतानुयायी आलंकारिक 'अभिधा,' 'लक्षणा' व 'व्यंजना' या अर्थबोधक शक्तीस प्राधान्य देऊन 'व्यंजना' किंवा 'ध्वनि' च काव्याचा आत्मा आहे व गुणालंकारांनीं त्यास शोभा मात्र येते असें प्रतिपादन करितात. जगन्नाथपंडितासुद्धां सर्व नवीन आलंकारिकांनीं याच मताचा स्वीकार केला असल्यामुळें 'ध्वनि' जीवितकारांच्या मताप्रमाणें अर्थालंकाराचें वर्गीकरण खालीं दिल्याप्रमाणें होईल.

( १ ) सादृश्यप्रत्ययमूलक अलंकारः—

( अ ) अभेदप्रधानः—उपमा ( सर्व प्रभेदांसह ), ससंदेह, उत्प्रेक्षा, भ्रातिमान् अपन्हुति, रूपक, स्मरण, अतिशयोक्ति.

( आ ) प्रस्तुताप्रस्तुतप्रतीतिमूलकः—अप्रस्तुतप्रशंसा, अर्थांतरन्यास, पर्यायोक्त, तुल्ययोगिता, दीपक, दृष्टांत निदर्शना, व्याजस्तुति, आक्षेप.

( इ ) भेदप्रधानः—व्यतिरेक, प्रतीप, सहोक्ति, विनोक्ति, परिकर.

( २ ) विरोध-गर्भ अलंकारः—विरोधाभास, विशेषोक्ति, विभावना, पूर्वातिशयोक्ति, असंगति, विषम, सम, अधिक, अनोन्य, विशेष, व्याघात.

( ३ ) शृंखलाबंधोपचित अलंकारः—कारणमाला, एकावली, माला-दीपक, सार अथवा उदार.

( ४ ) न्यायाश्रयी अलंकारः—

( अ ) तर्कन्यायमूलक—काव्यलिंग, अनुमान.

( आ ) काव्यन्यायमूलक—यथासंख्या, पर्याय, परिवृत्ति, परिसंख्या.

( इ ) लोकन्यायाश्रयी—प्रत्यनीक, मीलित, सामान्य, उत्तर, तद्गुण, अतद्गुण.

( ५ ) बाह्यन्यायाश्रयी अथवा युगपद्भावमूलकः—समुच्चय, समाधि.

( ६ ) गूढार्थप्रतातिपरः—सूक्ष्म, वक्रोक्ति, श्लेष, स्वभावोक्ति उदात्त, व्याजोक्ति, भाविक.

गूढार्थप्रतीतिपर अलंकारांत स्वभावोक्तीचा अंतर्भाव करण्याचें कारण हेंच कीं केवळ वस्तूंच्या स्वभावाचें वर्णन अलंकार या पदवीस पात्र होत नाहीं. तसें झाल्यास सर्व काव्यच स्वभावोक्ति अलंकारमय होईल. स्थूलबुद्धीच्या लोकांना जे काव्य वाटतें तें सहृदय वाचकांस वाटणार नाही; ह्मणून कुशाग्र बुद्धीच्या कवीनें निर्माण केलेल्या गूढार्थपूर्ण, अतिशयोक्तिविरहित, स्वाभाविक व आल्हादजनक वर्णनासच स्वभावोक्ति अलंकार म्हणतां येईल.

वरील सहा मुख्य भेद व त्याचे पोटभेद हे जरी तर्कशास्त्र पद्धतीस अनुसरून नसले तरी बरेच सोयीचे आहेत. पदार्थविज्ञानशास्त्रांत जसा वर्णपट असतो तशा प्रकारचा साम्यमूलक अलंकारांचाच एक पट प्रथम तयार केल्यास त्यांत उपमा अलंकारांतील सादृश्यापासून ससंदेह, उत्प्रेक्षा, भ्रांतिमान्, अपन्हुति, रूपक, व्यतिरेक व प्रतीप अशा क्रमानें रंगांत फरत करीत गेल्यास, सादृश्यसूचक रंगाच्या विरुद्ध रंग प्रतीप अलंकारास देण्याची पाळी येईल.

तथापि अर्थालंकारांचें विवेचन करितांना वर्गीकरणाकडे फारसें लक्ष्य दिलेलें नाहीं. काव्यामध्यें वारंवार आढळून येणारे अलंकार प्रथम घेऊन, कमी महत्वाच्या व क्वचित् आढळणाऱ्या अलकारांचें विवेचन मागाहून केलेलें आहे. या वर्गीकरणांत मम्मटाशिवाय इतर आलंकारिकांनीं निरूपण केलेल्या कित्येक अनवश्यक अलंकारांचा समावेश अर्थात् केलेला नाहीं.

---

# परिशिष्ट पहिलें.



## ( १ ) अत्युक्ति.

जेथें शौर्य औदार्यादि गुणांचें अतथ्य परंतु आश्चर्यजनक वर्णन असतें तेथें **अत्युक्ति** नामक अलंकार होतो. जसेंः—

( १ ) दळासहित राज-कुमर । एकल्यावरी सोडिती शर ॥
परि तो आनक-दुंदुभि-कन्या-कुमर । तितुके तोडी क्षणमात्रें १
तितुक्यांचें बाणजाळ । एकसरें भेदी सुभद्राबाळ ॥
जैसें उगवतां सूर्यमंडळ । भ-गणें सर्व लोपतीं ॥ २ ॥

श्रीधर.

या ठिकाणीं अभिमन्यूच्या शौर्याचें वर्णन आहे.

तसेंच,

( २ ) झाले धनी पुढिल याचक या नळाचे ॥
येतां फिरोनि समुदाय पथीं तयांचे ॥
मागावयास जन मागिल देखियेले ॥
त्यांहींच ते सकल पूरित-काम केले ॥ १ ॥

रघुनाथ पंडित.

हें नळाच्या औदार्याचें वर्णन आहे.

वास्तविक पाहिलें असतां **उदात्त** अलंकाराच्या लक्षणांमधील ‘ वस्तु ’ या शब्दामध्येंच शौर्य, औदार्यादिक गुणांचा समावेश होतो; म्हणून **अत्युक्ति** हा निराळा अलंकार मानण्याची गरज नाहीं.

---

## ( २ ) परिणाम.

जेव्हां उपमान उपमेयाशीं एकरूप होऊन—स्वतंत्रपणें नव्हे—कार्य करण्यास समर्थ आहे असें वर्णन असतें तेथें **परिणाम** अलंकार होतो. जसेंः—

( १ ) सदैव नमितां जरी पद ललाट केलें किणें ॥
नसे इतर तारिता मज भवत्पदाब्जाविणें ॥

**नता करुनि मुक्तही ह्मणसि मी बुडालों रिणें ॥**
**अशा तुज न जो भजे मनुज धिक् तयाचें जिणें ॥**

मोरोपंत.

येथें दुसऱ्या ओळींत 'पदाब्ज' या पदानें परिणाम अलंकार झाला आहे. 'पदाब्ज' या पदांत 'अब्ज' हें उपमान आहे, 'पद' हें उपमेय आहे व तारणें ही क्रिया आहे. ही क्रिया करण्यास उपमान (अब्ज) एकटें असमर्थ आहे. तारण्याची शक्ति खरोखर 'पदा' मध्येंच आहे. म्हणून अब्ज पदरूप होऊन तारण करितें असे येथें वर्णन आहे. ह्या अलंकाराचा समावेश '**रूपकां**'त होतोच; म्हणून त्यास निराळा अलंकार मानण्याची मुळींच जरूरी नाहीं.

## ( ३ ) संभावना.

एकादी गोष्ट सिद्ध करण्याकरितां जेव्हां कोणी 'जर असें होईल' अथवा 'जर असे झालें असतें' अशा प्रकारचा तर्क वरितो तेव्हां **संभावना** अलंकार होतो. जसें:—

**( १ ) धरिलें असतें जरि तें कृष्णांवर-कर्षणादि आग मनीं ॥**
**आगम-निगम-नुत प्रभु आदर करिता कशास आगमनीं ॥**

मोरोपंत.

या अलंकाराचा समावेश '**यद्यर्थोतिशयोक्तीं**'त होतो. म्हणून हा निराळा अलंकार मानण्याचें कारण नाहीं.

## ( ४ ) प्रस्तुतांकुर.

एका प्रस्तुतानें दुसऱ्या प्रस्तुताचें ज्ञान जेव्हां होतें तेव्हां **प्रस्तुतांकुर** अलंकार होतो. जसें:—

**( १ ) मधुपा ! तवसंनिध नवपुष्पवती मालती सदा असते ॥**
**परि कां कंटकयुक्ता भुजंगसक्ताहि केतकी रुचते ॥ १ ॥**

**भाषांतर**

कोणी एक स्त्री आपल्या प्रियकराबरोबर उद्यानांत फिरत असतां तेथें विहार करीत असलेल्या दुसऱ्या नायिकेकडे त्याची दृष्टी गेल्यावरून ती स्त्री भ्रमरास

उद्देशून वर लिहिल्याप्रमाणें बोलली. दुसऱ्यावर सक्त असलेल्या स्त्रीचा अभिलाष करणें म्हणजे आपल्या प्राणांवर संकट ओढवून घेणेंच होय असा नायिकेच्या **बोलण्याचा** आशय आहे. येथें वर्णनीय वृत्तांत भृंगाचा असून त्याच्यापासून प्रस्तुत जो नायक त्याचा वृत्तांत सूचित झाला आहे. वास्तविक पाहतां ही **अप्रस्तुतप्रशंसाच** आहे. अप्रस्तुत म्हणजे प्रस्तुत ( मुख्य वर्णनीय पदार्थ ) शिवाय करून इतर सर्व पदार्थ असें समजावें म्हणजे झालें.

## ( ५ ) ललित.

वर्णनीय पदार्थांचें ( प्रस्तुताचें ) प्रत्यक्ष वर्णन न करितां त्याच्या प्रतिबिंबाचें ( त्या सारख्याच दुसऱ्या अप्रकृत पदार्थांचें ) जेव्हां वर्णन केलेलें असतें तेव्हां **ललित** अलंकार होतो.

**( १ ) मूकव्रत कां धरिलें असतां येथेंचि तो, महाभागे ! ॥**
**जातां निघोनि जल तें बांधाया सेतु इच्छिसी कां गे ॥ १ ॥**

भाषांतर.

ही एका सखीची नायिकेप्रत उक्ति आहे. ' नायक निघून गेल्यावर त्यास परत बोलावण्यांत काय अर्थ आहे ' हा प्रस्तुत वृत्तांत असून त्याचा प्रतिबिंबरूप अर्थ जो ' पाणी निघून गेल्यावर सेतु बांधणें ' त्याचेंच वर्णन येथें केलें आहे.

**( २ ) भीष्म म्हणे रे कर्णा ! कां स्वाश्रित धार्तराष्ट्र बुडवाया ॥**
**इच्छिसि, दुष्टा ! दाटुनि दृष्टिदहन-दंदशूक तुडवाया ॥ २ ॥**

मोरोपंत.

येथें अर्जुनाशीं समर करून तूं आपला घात मात्र करून घेशील हा प्रस्तुत अर्थ आहे व तोच अर्थ ' नुसत्या दृष्टीनें जाळून टाकणाऱ्या सर्पावर पाय देणें ' ह्या अप्रस्तुत वर्णनानें सांगितला आहे.

वास्तविक पाहतां वरील दोन्ही उदाहरणें **निदर्शना** अलंकाराचीं आहेत. ललित व निदर्शना ह्या दोन अलंकारांत कित्येकांच्या मतें थोडा भेद आहे. निदर्शनेंत प्रस्तुत व अप्रस्तुत वृत्तांताचें उपमेमध्यें पर्यवसान होऊन दोन्ही वृत्तान्त शब्दांनीं व्यक्त केलेले असतात; ललितांत वर्णनीय वाक्यार्थ शब्दांनीं व्यक्त केलेला नसतो. परंतु हें म्हणणें बरोबर नाहीं. निदर्शनेंत प्रस्तुत व अप्र

स्तुत वृत्तांत उक्तच पाहिजेत असा कांहीं नियम नाहीं; ते जरी अनुक्त असले तरी निदर्शना अलंकार होतो; म्हणून ललित अलंकार निराळा मानण्याचें कारण नाहीं.

---

## ( ६ ) उल्लास.

जेथें एकाद्याच्या गुणाचें वर्णन करून दुसऱ्याच्या अंगच्या दोषाचें आविष्करण केलेलें असतें, अथवा एकाद्याचे दोष प्रकट करून दुसऱ्याच्या अंगच्या गुणाचें वर्णन केलेलें असतें तेथें **उल्लास** अलंकार होतो. जसेः—

( १ ) नक्षत्रनाथ दिसतां गगनोदरांत ।
आनंदती सकल जीव जनीं नितांत ॥
तूं मात्र होशि, कमला ! अति खिन्न हाय ।
होई विधीच उलटा, तुज दोष काय ॥ १ ॥

ल. ग. लेले.

तसेंच,

( २ ) दानपान इच्छुनी जरी द्विरेफ पातले ।
कर्णताडणें गजें हकोनि त्यांसि लाविले ॥
त्याचियाच मस्तकास हानि भूषणाचि ही ।
भृंग पंकजांवरी निघोनि जाति सर्व ही ॥ १ ॥

कृ. शास्त्री चिपळूणकर.

या ठिकाणीं पहिल्या उदाहरणांत चंद्रप्रकाशामुळें सर्व प्राणी आनंदी होतात, पण कमल मात्र खिन्न असतें हा त्यांत दोष दाखविलेला आहे. दुसऱ्या उदाहरणांत हत्तीचा दोष प्रकट करून भ्रमरांचें शहाणपण व्यक्त केलेलें आहे.

वरील दोन्ही उदाहरणांचा **विषम** अलंकारांत अंतर्भाव होत असल्याकारणानें उल्लास हा निराळा अलंकार मानणें अप्रशस्त आहे.

---

## ( ७ ) विचित्र.

इष्ट कार्याच्या सिद्धीसाठीं जो प्रयत्न व्हावयास पाहिजे त्याच्या विपरीत प्रयत्न जेथें केलेला असतो तेथें **विचित्र** अलंकार होतो. जसें:—

( १ ) नम्रपणंच्र सभेंत महोन्नत, जे गुण वर्णुनिया परक्यांच ॥
सांगितल्याविण दाविति कौशल सर्व जनाप्रति जे स्वगुणांचे ॥
स्वार्थ परार्थहि साधिति जिंकिति शांतिबळें मुखरत्व खलांचें ॥
संत महाद्भत भाजन यापरि सेवन कोण करी न तयांचें ॥१॥

वामन पंडित.

येथें महोन्नत होणें, खलांचें मुखरत्व जिकणें वगैरे गोष्टी साध्य करण्यास नम्रपणा व शांति इत्यादि विरुद्ध गोष्टींचा स्वीकार केलेला आहे.

हा अलंकार विषमाचाच एक प्रकार असल्यामुळें ह्यास निराळा अलंकार मानण्याचें कारण नाहीं.

---

## (८) विधि.

जी गोष्ट सिद्ध आहे त्या गोष्टीच्या गुणांचा उत्कर्ष दाखविण्याकरितां जेव्हां तिचें पुन्हा विधान ( पुनरुच्चार ) केलेलें असतें तेव्हां **विधि** नामक अलंकार होतो. जसें:—

(१) सभेंत जो थक्क करी जनांला ॥ जिंकोनि वादीं श्रुतिमान्नराला ॥
त्या पंडिता पंडित नाम साजे ॥ विद्वद्वरीं तो न कसा विराजे ॥१॥

भाषांतर.

येथें ‘ पंडित ’ या शब्दाचा पुनरुच्चार केलेला असून पहिल्या ‘पंडित’ शब्दाचा अर्थ सामान्य विद्वान् व दुसऱ्या ‘ पंडित ’ शब्दाचा अर्थ ज्याच्या अंगीं विशेष प्रकारची विद्वत्ता आहे तो असा आहे. येथें रमणीय अर्थ निष्पन्न होत नसल्यामुळें हा अलंकार आहे असें मानणें योग्य नाहीं. हें **गुणीभूतव्यंग्य** काव्य आहे.

---

## ( ९ ) छेकोक्ति.

प्रचारांत असलेल्या म्हणीचा गर्भित अर्थ जेव्हां निराळा असतो तेव्हां **छेकोक्ति** अलंकार होतो. छेक म्हणजे चतुर, उक्ति म्हणजे आलाप. यास **चतुरालाप** असेंही म्हणतां येईल. जसें:—

जाणें भुजंगपादा भुजंग केवळ अहो ! दुजा न कुणी ॥

भाषांतर.

एकानें दुसऱ्यास कोणा एका गृहस्थाविषयीं कांहीं माहिती विचारल्यास तो जवळच्याच एका मनुष्याकडे बोट दाखवून व ' सापाचे पाय सापच जाणतो ' असें म्हणून हा गृहस्थ त्याचा परम मित्र असल्यामुळें ह्यास त्याचे विषयीं पुष्कळ माहिती आहे असें सुचवितो. अर्थात् दोघेही एका विशिष्ट द्रव्यार्जनादि व्यापारांत प्रवीण आहेत असा ' सापाचे पाय सापच जाणतो ' ह्या म्हणीचा अर्थ होतो. परंतु भुजंग ( जार, उप-पति ) ह्या शब्दानें दोघेही मित्र जारकर्मकुशल आहेत असा गर्भित अर्थ निष्पन्न होतो. येथें वाच्यार्थ रमणीय नसल्यामुळें हा अलंकार होत नाहीं.

हें **ध्वनिकाव्याचें** उदाहरण आहे.

---

## ( १० ) गूढोक्ति.

एकाला उद्देशून जें बोलावयाचें तें प्रत्यक्ष त्यास न बोलतां दुसऱ्यास उद्देशून बोलणें—असा प्रकार जेथें असतो तेथें **गूढोक्ति** अलंकार होतो. जसें:—

**रे वृष ! जा; परक्षेत्रापासुनि हा क्षेत्रपाल ये इकडे ॥**

भाषांतर.

आपला पति परस्त्रीकडे गेल्यावर विटाबरोबर रममाण होणारी कोणी एक जारिणी पति परत येत आहे कीं काय हें पाहण्याकरितां बाहेर गेली व आपला पति अगदीं जवळ आला असें पाहून शेतांत चरत असलेल्या बैलास हाकून देण्याच्या निमित्तानें तिनें जारास लवकर निघून जाण्याविषयीं सूचना केली असें वर वर्णन आहे. येथें वाच्यार्थ रमणीय नाहीं म्हणून हा अलंकार होत नाहीं. हेंदेखील **ध्वनिकाव्याचें** उदाहरण आहे.

---

## (११) अनुकूल.

एकादी गोष्ट वरून प्रतिकूल दिसून खरोखर ती अनुकूलच आहे असें जेथें वर्णन असतें तेथें **अनुकूल** अलंकार होतो. जसें:—

**दंडावें मज गे ! यथोचित अशी इच्छा जरी त्वन्मनीं ॥**
**घालोनी भुजजाल कंठीं मजला बांधीं कचाग्रीं झणीं ॥**
**ओष्ठांनीं दुखवीं कपोल मम, वा दंतक्षताही करीं ।**
**टोचीं वा कुचभल्ल गाढ हृदयीं, दे दुःख ऐशापरी ॥**

भाषांतर.

ही एका नायकाची कुपित नायिकेप्रत उक्ती आहे. येथें नायकानें शिक्षा म्हणून जें जें सांगितलें आहे तें तें सर्व त्यास अनुकूल असेंच आहे. ह्या अलंकाराचा मम्मटभट्टांच्या **व्याघात** अलंकारांत समावेश होतो.

---

## ( १२ ) उल्लेख.

जेथें एकच वस्तु अनेकांस भिन्न प्रकारानें दिसते तेथें **उल्लेख** अलंकार होतो. जसें:—

**( १ ) वाणीस जो गुरु, रिपुप्रति उग्र रुद्र**
**अर्थीस देवतरु चक्षुंस चंद्र भद्र ॥**
**रूपीं मनोज धृतदेह, घनाभ कृष्ण**
**प्रेमें जयास भजतात मुनी वितृष्ण ॥**

भाषांतर.

येथें वाणीस ( सरस्वतीस ) प्रत्यक्ष गुरू ( बृहस्पती ) प्रमाणें, रिपूंना रुद्राप्रमाणें क्रोधाविष्ट, याप्रमाणें कृष्ण अनेकांस अनेक प्रकारानें भासतो असें वर्णिलें आहे.

**( २ ) वज्राहुनी ही अभंग । मल्लां वाटला श्रीरंग ।**
**नरां नरनाथ, रंग । भूमी येतां वाटला ॥ १ ॥**
**वाटे नारींशी मदन । नंदादिकांसि स्वजन ।**
**दुष्ट-रायासी शासन । धाकें ऊर फाटला ॥ २ ॥**
**मायबापां तान्हें बाळ । भयें कंसा वाटे काळ ।**
**मूढा वाटे फटकाळ । शोकें कंठ दाटला ॥ ३ ॥**
**स्वात्मयोगिया स्वरूप । यादवांसी विष्णुरूप ।**
**दृष्टीं देखतां अमूप । दुःखसिंधु आटला ॥ ४ ॥**

वामन पंडित.

वरील वर्णनांत कृष्ण अनेक गुणांनीं युक्त असल्यामुळें त्यास अनेकांनीं अनेक प्रकारें लेखिलें आहे असें दाखविलें आहे म्हणून हा **उल्लेख** अलंकार आहे. मम्मटभट्टांच्या **भेदकातिशयोक्तीं**त या अलंकाराचा समावेश होतो. ( मागें पान ९१ पहा ).

## ( १३ ) विकल्प.

दोन समान सामर्थ्यांच्या वस्तूंपैकीं एक प्रबल, दुसरी निर्बल असा जेथें विरोध दाखविलेला असतो येथें **विकल्प** अलंकार होतो. जसें:—

**( १ ) पूज्यातिक्रमदोष निष्कृति बरी ही एक आहे, नमीं ॥**
**पायातें, अपराध मागिल दयापायोधि साहेन मीं ॥**
**तूं मिथ्या मिरवूं नको मद्भिधा चिन्हें तया सोडुनी ॥**
**ये मातें शरणा करांसि अथवा चापीं शरा जोडुनी ॥ १ ॥**

मोरोपंत.

हा पौंड्रक-वासुदेवाचा श्रीकृष्णास गर्वोक्तीचा निरोप आहे. येथें ' कर जोडून शरण ये ' ह्या वाक्यानें कृष्णाचे अंगीं कमी सामर्थ्य आहे असे व्यक्त होतें. ' चापास शर जोडून युद्ध कर ' ह्या वाक्यानें 'तुझा सहजच मी पराभव करीन' असें सुचवून आपलें प्राबल्य व कृष्णाचें दौर्बल्य ध्वनित केलें आहे. येथें शेवटच्या ओळींत विकल्प अलंकार झालेला आहे. कोणी ह्यासच **ससंदेह** असें म्हणतात. परंतु वरील पद्यांत विशेष चमत्कारजनकत्व नसल्यामुळें ह्यास अलंकार मानणें प्रशस्त दिसत नाहीं. फार तर यास **गुणीभूतव्यंग्यकाव्य** म्हणतां येईल.

---

## ( १४ ) परिकरांकुर.

जेव्हां विशेष्य साभिप्राय असतें तेव्हां **परिकरांकुर** अलंकार होतो. जसें-

**( १ ) कृष्णेसि सांग कृष्णा तिळभरहि तुझ उणें नसो शील ॥**
**त्वां साहिलें असें पळ-मात्रहि सर्वसहा न सोशील ॥ १ ॥**

मोरोपंत.

येथें द्रौपदीच्या सहिष्णुतेचें वर्णन असल्यामुळें ' सर्वसहा ' ~~सर्व सहन~~ णारी ( पृथ्वी ), हें पद सहेतुक आहे.

तसेंच,

**( २ ) नाहीं मला प्रिय दुजें तुजवांचुनीया ॥**
**ऐसें पुनः पुनरपी वदलासि राया ॥**
**तें काय होय, रमणा ! लटिकेंचि सारें ॥**
**सत्यप्रिया ! फसवितोसि मला कसा रे ॥ १ ॥**

ल. ग. लेले.

हे दमयंतीचें नलास उद्देशून भाषण आहे. येथें ' सत्यप्रिया ' हें विशेष्य साभिप्राय आहे.

परिकर अलंकाराच्या व्याख्येंतील 'विशेषण' या शब्दाबरोबर 'विशेष्य' या शब्दाचाही मनास बोध होतो; म्हणून ह्या अलंकाराचा **परिकरा**मध्येंच समावेश करणें इष्ट आहे.

---

## ( १५ ) अल्प.

जेथें सूक्ष्म आधेयापेक्षां आधार फारच सूक्ष्म आहे असें वर्णन असतें तेथें **अल्प** नामक अलंकार होतो. जसें:—

**( १ ) पुष्पें स्रजीं, मणि तसे खचिले जियेंत ॥**
**ती मुद्रिका सुचिर सव्य कनिष्ठिकेंत ॥**
**ती आजि दक्षिण करांत जपार्थ माला ॥**
**झाली ! किती असुख दे स्थिति हे मनाला ॥ १ ॥**

भाषांतर

या ठिकाणीं कोणी एका विरहिणीच्या डाव्या हाताच्या करांगुलींतील आंगठी कृशपणामुळें उजव्या हातांत कंकणाप्रमाणें जाते एवढेंच नव्हे तर ती जपमालेप्रमाणें खालीं लोंबतेही असें वर्णन आहे.

येथें आधेय जी मुद्रिका ती आधार जी करांगुली तिजपेक्षां फारच मोठी आहे असें दाखविलें आहे.

**अधिक** अलंकारांत ' मोठा ' हा शब्द जसा महत्परिमाणवाचक आहे तसाच तो सूक्ष्मपरिमाणवाचकही आहे; म्हणून **अल्प** अलंकाराचा ' **अधिकां**'तच समावेश करणें सयुक्तिक आहे.

---

## ( १६ ) अनुगुण.

दुसऱ्या वस्तूच्या सान्निध्यामुळें एकाद्या वस्तूच्या अंगचा नैसर्गिक उत्कट गुण विशेष खुललेला दिसतो असें जेथें वर्णन असतें तेथें **अनुगुण** नामक अलंकार होतो. जसें:—

**( १ ) स्त्रीनेत्रकटाक्षांनीं होती इंदीवरेंहि अतिनील ॥**
**अधर स्फुरणें येते अखिला रक्तोत्पलां प्रभा लाल ॥ १ ॥**

भाषांतर.

येथें नीलकमलांचा रंग कटाक्षांनीं विशेप काळा व रक्त कमलांचा वर्ण अधर-स्फुरणानें अधिक तांबडा झालेला आहे असे दाखविलें आहे.

वास्तविक पाहतां हा **तद्गुणाचाच** एक प्रकार असल्यामुळें अनुगुण हा निराळा अलंकार मानण्याचें कारण नाहीं.

---

## ( १७ ) मिथ्याध्यवसिति.

एकादी गोष्ट घडवून आणणें हें काम अत्यंत कठीण अथवा अगदीं असंभवनीय आहे हें सिद्ध करण्याकरितां जेव्हां दुसऱ्या मिथ्याभूत अर्थांची कल्पना केलेली असते तेव्हां **मिथ्याध्यवसिति** नामक अलंकार होतो. जसें:—

**नवखंड पृथ्वी पिके मृगजळें ॥ डोंगर भेटे बळें अस्मानासी ॥**
**नश्वर देह तैसा तेव्हां होय ब्रह्म ॥ तुका म्हणे श्रम करुनी काय ॥**

तुकाराम.

या ठिकाणीं 'नश्वर देह ब्रह्म होणें' ही गोष्ट अत्यंत दुर्घट आहे हें सिद्ध करण्यासाठीं 'मृगजळानें पृथ्वी समृद्ध होणें' किंवा 'डोंगर अस्मानास भेटणें' ह्या मिथ्याभूत अर्थांची कल्पना केलेली आहे. मृगजळानें पृथ्वी पिकणें जसें अशक्य तसेंच नश्वर देह ब्रह्म होणें अशक्य आहे असा भावार्थ.

ह्या अलंकाराचा समावेश **अतिशयोक्तीं**त करितात. अर्थात् ह्यास निराळा अलंकार मानणें प्रशस्त नाहीं.

---

## ( १८ ) अनुज्ञा.

एकाद्या वस्तूमधील दोष गुणच आहे असें समजून जेव्हां एकादा मनुष्य त्या दोषयुक्त वस्तूची इच्छा करितो तेव्हां **अनुज्ञा** अलंकार होतो. उदाहरणः—

**( १ ) लहानपण दे गा देवा । मुंगी साखरेचा रवा ॥**
**ऐरावत रत्न थोर । त्यासी अंकुशाचा मार ॥**
**ज्याचे अंगीं मोठेपण । तया यातना कठीण ॥**
**तुका म्हणे बरवें जाण । व्हावें लहानाहुनि लहान ॥ १ ॥**

अथवा,

**( २ ) नलगे मुक्ति धन संपदा । संत संग देई सदा ॥**
**तुका म्हणे गर्भवासीं । सुखें घालावें आम्हासीं ॥ २ ॥**

तुकाराम.

ह्या अलंकाराचा **विशेष** अलंकारांत अंतर्भाव करितां येतो म्हणून ह्यास निराळा अलंकार मानण्याची जरुरी नाहीं.

---

## ( १९ ) तिरस्कार.

एकाद्या वस्तूच्या अंगीं पुष्कळ चांगले गुण आहेत अशी प्रसिद्धि असूनही जेव्हा एकादा मनुष्य तिच्या अंगच्या एकाद्या दुर्गुणामुळें तिचा द्वेष करितो तेव्हां **तिरस्कार** नामक अलंकार होतो. जसें:—

**( १ ) गंधें तुझ्या हरियलें अमुच्या मनाला ।**
**आलों समक्ष म्हणुनी तव दर्शनाला ॥**
**क्रोडीं भुजंग दिसती तंव ते विशाल ।**
**येतों अम्ही मलयजा ! अस तूं खुशाल ॥**

लक्ष्मण गणेशशास्त्री लेले.

चंदनाचे अंगीं अनेक गुण असूनही त्यावर सर्प वास करितात म्हणून तो तिरस्कारास पात्र आहे असे येथें दर्शविलें आहे. ह्या अलंकाराची **विशेषाच्या** एका प्रकारामध्यें गणना करितां येत असल्यामुळें ह्यास निराळा अलंकार मानण्याचें कारण नाहीं.

## ( २० ) अवज्ञा.

जेथें एका वस्तूच्या अंगीं असलेल्या गुणामुळें अथवा दोषामुळें दुसऱ्या वस्तूच्या ठायीं त्या गुणाचा अथवा दोषाचा अभाव दाखविलेला असतो तेथें **अवज्ञा** अलंकार होतो. जसें:—

**साकरेच्या गोण्या बैलाचिया पाठीं । तयासी शेवटीं करबाडें ॥१॥**
**मालाचे पैं पेटे वाहताती उंटें । तया लागी कांटे भक्षावया ॥ २ ॥**

अथवा,

**वृंदावना केलें साकरेचें आळें । न सांडी वेगळें कडूपण ॥ १ ॥**
**कावळ्याचें पिलूं कौतुकें पोशिलें । न राहे उगलें विष्ठेवीण ॥२॥**

तसेंच,

**लोहो परिसासीं रूसलें । सोनेंपणासी मुकलें ॥ १ ॥**
**गंगा आली आळशावरी । आळशी देखोनि पळे दुरी ॥ २ ॥**
**गांवाखालील ओहळें । रागें गंगेसी न मिळे ॥ ३ ॥**

तुकाराम.

कुवलयानंदकारांच्या मताप्रमाणें वरील तिन्ही उदाहरणें अवज्ञा अलंकाराचीं आहेत. परंतु मम्मटांच्या मताप्रमाणें पहिलें उदाहरण '**विशेषोक्ति**'चें होईल; कारण बैलास साखर खावयास मिळण्यास पुरेसें कारण असूनही ती त्यास मिळत नाहीं. दुसरें उदाहरण '**अतद्गुण**' अलंकाराचें होईल; कारण साखरेचा गोडपणा वृंदावनाचें झाड घेत नाहीं असें वर्णन आहे. पहिल्या उदाहरणाप्रमाणें येथें **विशेषोक्ति**ही संभवते. तिसरें उदाहरण '**विषम**' अलंकाराचें होईल ( मागें लक्षण पहा ). म्हणून अवज्ञा हा निराळा अलंकार मानण्याचें कारण दिसत नाहीं.

## ( २१ ) प्रहर्षण.

ज्या अर्थाच्या प्राप्तीकरितां एकाद्याचें मन उत्कंठित असतें त्या अर्थाचा लाभ अनायासेंच झाला, किंवा वांच्छित अर्थाच्यापेक्षां अधिक अर्थलाभ घडला असें जेथें वर्णन असतें तेथें प्रहर्षण अलंकार होतो. जसें:—

**लीला-विलोकन-स्मित-नर्मोंहीं न भुलला न आढळला ।**
**त्यांत पदर तद्धैर्याकरवीं म्हणावयासि हा ! ढळला ॥**

मोरोपंत.

मोहिनी अगोदरच अत्यंत रूपवती; त्या रूपांत तिच्या लीलादिकांची भर पडली; त्यांतच तिचा पदर सरकल्यामुळें दैत्यांना हा ! वाहवा ! इत्यादि शब्द उच्चारण्याचें धैर्य प्राप्त झालें म्हणजे ते तिच्यावर अत्यंत मोहित झाले.

हा **समाधी**चा एक प्रकार असल्यामुळें वेगळा अलंकार मानण्याची जरूरी नाहीं.

## ( २२ ) प्रौढोक्ति

एकादी गोष्ट एकाद्या वस्तूच्या उत्कर्षास अथवा उत्कृष्टपणास खरोखर कारणीभूत झालेली नसून ती कारण झालेली आहे असें जेथें वर्णन असतें तेथें **प्रौढोक्ति** अलंकार होतो. जसेः—

**कालिंदीच्या तीरिंचे ते तमाल । देती केशा कांति गे ! फार नील ।**
**हंसांचीं जीं जोडपीं खेळती, तीं । हास्या तूझ्या शुभ्रता फार देती ॥**

भाषांतर

येथें तमाल वृक्षांस यमुनेच्या कांठीं असल्यामुळें जास्त काळेपणा आला व त्या तमालांच्यामुळें एका युवतीच्या केशांच्या काळेपणांत अधिक भर पडली व हंसांच्या जोडप्यामुळें तिचें शुभ्र हास्य अधिक शुभ्रवर्ण व मनोहर झालें असें वर्णन आहे. वास्तविक पाहतां यमुनानदी तमाल वृक्षांच्या काळेपणास मुळींच कारण झालेली नसून यमुनेच्या काळया पाण्याचा तमालांच्या काळेपणाशीं कांहीं संबंध नसून संबंध आहे असे वर्णिल्यामुळें हें **संबंधातिशयोक्तीचें** उदाहरण आहे. यास वेगळा अलंकार मानण्याचें कारण नाहीं.

---

## ( २३ ) प्रतिषेध.

दुसऱ्याच्या अंगीं जो प्रसिद्ध गुण असतो त्याचा उपहास करण्याकरितां जेव्हां एकादा मनुष्य आपल्या अंगच्या गुणाची प्रशंसा करितो तेव्हां **प्रतिषेध** अलंकार होतो..जसें:—

**नोहे अक्षक्रीडा, तीक्ष्णशरें युद्ध येथ व्हायाचें ।**
**परवित्त-हरण नोहे, प्राण तुझे खास आजि जायाचे ॥**

भाषांतर.

ही एका शूराची युद्ध करण्यास उद्युक्त झालेल्या एका द्यूतकाराप्रत उक्ति आहे. येथें द्यूतकारास युद्धकौशल्य कोठून प्राप्त होणार असें ध्वनित करून त्याची निंदा केलेली आहे.

अथवा,

**पार्थ म्हणे रे कर्णा बहुभट मजशीं भिडोनि गडबडती ॥**
**ही आजि आजि आहे नोहे केली सभेंत बडबड ती ॥ १ ॥**

मोरोपंत

येथें सभेंत बडबड करणें जितकें सोपें आहे तितकें युद्ध करणें सोपें नाहीं, असें म्हणून अर्जुनानें कर्णाचा उपहास केला आहे.

वरील दोन्ही पद्यांत वाच्यार्थापेक्षां व्यंग्यार्थ फारच खुबीदार असल्यामुळें तीं **गुणीभूतव्यंग्य** काव्याचीं उदाहरणें आहेत. व्यंग्यार्थ इतके चमत्कारजनक व विविध असतात कीं त्या सर्वांस निरानिराळ्या अलंकारिक संज्ञा देणें बहुतेक दुरापास्तच आहे. शिवाय अशा प्रकारच्या व्यंग्यार्थांस नवीन संज्ञा देऊन अलंकारांची संख्या विनाकारण जास्त करण्यांत कांहीं अर्थ नाहीं.

---

## ( २४ ) परोक्षजनसंबंधोक्ति.

वर्णनीय विषय एक असून विचाराचे ओघानें अथवा मुद्दाम मध्येंच त्या विषयापासून क्षणभर वळून दुसऱ्याच एकाद्या जवळ नसलेल्या व्यक्तीस संबोधून भाषण जेथें केलेलें असतें तेथें **परोक्षजन-संबंधोक्ति** अलंकार होतो. जसें:—

**( १ ) मर, मर, मारा ! घोरा, माराया काय योग केलास ।**
**शिशुमूर्तीविषयीं रे हृदयीं कैसा तरी उदेलास ? ॥ १ ॥**

कृष्णानंदनिमग्न.

या ठिकाणीं प्रस्तुत विषय स्वनिंदा असून राधेनें मध्येंच मदनास उद्देशून वरील भाषण केलें आहे.

अथवा,

**( २ ) हा धर्म दयाजित तुज योग्य सखा स्त्रीजिता दशरथा ! रे ॥**
**शर सह्य पार जातां, हृदयींच जनापवाद शर थारे ॥ १ ॥**

मोरोपंत.

येथें वर्णनीय विषय **धर्म** असून ओघानें दशरथास उद्देशून भीमानें भाषण केलें आहे.

---

## ( २५ ) विरुद्धगुणन्यास.

परस्परविरुद्ध गुणांचे दोन पदार्थ एकत्र आणून त्यांची जेथें तुलना केलेली असते तेथें **विरुद्धगुणन्यास** नामक अलंकार होतो.

जसें:—

**धनपति जरि तूं रे ! मी असें शास्त्रवेत्ता ।**
**भट समरिं जरी तूं मी महा-वादिजेता ॥**

**अनुचर जरि तूतें, सेविती छात्र मातें ॥**
**न गणिशि मज जातों तुच्छ मानूनि तूतें ॥ १ ॥**

वामन.

येथें राजा व पंडित यांच्यामध्यें असलेले विरुद्ध गुण जवळ जवळ मांडून तुलना केलेली आहे.

अथवा,

**माझें शस्त्र तुझ्यापरी न गुरुच्या शापें जळालें असे ॥**
**कीं सोडोनि रणा पलायन न मीं, त्वां आजि केलें तसें ॥**
**नाहीं सारथिच्या कुळीं जनि मला, कीं निंद्य नाहीं जिणें ॥**
**दुःखाचा प्रतिकार कां करिन मी अस्त्रेंचि शस्त्राविणें ॥ १ ॥**

परशुराम तात्या गोडबोले.

येथें अश्वत्थामा व कर्ण यांचे विरुद्ध गुण जवळ जवळ मांडून तुलना केलेली आहे. दोहोंपैकीं एकाचा उपहास करणें अथवा ज्याचा मूर्खपणा त्यास दाखविणें हाच अशा प्रकारच्या तुलनेचा हेतु असतो. पहिल्या उदाहरणांत राजाचा उपहास केला आहे व दुसऱ्यांत कर्णाची निंदा केलेली आहे.

---

## ( २६ ) **चेतनधर्मारोपोक्ति** अथवा **चेतनगुणोक्ति.**

निर्जीव पदार्थावर सजीव पदार्थाचे गुणांचा जेव्हां आरोप केलेला असतो तेव्हां **चेतनधर्मारोपोक्ति** अलंकार होतो.

जसेः—

**दावी रडोनि झाले जे गंध उगाळितां स्वहात किणी ॥**
**भीम म्हणे विधि-लेखनि ! लेखनि नच वचकलीस घातकिणी ॥१॥**

मोरोपंत.

अथवा,

**कार्ष्णि म्हणे पळ इकडे पाहुत सज्जन न पत्रिकेतुकडे ॥**
**चर्मापरि लिहिलें कीं वपुचे मज्जननपत्रिके ! तुकडे ॥ १ ॥**

मोरोपंत.

पहिल्या पद्यांत ‘ विधिलेखनी ’ व दुसऱ्या पद्यांत ‘ मज्जननपत्रिका ’ हे शब्द निर्जीव असून त्यांच्यावर चेतनत्वाचा आरोप केलेला आहे. वास्तविक पाहतां हा उत्प्रेक्षेचाच एक प्रकार आहे.

---

## ( २७ ) प्रश्न किंवा अर्थापत्ति.

बाहेरून वाक्य प्रश्नासारिखें दिसतें, परंतु वास्तविक पाहतां वक्त्याचा प्रश्नांत विचारलेल्या गोष्टीविषयीं निश्चय असतो असें जेथें दाखविलें असतें तेथें **प्रश्न** अलंकार होतो. उदाहरणेंः—

**( १ ) सिकते माजी दिव्य रत्न । जरी सांपडे न करितां प्रयत्न ॥**
**तरी चतुरीं करावें जतन । किंवा अव्हेर करावा ? ॥ १ ॥**

श्रीधर.

येथें बाहेरून जरी प्रश्न आहे तरी रत्न जतन करावें असा बोलणाराचा हेतु आहे हें स्पष्ट आहे.

अथवा,

**( २ ) अपराध काय झाला ! रुसवा केला दयानिधे ! कां जी ।**
**अमृत प्राशन करवुनि पाजावी काय शेवटीं कांजी ॥ १ ॥**

मोरोपंत.

' कांजी पाजावी काय ?' या प्रश्नास पाजू नये असेंच उत्तर येतें; व बोलणाराच्या मनाचाही असाच निश्चय आहे हें उघड दिसतें.

## ( २८ ) लोकोक्ति.

प्रचारांत असलेल्या म्हणींचा जेव्हां काव्यांत उपयोग केलेला असतो तेव्हां **लोकोक्ति** अलंकार होतो. जसेंः—

**गांधार म्हणे तज्जय कां त्या आहेत काय बा ? सिंगें ॥**
**कीर्तिवर म्हणुनि विधिनें बांधियलीं त्यांसि काय बासिंगें ॥१॥**

मोरोपंत.

ह्या ठिकाणी ' शिंगें असणें ' ( कांहीं विशेष असणें ) व ' बासिंगें बांधणें ' ( ज्या गोष्टीस आरंभ केला ती गोष्ट माघारी न घेणें, दृढ संकल्प करणें ) ह्या रूढ म्हणींचा उपयोग केलेला आहे.

**जातां कर्ण पराभव-खिन्न क्षतकाय राय हाय ! म्हणे ।**
**खावविले चावविले लोहाचे शत्रुनें प्रतप्त चणे ॥**

मोरोपंत.

खडे चारणें, लोहाचे चणे खावविणें ह्या म्हणी अत्यंत अपमान करणें या अर्थी योजतात.

वास्तविक पाहतां लोकोक्ति या शब्दाचा अर्थ म्हण किंवा वाक्प्रचार असा **आहे** व याच अर्थानें हिंदी भाषेंत 'लोकोक्ति' हा शब्द वापरतात. संस्कृत शब्दाबद्दल केवळ मराठी शब्द वापरल्यास यासच 'म्हण' अलंकार म्हणणें प्राप्त होईल. त्याचप्रमाणें विनोदी चुटके किंवा कोट्या यांस देखील अलंकाराच्या पदवीस कोणी पोंहोचवूं पाहतील. कित्येक म्हणी व कोट्या प्रतिभानिर्मित व काव्यमय असतात, व ह्या दृष्टीनें त्यांच्याकडे पाहिल्यास त्यांच्यांत अलंकार सांपडतात. तथापि म्हणी '**लोकोक्ति**' अलंकार नाहींत व कोट्या '**परिहास**' अलंकार नाहींत **हें** ध्यानांत ठेवणें आवश्यक आहे. म्हणी किंवा कोट्या ह्यांच्यांत अनेक अलंकार असतात, व ते केवळ 'लोकोक्ति' या नांवानें न ओळखतां, त्यांच्या खऱ्या स्वरूपावरून त्यांतील अलंकार ओळखतां आले पाहिजेत. दिग्दर्शनार्थ कांहीं उदाहरणें खाली दिलीं आहेतः—

( १ ) आधीं सोन्याचें, वर जडावाचें—अनुरूप संयोग म्हणून सम.

( २ ) आंधळयानें मागितला एक डोळा, देवानें दिले दोन डोळे—अनपेक्षित लाभ म्हणून समाधि ( प्रहर्षण ).

( ३ ) असंगाशी संग आणि प्राणांशीं गाठ......विषम.

( ४ ) चढेल तो पडेल......बोधन निदर्शना.

( ५ ) आठ हात लाकूड आणि नऊ हात ढलपी—अतिशयोक्ति.

( ६ ) कोठें इंद्राचा ऐरावत व कोठें शामभट्टजीची तट्टाणी—विषम.

( ७ ) मनांत मांडे व पदरांत धोंडे......विषादन.

( ८ ) पी हळद आणि हो गोरी......द्वितीय समुच्चय ( युगपद्भाव ).

( ९ ) हिऱ्यास गळूं, पिऱ्यास आवढणें—असंगति.

( १० ) उवा फार त्याला खाज नाहीं, कर्ज फार त्याला लाज नाहीं.—दृष्टांत.

( ११ ) भीक नको पण कुत्रा आवर......अनुज्ञा.

( १२ ) बत्तीस चिरे त्यांत नागीण फिरे......रूपकातिशयोक्ति.

( १३ ) दिव्याखालीं अंधेर—( कारणसामग्री असून कार्य नाहीं ) विभावना.

( १४ ) पाट कशास पाहिजे—भुई सपाटच आहे—श्लेष.

( १५ ) आवळा देऊन कोहळा काढणें. असम वस्तूंची देवघेव—परिवृत्ति.

( १६ ) मिश्या मूठभर दाढी हातभर. आधारापेक्षां आधेय मोठें म्हणून अधिक.

यावरून दिसून येईल कीं 'लोकोक्ति' हा स्वतंत्र अलंकार नसून तिच्यांत (म्हणजे म्हणी, कोट्यादिकांत) निरनिराळे अलंकार असतात. पुष्कळ म्हणींमध्यें

अलंकार नसतातही; पण त्यांच्यांत व्यंग्यार्थ कमी अधिक प्रमाणांत भरलेला सांपडतोच. कांहीं म्हणींचा वारंवार उपयोग प्रचारांत होत असल्यामुळें त्यांच्या अर्थांतील चमत्कारजनकत्वही कमी झालेलें असतें.

## ( २९ ) विकस्वर.

जेथें एका विशेष अर्थाच्या समर्थनासाठीं सामान्य अर्थ सांगून त्या सामान्य अर्थाच्या प्रसिद्धीविषयी असमाधान वाटल्यामुळें त्याच सामान्य अर्थाच्या समर्थनार्थ पुन्हा विशेष अर्थ सांगितला असतो तेथें **विकस्वर** अलंकार होतो. जसें:-

( १ ) अनंत रत्नें उदरीं जयाचे। हिमें न सौभाग्य लपे तयाचें ॥
गुणव्रजीं दोष दडेचि एक। जसा शशीच्या किरणीं कलंक ॥

भाषांतर.

( २ ) कर्णाला कटु शब्द सोडुनि उगा बा बैसशी तूं जरी।
काका ! आम्रतरूवरी, मग तुला कोकीळ मानूं तरी ॥
कीं वस्तु क्षणवैभवें करुनियां मोठेपणा पावती।
नेपालेश्वरभाललग्न चिखला कस्तूरिका मानिती ॥

कृष्णशास्त्री चिपळूणकर.

वास्तविक पाहतां वरील दोन्ही उदाहरणांत दोन्ही प्रकारच्या **अर्थांतरन्यासाची** संसृष्टि झालेली असल्यामुळें त्या संसृष्टीस **विकस्वर** असें वेगळें नांव देण्याची जरूरी नाहीं.

---

# पुरवणी.

—:०:—

संदष्टक यमकाचीं राहिलेलीं उदाहरणें ( पान २८ पहा ):—

कुरुसैन्यांत गमे ज्या-परि रंभाकाननांत वारा हो ॥
त्या विजयश्री देउनि परिरंभा कां न नातवा राहो ॥ १ ॥
आसहि भवप्रवाहीं पर साधनही न दे वदे 'वाहे' ॥
वारिसि तूंचि जगत्प्रभु परसाधनहीन देवदेवा हे ॥ २ ॥
पावे प्रसन्न होतां देव सुदामा जिला असी माते ॥
श्रीकीर्तिहि जरि अल्पचि दे वसु दामाजिला असीमा ते ॥ ३ ॥
साधु म्हणावे म्हणती नर माधवदास साधु याला जे
अतिसारीं पट ज्याचे नर माधव दाससा धुया लाजे ॥ ४ ॥

मोरोपंत.

—:०:—

# परिशिष्ट दुसरें.

## अलंकारांतील साम्य-भेददर्शक टीपा.



### शब्दालंकार.

( १ ) अनेकाक्षरी वृत्त्यनुप्रास आणि छेकानुप्रासः—

या दोन अलंकारांमध्यें फरक एवढाच कीं, वृत्त्यनुप्रासांत दोन किंवा अधिक अक्षरें अनेक वेळां आवृत्त झालेलीं असतात; परंतु छेकानुप्रासांत तीं एकदांच आवृत्त झालेलीं असतात. अनेकाक्षरी वृत्त्यनुप्रासाच्या उदाहरणांसच कित्येकांनीं " अश्वधाटी यमक " असें म्हटलें आहे; परंतु तें बरोबर नाहीं.

( २ ) लाटानुप्रास व यमक ह्यांच्यामध्येंही कित्येक वेळां घोटाळा होण्याचा संभव आहे. लाटानुप्रासांत एका शब्दाची अर्थासह आवृत्ति झालेली असते. यमकामध्यें अक्षरें जरी तींच असलीं तरी शब्द व अर्थ हे निरनिराळे असतात. लाटानुप्रासामध्यें दोन शब्द एकाच चरणांत जवळ जवळ आल्यामुळेंच चित्तास आल्हाद होतो; परंतु यमकामध्यें एकसारखीं अक्षरें प्रत्येक यतीच्या अथवा चरणाच्या शेवटीं येतात. लाटानुप्रासांत दोन शब्दांतील अक्षरें व त्या शब्दांचा अर्थ हीं सारखींच असून तात्पर्य ( अन्वय, संदर्भ ) मात्र भिन्न असतो, म्हणून त्यास 'शब्दानुप्रास असेंही म्हणतात. यमकामध्यें शब्दांतील अक्षरें जरी एकसारखीं असलीं तरी त्यांच्या अर्थामध्यें फरक असतो.

———

### अर्थालंकार.

—:०:—

#### १. उपमा, उपमेयोपमा, अनन्वय, रशनोपमा आणि मालोपमा.

उपमेमध्यें दोन भिन्न पदार्थांमध्यें साधारण धर्म एक असून त्यांची तुलना केलेली असते. उपमेयोपमेमध्यें उपमेय हें उपमानासारखें आहे व उपमान उपमेयासारखें आहे असें वर्णन असून ह्या दोन पदार्थांशिवाय तिसऱ्या पदार्थाचा संबंध दाखविलेला नसतो. अनन्वय अलंकारांत उपमेयास उपमानच नाहीं असें वर्णन असतें अथवा एकाद्या वस्तूला त्याच वस्तूची उपमा दिलेली असते.

रशनोपमेमध्यें पूर्वीच्या वाक्यांतील उपमेय पुढील वाक्यांत उपमान केलेलें असतें आणि हाच क्रम अनेकवार आलेला असतो. मालोपमेमध्यें उपमेय एकच असतें; उपमानें मात्र अनेक असतात.

## २. उत्प्रेक्षा, रूपक, रूपकातिशयोक्ति आणि अपह्नुति.

वरील सर्व अलंकारांत उपमेय आणि उपमान यांच्यामध्यें अभेद थोड्या बहुत प्रमाणानें दृष्टोत्पत्तीस येतो. अभेदाचे दोन प्रकार आहेतः–१ ला–आहार्य, २ रा–अनाहार्य. दोन वस्तु निरनिराळया आहेत असे माहीत असूनही त्यामध्यें अभेद आहे अशी जेव्हां आपण कल्पना करितों तेव्हां त्या अभेदास आहार्य अथवा काल्पनिक अभेद असें म्हणतात. परंतु त्या वस्तूंविषयीं आपणांस जें कांहीं ज्ञान आहे त्यावरून त्या दोन वस्तूंमध्यें खरोखरच अभेद आहे असें जेव्हां आपणांस वाटतें तेव्हां त्या अभेदास अनाहार्य अभेद असे म्हणतात. वरील सर्व अलंकारांत साम्य आहे, परंतु तें आहार्यानिश्चयमूलक आहे. वास्तविक पाहिलें असतां त्यांमध्यें बराच भेद दिसून येतो.

उत्प्रेक्षेमध्यें उपमेयाचें उपमानाशीं बरेंच साम्य असतें. तथापि उपमेय हें उपमानच आहे कीं काय असा किंचित् संशय दाखविलेला असतो; व उपमेय हें उपमानच नाहीं अशी जरी आपली खात्री असते तरी त्यांच्यामधील साम्य विशेष आहे हें दाखविण्याकरितांच उपमेय व उपमान यांच्यामध्ये अभेद आहे अशी आपण कल्पना करितों. बाकीच्या तीन अलंकारांत पूर्ण अभेद असतो; परंतु त्यांच्यांतील भिन्नत्व वेगवेगळया प्रकारानें दाखविलेलें असतें.

रूपकामध्यें उपमेय व उपमान यांची एकच विभक्ति असते आणि उपमेय-वाचक शब्द स्पष्ट दिलेला असतो. रूपकातिशयोक्तीमध्यें उपमेयाचा मुळींच निर्देश केलेला नसतो; तथापि उपमेय व उपमान यांच्यामधील अभेद पूर्णपणें दाखविण्याकरितां उपमानवाचक शब्दानेंच उपमेयाचा उल्लेख केलेला असतो रूपकामध्यें गौणी सारोपालक्षणा असते; रूपकातिशयोक्तींत गौणी साध्यवसाना लक्षणा असते. वरील पारिभाषिक शब्दांचें थोडेंसें स्पष्टीकरण करणें जरूर आहे. गौणी सारोपा लक्षणा म्हणजे दोन पदार्थांमध्यें भेद असूनही ते भिन्न नाहींत असें मानणें. 'रामा बैल आहे' हें समारोपा लक्षणेचें उदाहरण आहे. येथें रामा या नांवाच्या मनुष्यावर बैलाच्या बुद्धिहीनतादि गुणांचा आरोप केलेला आहे; अथवा उपमेय ( रामा ) उपमान ( बैल ) आहे असा आहार्य अभेद दाखविला

आहे, म्हणून हें रूपकाचें उदाहरण होय. साध्यवसाना लक्षणा म्हणजे दोन पदार्थांमध्यें सर्वप्रकारें अभेद आहे असें मानणें. 'हा बैल आहे' हें रूपकातिशयोक्तीचें उदाहरण आहे. या ठिकाणीं रामाच्या नांवाचा बिलकुल उल्लेख न करितां रामा व बैल ह्यांच्यामध्यें पूर्णपणें अभेद आहे असें दाखविलें आहे.

अपह्नुतीमध्यें उपमेयाचा स्पष्ट निषेध केलेला असतो, किंवा मिष, छल, व्याज इत्यादि शब्दांनीं निषेध ध्वनित केलेला असतो; आणि अशा रीतीनें उपमेय व उपमान यांमध्यें अभेद आहे असें दाखविलें असतें. 'मुखचंद्र' हें रूपकाचें उदाहरण आहे. येथें मुखत्व आणि चंद्रत्व हे दोन्ही धर्म एकाच वेळीं एके ठिकाणीं असूं शकतील; परंतु अपह्नुतीमध्यें वरील दोन्ही धर्मांत एक प्रकारचा विरोध दाखविलेला असतो; म्हणजे वर्णनीय पदार्थ जर मुख असेल तर तो चंद्र नाहीं, व चंद्र असेल तर मुख नाहीं अशा प्रकारचें वर्णन असतें.

उपमेमध्यें 'उपमेय' जसें मुख्य असतें तसें रूपकामध्यें 'उपमान' मुख्य असतें.

---

## ३. सांग आणि परंपरित रूपक.

वरील दोन्ही अलंकारांत बरेंच साम्य आहे. दोहोंतही एकापेक्षां जास्त रूपकें असतात; परंतु फरक एवढाच कीं सांग अथवा सावयव रूपकांत जीं रूपकें येतात तीं अगदीं स्वाभाविकपणेंच आलेलीं आहेत असें दिसतें; म्हणजे एका रूपकाची योजना झाल्यावर दुसरीं रूपकें साहजिकपणेंच सुचलीं म्हणून घातलीं असें वाचकांस वाटतें. अर्थात् सांग रूपकामध्यें जीं अनेक रूपकें घातलेलीं असतात, त्यांमध्यें "पोष्यपोषक" अथवा "समर्थ्य-समर्थक भाव" संबंध असतो. ह्यांत एक रूपक मुख्य असून बाकीचीं रूपकें अर्थास शोभा आणण्यास मात्र साहाय्यभूत होतात.

परंपरित रूपकामध्यें एक रूपक दुसऱ्यास पुष्टि आणण्याकरितांच घातलेलें असतें; म्हणजे मुख्य रूपक व इतर रूपकें यांच्यामध्यें "हेतु हेतुमद्भाव" अथवा "कार्यकारणभाव" संबंध असतो; व हीं रूपकें स्वाभाविकपणें सुचलेलीं नसून त्यांची मुद्दाम योजना केली आहे असें दिसून येतें. परंपरित रूपकामध्यें एका रूपकाकरितां दुसरीं रूपकें घालावीं लागतात व असें करण्यांत कवीचा उद्देश म्हटला म्हणजे पहिल्यानें जें रूपक योजिलें असेल त्यास जास्त बळकटी आणणें हाच असतो.

---

## ४. ससंशय, उत्प्रेक्षा आणि भ्रांतिमान्.

संशय, संभावना व निश्चय ह्या ज्ञानाच्या क्रमानें तीन पायऱ्या आहेत. एकादी वस्तु ( स्थाणु ) पाहिल्यावर तिच्यासारखीच दुसरी वस्तु ( पुरुष ) ती आहे असा भास होतो व शेवटीं पाहिलेली वस्तु स्थाणु आहे अथवा पुरुष आहे ह्याविषयीं आपला अनिश्चयच असतो. ह्या ज्ञानाच्या प्रकारास ' संशय' म्हणतात; परंतु पाहिलेली वस्तु स्थाणु नसून पुरुषच असावा, असा जेव्हां कांहीं प्रबल कारणांमुळें आपल्या मनाचा कल होतो तेव्हां त्या ज्ञानास ' संभावना ' असें म्हणतात; आणि दृष्ट वस्तु स्थाणु नसून पुरुषच आहे अशी जेव्हां आपल्या मनाची खात्री होते तेव्हां त्या ज्ञानास ' निश्चय ' असें म्हणतात. संशय, संभावना आणि निश्चय हीं तिन्ही आहार्य ( अयथार्थ, खोटीं ) असूं शकतील अथवा अनाहार्य ( खरीं ) ही असूं शकतील.

रूपकांत आहार्य निश्चय असतो, उत्प्रेक्षेमध्यें आहार्य संभावना असते, ससंशय अलंकारांत संशय आहार्य अथवा अनाहार्यही असतो व भ्रांतिमान् अलंकारांत पाहणाऱ्याचे दृष्टीनें मात्र निश्चय अनाहार्य ( खरा ) असतो; कारण, त्याच्या दृष्टीनें त्यास झालेलें ज्ञान पूर्ण असतें. परंतु वास्तविक पाहिलें असतां त्याला मिळालेलें ज्ञान अगदीं खोटें असतें. ससंशयामध्यें एकाच वस्तूविषयीं आपणास भिन्न प्रकारचें ज्ञान होतें व ही वस्तु किंवा ती वस्तु हें आपणास बरोबर समजत नाहीं. उत्प्रेक्षेमध्यें उपमेय व उपमान हीं दोन्ही भिन्न आहेत हें ठाऊक असून देखील उपमेय हें बहुतेक उपमानासारखेंच आहे असा आपण जाणूनबुजून आपल्या मनाचा ग्रह करून घेतों. भ्रांतिमान् अलंकारांत दोन वस्तूंमध्यें पूर्ण अभेद आहे असे दाखविलेलें असतें. आपण एक वस्तु ( रज्जु किंवा शिंप ) पाहिल्यावर त्यासारख्याच दुसऱ्या वस्तूचें ( सर्प किंवा रुपें त्यांचें ज्ञान आपणास होतें; व प्रथम पाहिलेली जी वस्तु ( रज्जु किंवा शिंप ) तीच दुसरी वस्तु ( सर्प किंवा रुपें ) आहे असा जेव्हां आपला ग्रह ( निश्चय ) होतो तेव्हां भ्रांतिमान् अलंकार होतो.

---

## ५. रूपक, निदर्शना, उपमा, प्रतिवस्तूपमा आणि दृष्टांत.

वरील पांचही अलंकार दोन वाक्यार्थांमध्यें सादृश्य असल्यामुळें सारखे आहे-तसे भासतात. परंतु त्यांच्यामध्यें बराच भेद आहे.

रूपक व निदर्शना यांच्यामध्ये बरेंच साम्य आहे; तथापि त्यांच्यामधील भेद स्पष्ट दिसून येतो. रूपकामध्यें तादात्म्य स्पष्ट दाखविलेलें असतें, निदर्शनेमध्यें तें गर्भित असतें. रूपकामध्यें क्रियावाचक नाम व त्याचें कर्म वगैरे एका वाक्यांत घालून दुसरें वाक्यही त्याच प्रकारचें असतें. जसें:—अमुक गोष्ट करणें म्हणजे अमुक गोष्ट करणें होय. या ठिकाणीं दोन वाक्यार्थामधील अभेद शब्दांनींच व्यक्त झालेला आहे. निदर्शनेमध्यें क्रियावाचक नामाबद्दल क्रियापदाचा उपयोग केलेला असतो; म्हणजे जो असें करितो तो असें करितो अशा प्रकारचीं दोन वाक्यें असतात. रूपकाप्रमाणें येथें अभेद ( तादात्म्य ) स्पष्ट नसून गर्भित असतें.

उपमा, प्रतिवस्तूपमा व दृष्टांत हे तिन्ही अलंकार जवळ जवळ एकसारखेच दिसतात. उपमेमध्यें ‘ सादृश्य ’ तुल्य, सम इत्यादि शब्दांनीं दाखविलेलें असतें; परंतु प्रतिवस्तूपमा व दृष्टांत या अलंकारांमध्यें तें स्पष्ट न दाखवितां ध्वनित मात्र केलेलें असतें. दृष्टांत किंवा प्रतिवस्तूपमा या अलंकारांच्या उदाहरणांमध्यें जर तुल्य, सम इत्यादि शब्द घातले तर तीं लागलींच उपमेचीं उदाहरणें होतात.

प्रतिवस्तूपमा व दृष्टांत ह्या दोन अलंकारांमध्यें इतकें साम्य आहे कीं, कधीं कधीं ते ओळखतांना वाचक घोटाळ्यांत पडतो. प्रतिवस्तूपमेमध्यें दोन निरनिराळीं वाक्यें असून त्यांच्यामध्यें एकच साधारण धर्म भिन्न शब्दांनी दर्शविलेला असतो; ह्याला वस्तु-प्रतिवस्तुभाव असें म्हणतात. दृष्टांतामध्यें बिंबप्रतिबिंबभाव असतो. म्हणजे एका वाक्यांत ज्याप्रमाणें उपमान उपमेय व साधारणधर्म हीं घातलेलीं असतात, त्याचप्रमाणें तीं दुसऱ्या वाक्यांतही घातलेलीं असतात. अर्थात् दृष्टांतामध्यें साधारणधर्म दोन असतात.

प्रतिवस्तूपमा व निदर्शना ह्या दोन्ही अलंकारांत दोन वाक्यांमध्यें एक प्रकारचा संबंध स्थापन केलेला असतो, परंतु प्रतिवस्तूपमेमध्यें हा संबंध स्पष्ट दाखविलेला असतो व निदर्शनेमध्यें तो गर्भित असतो. प्रतिवस्तूपमा हा उपमेचा एक प्रकार आहे व निदर्शना रूपकाचा प्रकार आहे.

---

## ६. दृष्टांत व अर्थांतरन्यास.

दृष्टांतामध्यें सामान्याचें सामान्यानें व विशेषाचें विशेषानें समर्थन केलेलें असतें. परंतु अर्थांतरन्यासामध्यें सामान्य नियमाचें विशेष नियमानें व विशेष नियमाचें सामान्य नियमानें समर्थन केलेलें असतें. दृष्टांतामध्यें दुसऱ्या वाक्यांत

दिलेल्या उदाहरणावरून पहिल्या वाक्यार्थाच्या प्रामाण्याचा निश्चय होतो; अर्थांतरन्यासामध्यें एकाद्या सामान्य अथवा विशेष नियमाच्या समर्थनार्थ उदाहरण दिलेलें असतें.

## ७ दीपक व तुल्ययोगिता.

या दोन अलंकारांचें परस्परांशीं बरेंच साम्य आहे. अलंकारांत निर्दिष्ट केलेल्या अनेक वस्तूंमध्यें एकाच साधारणधर्मामुळें एक प्रकारचें खुबीदार सादृश्य उत्पन्न होतें; व अशा रीतीनें एकत्र जुळलेल्या वस्तु जेव्हां सर्वच प्रकृत किंवा सर्वच अप्रकृत असतात तेव्हां तुल्ययोगिता अलंकार होतो. परंतु त्याच वस्तु जेव्हां कांहीं प्रकृत व कांहीं अप्रकृत असतात तेव्हां दीपक अलंकार होतो.

दीपक व तुल्ययोगिता हे दोन वेगळे अलंकार न मानितां ते एकाच अलंकाराचे म्हणजे तुल्ययोगितेचे दोन प्रकार आहेत असें मानणें प्रशस्त होय असें जगन्नाथ पंडितांचें मत आहे.

## ८. व्यतिरेक व प्रतीप.

हे दोन्ही अलंकार सादृश्यमूलकच आहेत. उपमेमध्यें उपमान हें उपमेयापेक्षां बऱ्याच उंच प्रतीचें असतें; परंतु वरील दोन्ही अलंकारांत उपमेयच श्रेष्ठ आहे असें वर्णन असतें. व्यतिरेकामध्यें उपमेयाला उपमानाच्या वरच्या प्रतीस पोंहचविण्याचाच कवीचा उद्देश असतो आणि प्रतीपामध्यें उपमानाचा अधिक्षेप ( तिरस्कार ) केलेला असतो.

## ९. श्लेष व समासोक्ति.

श्लेषामध्यें वाक्यांत असलेले मुख्य शब्द ( नामें ) अथवा त्यांचीं विशेषणें किंवा दोन्ही प्रकारचे शब्द दोन किंवा अधिक अर्थी योजिलेले असतात; म्हणजे वाक्यांतील मुख्य व गौण शब्दाचे, प्रकरणादि निर्बंध नसतांही, अनेक अर्थ होतात; व हे सर्व अर्थ प्रकृत असतात किंवा अप्रकृत असतात. समासोक्तीमध्यें फक्त विशेषणेंच अनेकार्थी योजलेलीं असतात; परंतु त्यांपैकीं एक अर्थ मात्र प्रकृत असतो व अप्रकृत अर्थ श्लिष्ट विशेषणांच्या योगानें ध्वनित होतो.

## १०. रूपकातिशयोक्ति व अप्रस्तुतप्रशंसा.

रूपकातिशयोक्तीमध्यें एका पदार्थाचें दुसऱ्या पदार्थाच्यायोगानें अध्यवसान झालेलें असतें; म्हणजे साधारणधर्मामुळें एक पदार्थ दुसऱ्यानें अगदीं गिळून टाकिल्यासारखा दिसतो. अप्रस्तुतप्रशंसेमध्यें एक वाक्यार्थ दुसऱ्यांत मिळून गेल्यासारखा दिसतो. रूपकातिशयोक्तीमध्यें उपमानाच्या योगानें उपमेयाची प्रतीति होते, म्हणजे चंद्रावरून मुखाची प्रतीति होते. अप्रस्तुतप्रशंसेमध्यें अप्रस्तुत, प्रस्तुताची कल्पना मनांत आणण्याकरितांच, मुद्दाम घातलेलं असतें. अतिशयोक्तींत जसें निगरण प्रधान असतें तसें अप्रस्तुत-प्रशंसेमध्यें आपूरण असतें, म्हणजे एका अर्थामध्यें दुसऱ्या अर्थाची भर घातलेली असते. रूपकातिशयोक्तीमध्यें दुसरा अर्थ गौणी साध्यवसाना लक्षणेनें उत्पन्न होतो; म्हणजे येथें आरोप पूर्ण असतो. ' हा पहा बैल ' येथें रामा या उपमेयाचें बैल या उपमानाकडून पूर्ण निगीरण झालें आहे. रूपकातिशयोक्तींत संदर्भाची आवश्यकता असते त्याशिवाय निगीरण पूर्ण व स्पष्ट झालेलें नसतें. उदाहरणः—

**द्वारीं मृगपति-हस्तांतूनि, अहो वीरराय, जी मुक्ता ॥**
**ती सेविजेल इतरें सिंहावांचूनि काय जी ! मुक्ता ॥**

मोरोपंत.

येथें शर्मिष्ठेसंबंधी वृत्तान्त प्रस्तुत असून त्या शब्दाचें पूर्ण निगीरण ' मुक्ता ' ( मौक्तिक ) या उपमानानें झालें आहे व ययाति या उपमेयाचें सिंह या उपमानानें झालेलें आहे. येथें कथासंदर्भामुळें रूपकातिशयोक्ति अलंकार झाला आहे.

अप्रस्तुत-प्रशंसेमध्यें दुसरा अर्थ लक्षणेनें निष्पन्न न होतां नुसता ध्वनित मात्र केलेला असतो. जसें:—

**प्रेमें काक-कुळासचि संतर्पायासि आम्र पिकला जो ॥**
**त्याच्या गळां पडाया, साहुनि अपमान कां न पिक लाजो ॥**

मोरोपंत.

येथें काक या अप्रस्तुतावरून प्रकृत जो हलकट मनुष्य त्याचा बोध होतो. त्याचप्रमाणें पिकावरून विद्वान पुरुषाचा व आम्रावरून आश्रयदात्याचा बोध होतो. पण हा बोध लक्षणेनें न होतां, वर्णनाच्या शैलीवरून अप्रस्तुताच्या द्वारें प्रस्तुताचें ज्ञान होतें, म्हणजे दुसरा जो अर्थ मनांत येतो तो नुसता ध्वनित होतो.

## ११. अप्रस्तुतप्रशंसा आणि समासोक्ति.

अप्रस्तुतप्रशंसेमध्यें एक अर्थ स्पष्ट असून दुसरा ध्वनित केलेला असतो त्याचप्रमाणें समासोक्तींतही दुसरा अर्थ श्लिष्ट विशेषणांनीं ध्वनित केलेला असतो. परंतु फरक एवढाच कीं, अप्रस्तुतप्रशंसेंत अप्रस्तुताच्या योगानें प्रस्तुताचें ज्ञान होतें व समासोक्तींत प्रस्तुताच्या योगानें अप्रस्तुताचें ज्ञान होतें.

---

## १२. विशेषोक्ति आणि विभावना.

वरील दोन्ही अलंकार विरोधमूलक असल्यामुळें त्यांच्या योगानें भाषणास एक प्रकारची शोभा येते. विशेषोक्तीमध्यें जेवढीं म्हणून कारणें माहीत आहेत तेवढीं सर्व इच्छित फलप्राप्तीकरितां एकत्र होऊनही कार्यसिद्धि होत नाहीं असे दाखविलेलें असतें. विभावना अलंकार ह्याचे अगदीं उलट आहे म्हणजे जीं जीं प्रसिद्ध कारणें आहेत त्या सर्वांविरहित कार्य घडून आलें आहे असें येथें वर्णन असतें. ह्या दोन्ही अलंकारांच्या मुळाशीं जो विरोध असतो तो केवळ आहार्य म्हणजे काल्पनिक असतो. कारण, कार्य घडून येण्याची अथवा तें न घडून येण्याचीं खरीं कारणें दिलीं असतां दिसणारा विरोध नाहींसा होतो; मात्र हीं खरीं कारणें ओळखतां येण्यास वाचकांचे अंगीं सहृदयता पाहिजे.

---

## १३. विरोध आणि असंगति.

विरोधामध्यें दोन भिन्न पदार्थांचे परस्परविरुद्ध असे धर्म एकाच वस्तूचेठायीं असतात असें अथवा एकाच पदार्थाचे सुप्रसिद्ध असे दोन धर्म दोन निरनिराळ्या वस्तूंच्या ठायीं दिसून येतात असें वर्णन असतें. असंगतीमध्यें कारण एका आश्रयाच्या ठायीं असून त्या कारणापासून निष्पन्न होणारें कार्य भिन्न आश्रयाचे ठायीं घडून आलें असें वर्णन असतें. विरोधामध्यें केवळ शब्दांच्या अर्थाकडेच पाहिलें तर विरोध स्पष्ट दिसतो; परंतु शब्दांच्या तात्पर्यार्थाकडे लक्ष पुरविल्यास वास्तविक विरोध नाहीं असें आपणांस लागलेंच दिसून येतें; म्हणून ह्या अलंकारास विरोधाभास असेंही म्हणतात. असंगतीमध्यें कार्य व कारण ही निरनिराळ्या आश्रयाच्याठायीं असल्यामुळें दिसून येणारा विरोध नाहींसा करतां येत नाहीं. विरोधाच्या योगानें वाचकांस आश्चर्यचकित करून सोडण्याचा कवीचा उद्देश असतो; परंतु असंगतीच्या योगानें वाचकाचे मनांत बहुधा खेद उत्पन्न करण्याचा कवीचा प्रयत्न असतो.

---

## १४. पर्याय, विरोध आणि यथासंख्य.

पर्यायामध्यें एकच वस्तु क्रमानें अनेक आश्रयांचे ठिकाणीं दिसते असें वर्णन असतें; विरोधामध्यें एकाच वेळीं ती निरनिराळ्या ठिकाणीं असते असें दाखविलेलें असतें व यथासंख्य अलंकारांत एकच वस्तु निरनिराळ्या ठिकाणीं वेगवेगळ्या रूपानें दिसते असें वर्णिलेलें असतें.

---

## १५. परिसंख्या आणि द्वितीय उत्तर.

परिसंख्या अलंकारांत विचारलेल्या प्रश्नास अनपेक्षित व खुबीदार उत्तर दिलेलें असतें; व तें दिलेलें उत्तर अपेक्षित उत्तर देण्यास ज्या प्रकारचें ज्ञान लागतें त्यापेक्षां अन्य रीतीनें मिळविलेल्या ज्ञानाच्या साह्यानें केलेलें अनुभवसिद्ध विधान असतें. येथें दिलेलें उत्तर सुप्रसिद्ध असतें व ह्या उत्तराच्यामुळें इतर सर्व उत्तरें वर्ज्य आहेत असें दाखविलेलें असतें. द्वितीय उत्तरामध्यें विचारलेल्या प्रश्नाचें उत्तर सामान्य जनांस तर्क न करितां येण्याजोगें व दुर्बोध असें असतें; परंतु तें उत्तर ऐकल्याबरोबर त्याची दुर्बोधता नाहींशी होते.

---

## १६. द्वितीय पर्याय, द्वितीय समुच्चय व कार्यकारण-पौर्वापर्यविपर्ययातिशयोक्ति.

द्वितीय पर्यायामध्यें अनेक वस्तु क्रमानें एकाच आश्रयावर अवलंबून राहतात असें वर्णिलेलें असतें. द्वितीय समुच्चयामध्यें एकाच वेळीं कित्येक वस्तु एका किंवा अनेक आश्रयांचा अवलंब करितात. अर्थात् येथें कार्यकारणांचा युगपद्भाव वर्णिलेला असतो. परंतु कार्यकारणांचा क्रम विपरीत आहे—म्हणजे कारणाचे अगोदरच कार्य घडलें—असें जेथें वर्णन असतें तेथें विपर्ययातिशयोक्ति अलंकार आहे असें समजावें.

---

## १७ समुच्चय व समाधि.

समुच्चय म्हणजे ( कारणांचा ) समुदाय. ह्या अलंकारांत अनेक कारणें खले-कपोतक-न्यायानें[१] असतात; व त्यांपैकी प्रत्येक कार्योत्पादन करण्यास समर्थ

---

१ खळ्यावर जसा पारव्यांचा समुदाय येतो त्याप्रमाणें.

असूनही कार्य मात्र त्वरेनें झालें नाहीं असें वर्णन असतें. समाधीमध्यें एक अथवा अनेक कारणें कार्योत्पादक असूनहि एकाद्या आकस्मिक किंवा आगंतुक कारणांच्या योगानेंच काक-तालीय[1] न्यायानें कार्योत्पत्ति विशेष सुलभ रीतीनें व अधिक त्वरेनें झाली असे वर्णन असतें.

---

## १८ वक्रोक्ति व व्याजोक्ति.

ज्याप्रमाणें श्लेष हा शब्दालंकार व अर्थालंकारही मानलेला आहे त्याचप्रमाणें वक्रोक्ति हा देखील शब्दालंकार व अर्थालंकार मानला पाहिजे. किंबहुना त्याचें शब्दालंकारांतून उच्चाटन करून त्यास अर्थालंकारमालिकेंत स्थिर स्थान दिल्यास हरकत नाहीं.

वक्रोक्तीमध्यें एक अर्थ मनांत असून काकूक्ति[2] किंवा श्लेषोक्ति यांच्यायोगानें विवक्षित अर्थापेक्षां निराळाच अर्थ करून श्रोत्यास चकित करून टाकण्याचा प्रयत्न केलेला असतो. व्याजोक्तींत लपविलेली गोष्ट उघडकीस आली असतां अन्य कारणानें ती पुन्हां लपविण्याचा प्रयत्न करून श्रोत्यास चकित करण्याचा यत्न केलेला दिसतो. वक्रोक्तीमध्यें एक प्रकारचा वाक्-छल करून भिन्नार्थ सूचित केलेला असतो; व्याजोक्तीमध्यें लपविलेल्या गोष्टीचें समर्थन निमित्तांतरानें केलेलें असतें.

---

## ( १९ ) श्लेषवक्रोक्ति व छेकापन्हुति.

श्लेषवक्रोक्तीमध्यें बोलणाराच्या मनांत योजलेल्या शब्दाचा बहुधा एकच अर्थ असतो; पण ऐकणारा मात्र त्याचे दोन अर्थ करून बोलणाराच्या सरळ वाक्याचा श्लेषानें वांकडा ( वक्र ) अर्थ करून बोलणारास चकित करून सोडतो. येथें ऐकणारा मुद्दाम आडरानांत शिरल्यासारखें दाखविलेलें असतें.

छेकापन्हुति हें एक प्रकारचें कोडेंच असतें. यांत बोलणाराच्या भाषणांत दोन अर्थ असतात पण श्रोत्याच्या मनांत ते तसे असतीलच असें सांगतां येत नाहीं. तथापि वक्त्यानें विचारलेल्या प्रश्नास श्रोता विचार करून जें उत्तर देतो त्याचा

---

१ ताडाच्या फांदीवर कावळा बसण्यास व फांदी मोडण्यास जशी एकच गांठ पडते त्याप्रमाणें. २ काकु=निराळ्या प्रकारचा ध्वनि कंठांतून काढून ( आवाज बदलून ) अन्य अर्थ प्रदर्शित करणें.

निषेध करून म्हणजे 'ती वस्तु ही नव्हे' असें सांगून तेंच लक्षण लागू पडेल अशा दुसऱ्याच वस्तूचें नांव सांगतो व अशा रीतीनें आपला चतुरपणा व्यक्त करून श्रोत्यावर आपली छाप बसवूं पाहतो. उत्तर देण्यांत वरील प्रकारचा लपंडाव करणें म्हणजे **छक्केपंजे** ( छेकापन्हुति ) करणें अशी म्हण मराठींत रूढ आहे.

## २०. व्याजोक्ति आणि अपन्हुति.

व्याजोक्तीमध्यें तीन गोष्टींची आवश्यकता असते—१ ली, कोणती तरी एकादी लपविलेली गोष्ट; २ री, ती कोणत्या तरी प्रकारानें उघडकीस येणें; व ३ री, ती उघडकीस आल्यावर अन्य कारण सांगून खरा प्रकार लपविण्याचा प्रयत्न. अपन्हुतीमध्यें जी गोष्ट माहीत आहे त्याच गोष्टीचा उघडपणें निषेध केलेला असतो; व अशा रीतीनें उपमेयाचा निषेध करून उपमेय व उपमान ह्यांच्यामध्यें सादृश्य आहे असें दाखविण्याचा कवीचा उद्देश असतो. व्याजोक्तीमध्यें अपन्हुतीप्रमाणें निषेध केलेला नसतो व सादृश्यही दाखविलेलें नसतें; परंतु अपन्हुतीमध्यें जसें उपमान स्थापित करून साम्य दाखविलेलें असतें तसें व्याजोक्तीमध्यें प्रसंगास शोभेल असें कारणांतर स्थापन करण्याचा कवीचा प्रयत्न असून साम्य मात्र दाखविलेलें नसतें.

## २१. व्याजोक्ति आणि मीलित.

व्याजोक्तीमध्यें एकाद्या गोष्टीच्या खऱ्या कारणाचें निगूहन कांहीं विशेष हेतु मनांत धरून केलेलें असतें. मीलितामध्यें एक वस्तु दुसरीमध्यें अगदीं स्वाभाविक रीतीनें लपली गेली आहे असें दिसतें; व पाहणारास आपण एकच वस्तु पहात आहों असा भास होतो. व्याजोक्तीमध्यें निगूहन मुद्दाम केलेलें असतें; व मीलितामध्यें वस्तुस्थितीचें वर्णन असतें, अर्थात् येथें निगूहन नैसर्गिक व खरें असतें.

## २२. अर्थांतरन्यास, अनुमान व काव्यलिंग.

अर्थांतरन्यासामध्यें सामान्य नियमाचें विशेष नियमानें अथवा विशेष नियमाचें सामान्य नियमानें समर्थन केलेलें असतें. ह्या अलंकारांत पहिल्यानें प्रतिज्ञा व नंतर हेतु दिलेला असतो. कधीं कधीं प्रतिज्ञा व हेतु यांचा क्रम उलटा असलेलाहि दिसून येतो. येथें दोन वाक्यांमध्यें 'समर्थ्यसमर्थकभाव' असतो. अनु-

मानामध्यें घडलेल्या कार्यावरून त्याचें कारण आपणास जाणतां येतें किंवा त्याचे-विषयीं तर्क करितां येतो. "रस्ते भिजलेले आहेत, तेव्हां काल रात्रीं पाऊस पडला असावा" हें अनुमान होय; व अशा प्रकारचा वाक्यार्थ जेव्हां कविप्रतिभानिर्मित असतो तेव्हां तो अनुमान अलंकार होतो. या अलंकारांत पूर्वार्धामध्यें हेतु व उत्तरार्धात साध्य (जें अनुमान काढलेलें असतें तें) दिलेलें असून प्रथमार्धांतील हेतु 'ज्ञापक' असतो. अनुमानांत साध्य व साधन ( हेतु ) यांच्यामध्यें निरंतर साहचर्य म्हणजे व्याप्ति असते व जें कांहीं अनुमान काढावयाचें असतें तें वाचकावर न सोपवितां कवीनें स्वतः काढिलेलें असतें. काव्यलिंगामध्यें एकाद्या वाक्यार्थाचा हेतु एका पदाच्या अथवा वाक्याच्या योगानें दर्शविलेला असतो. ज्याप्रमाणें अर्थांतरन्यासामध्यें हेतु '**समर्थक**' असतो व अनुमानांत हेतु '**ज्ञापक**' असतो त्याचप्रमाणें काव्यलिंगांत हेतु '**कारक**' असतो. यालाच '**उत्पादक**' '**निष्पादक**' व '**जनक**' अशीं नांवें आहेत. काव्यलिंग अलंकारांत जी गोष्ट घडून आलेली असते ती घडण्याचें कारण ( लिंग, हेतु ) दिलेलें असतें. 'असें आहे म्हणून असें आहे' अथवा 'काल रात्रीं पाऊस पडला म्हणून रस्ते ओले झाले आहेत' अशा प्रकारचा कविप्रतिभानिर्मित वाक्यार्थ जेथें असतो तेथें काव्यलिंग अलंकार आहे असें जाणावें. अनुमानांत ज्याप्रमाणें लिंग-लिंगीसंबंध ( साधन व साध्य यांच्यामध्यें व्याप्ति ) असतो त्याप्रमाणें काव्यलिंगांत अथवा अर्थांतरन्यासांत नसतो.

---

## २३. कारणमाला, मालादीपक व एकावली.

वरील तिन्ही अलंकार शृंखलान्यायमूल आहेत. यांपैकीं मालादीपक हा दीपकाचाच एक प्रकार आहे असें मानिलें जातें; परंतु हें बरोबर नाहीं. कारण, दीपकामध्यें साम्य असलेंच पाहिजे; मालादीपकांत तें दिसून येत नाहीं. शिवाय दीपकामध्यें प्रकृत व अप्रकृत वस्तु असतात; मालादीपकांत तशा नसतात. या अलंकाराचें एकावलीशीं बरेंच साम्य आहे म्हणून मालादीपक हा दीपकाचा एक प्रकार आहे असें न मानितां तो एकावलीचाच एक प्रकार आहे असें मानणें प्रशस्त होय असें जगन्नाथ पंडितांचें मत आहे.

कारणमालेमध्यें मागाहून आलेली वस्तु पूर्वी आलेल्या वस्तूचें कारण असतें. मालादीपकांत पूर्वींची वस्तु पुढें आलेल्या वस्तूचें कारण असतें. असा क्रम अने-

कवार आला तरच हे दोन्ही अलंकार चमत्कारजनक होतात. मालादीपकांत सर्व वस्तूंचा एकाच क्रियेशीं अथवा गुणाशीं संबध असतो. कारणमालेंत तसा संबंध नसतो.

मालादीपकांत पूर्वीची प्रत्येक वस्तु पुढील प्रत्येक वस्तूचें विशेषण असते. एकावलीमध्यें पुढील वस्तु मागील वस्तूचें विशेषण असते. एकावलीमध्यें पुढील वस्तु व मागील वस्तु यांच्यामध्यें विशेषणविशेष्यभाव नाहीं असेंही स्थापन केलेलें असतें.

---

## २४. मीलित, सामान्य, आणि तद्गुण.

मीलितामध्यें एक वस्तु प्रधान असते व दुसरी अप्रधान असते. या दोन पदार्थांमध्यें जो एक साधारण धर्म असतो तो एका पदार्थापेक्षां दुसऱ्यामध्यें इतका अधिक असतो कीं एक पदार्थ दुसऱ्या पदार्थापुढें अगदीं फिक्का पडतो इतकेंच नव्हे, तर तो दुसऱ्यामध्यें अगदीं मिळून जाऊन दिसेनासा होतो व यामुळें तो बिलकुल ओळखतां येत नाहीं. सामान्य अलंकारांत दोन्ही वस्तु प्रधान असतात; व दोन्ही वस्तूंचे गुणधर्म अगदीं सारखे असल्यामुळें जरी त्या ओळखण्यास कठीण जातें, तरी त्या वस्तु निरनिराळ्या आहेत याविषयीं आपला निश्चय होतो. तद्गुण अलकारांत दोन वस्तूंपैकीं एक वस्तु दुसऱ्या वस्तूच्या सहवासानें आपल्या अंगांतील गुण टाकून देऊन दुमरीच्या अंगांत प्रकर्षेंकरून वसत असलेल्या गुणांचा स्वीकार करिते असें वर्णन असतें.

---

बाकीच्या अलंकारांमधील भेद सहज ओळखतां येण्याजोगे असल्यामुळें त्यांच्याविषयीं जास्त स्पष्टीकरण करण्याची आवश्यकता नाहीं.



## अष्टदल—कमलबंध

मालवी गर्विमामास बाणासमा ॥
माथुराधिश्रमा मानवाऽपद्भ्रमा ॥
माप देत प्रमा मात्र कार्यं नमा ॥
मान हीन क्षमा मा नमामः समा ॥

आकृति.




गणाधिपतयेनमः

बाळा सोळा कळांची छवि नवि रविची, तेविं दावी स्ववीची ॥ माळा ज्वाळा नळाची गुणि फणि-मणिची हारि भारी मरीची ॥
झुंकारे कामुकाची घटि कटि-तटीची ख्याति गाती सतीची ॥ हंसांची साक्ष साची गति रति-पतिची कांतिमा तीव्र तीची ॥ १ ॥

## अम्लान—पंकजमाला—बंध

आकृति.



## चक्रबंध

वीनवी लालसा हा नला माजवी ॥
वीजमालास्त्र हें तीव्र जें वीजवी ॥
वीजवी जें रमानायका नीरवी ॥
वीर नीकारुनि ख्याति लावी नवी ॥ १ ॥

आकृति.



## द्वादशदल–कमलबंध.

तूं काली कमला सरस्वति कलाष्टाका जगद्वत्सला ॥
तूं तारा तरला गिरीश अबला ज्वालामुखी सोज्वला ॥
या बाला अबला मिळोनि सकळा घालीन मी गोंधळा ॥
श्रीकृष्णा कुशला वरीन चपला ते स्वाप लागो दळा ॥१॥

आकृति



# अलंकार-चंद्रिकेंत निरूपण केलेल्या विषयांची प्रकरणपरत्वें वर्णानुसार सूची.



## विषयोपक्रम.



## शब्दालंकार.



## अर्थालंकार.

# परिशिष्ट पहिलें.

## मम्मटाचार्यांस संमत नसलेल्या परंतु परिशिष्टांत विवेचन केलेल्या कित्येक ठळक अलंकारांची सूची.

:o: